# नाना देशांतील नाना लोक




लेखक

विठ्ठल दत्तात्रय घाटे

एम्. ए., बी. टी., टी. डी.

असिस्टंट इन्स्पेक्टर ऑफ स्कूल्स मुंबई इलाखा.

अहमदाबाद



१ ऑगस्ट १९३३

किंमत १ रुपाया

# अनुक्रमणिका

# नाना देशांतील नाना लोक



## प्रकरण १ लें

## नाना देशांतील नाना लोक

सर्वच माणसें सारखीं-अगदीं सारखीं-असतीं तर काय झालें असतें ? सर्वांचीं सारखीं नाकें, सारखेच डोळे, सारखाच रंग, सारखेच कपडे, खाणेंपिणें, खेळणें इ० सर्व सारखेंच असतें, तर आपल्याला एकमेकांचा कंटाळा आला असता; नाहीं ? आपण एकमेकांहून वेगळे आहोंत, म्हणूनच आपल्याला एकमेकांची चौकशी करावीशी वाटते व माहिती करून घ्यावीशी वाटते.

आपण आपल्या महाराष्ट्रापुरता जरी विचार केला, तरी आपल्याला दिसून येईल कीं, तेथें राहणारीं माणसें एकमेकांहून वेगळीं आहेत. घाटावर राहणारा जाडाजुडा मुंडासें व घोंगडी वापरणारा, तीन पाचुंदे भाकरींचा फन्ना उडविणारा मनुष्य, कोकणांतल्या सडपातळ, पावसांत डोकीवर इरलें घेणाऱ्या, परातभर भात खाणाऱ्या माणसाहून कितीतरी वेगळा आहे.

उंचापुरा, गोरापान, तरतरीत नाकाचा, हुक्का ओढणारा, निवळ गव्हाच्या चपात्या खाणारा व मिरचीला हातही न लावणारा पंजाबी मनुष्य, ठेंगण्या, काळसर, लांबच लांब शेंडी ठेवणाऱ्या, निवळ भात खाणाऱ्या व सपाटून मिरच्या खाणाऱ्या मद्रासी माणसापेक्षां किती वेगळा दिसतो ? बंगालचा बाबू डोकीवर कांहींच घालीत नाहीं, तर पुण्याचे पंत गरगरीत वाटोळी पगडी घालतात; सिंधचा मनुष्य उंच

शिपतरासारखी टोपी घालतो, व संयुक्त प्रांतांतला भय्या तळहाता-एवढी मलमलची टोपी घालतो. आपण कांहींजण घरदार करून राहतों, तर फासेपारधी लोक नेहमीं भटकत राहतात. आपण शहरांत राहतों तर भिल्ल, गोंड वगैरे लोक भयंकर रानां-डोंगरांत-राहतात.

आपल्या हिंदुस्तानांत राहणारे लोक जर इतके वेगवेगळ्या प्रकारचे आहेत, तर पृथ्वीवर निरनिराळ्या देशांत राहाणारे लोक किती वेगवेगळे असतील? हिंदुस्तानापेक्षां पृथ्वी कितीतरी मोठी आहे. निरनिराळ्या देशांत राहणाऱ्या लोकांची माहिती फारच मजेदार असणार. या पुस्तकांत मी तुम्हाला कांहीं ठळक ठळक लोकांची माहिती सांगणार आहें, व ते एकमेकांहून वेगळे कसे आहेत, व कां आहेत तें दाखविणार आहें.

इतर देशांतील लोकांचें कपडेलत्ते, घरें, रितीरिवाज, उद्योगधंदे आपल्याहून वेगळे आहेत व आपल्याला ते विचित्र वाटतात म्हणून आपण त्यांना हसूं नये. आपण त्यांच्याहून वेगळे आहोंत, विचित्र आहोंत म्हणून ते लोक आपल्याला हंसले तर आपल्याला आवडेल का? अर्थात् नाहीं.

देवानें माणसाला ज्या ठिकाणीं जशा परिस्थितींत उत्पन्न केलं असतें, त्या ठिकाणीं त्या परिस्थितीच्या मानानें त्याला राहावें लागतें. यांत कसलाच कमीपणा नाहीं, व यांत हसण्यासारखेंहि कांहीं नाहीं. उलट बिकट परिस्थितींत राहावें लागत असूनहि कांहीं लोक नेटानें, मेहनतीनें व शहाणपणानें तेथें टिकून राहतात, इतकेंच नव्हे तर परिस्थितीशीं टक्कर देऊन आपली स्थिति सुधारतात, म्हणून त्यांचें आपण कौतुक केलें पाहिजे.

---

## प्रकरण २ रें

# पृथ्वीचे भाग

पृथ्वीचे सारेच भाग कांहीं सारखे नसतात. कांहीं ठिकाणीं सपाट मैदानें असतात, तर कांहीं ठिकाणीं उंच उंच डोंगर असतात. कोठें ओसाड वाळवंटें असतात, तर कोठें गजबजलेलीं शहरें असतात; कांहीं ठिकाणीं भयंकर थंडी असते, तर कांहीं ठिकाणीं तितकीच भयंकर उष्णता असते. कोठें बिलकुल पाऊस पडत नाहीं, तर कोठें हरहमेश मुसळधार पाऊस पडतो.

आपल्याला बारीकसारीक भेद लक्षांत घेण्याची जरूर नाहीं. कांहीं महत्त्वाच्या कारणांमुळें पृथ्वीचे कांहीं ठळक भाग पडतात, त्यांचाच आपल्याला विचार करावयाचा आहे.

पृथ्वीला उजेड व उष्णता सूर्यापासून मिळते. सूर्यापासून पृथ्वीस उष्णता मिळाली नसती तर झाडें, जनावरें किंवा मनुष्यप्राणी पृथ्वीवर जगूं शकलीं नसतीं. आपण भरदुपारीं बारा वाजतां वर पाहिलें, तर सूर्य अगदीं आपल्या डोक्यावर आलेला दिसतो. सकाळीं सूर्य पूर्वेकडे क्षितिजाजवळ उगवतांना दिसतो; तेव्हां त्याचीं किरणें पृथ्वीवर तिरपीं पडतात, व म्हणून त्या वेळचें ऊन कोवळें असतें. वर चढत चढत तो दुपारीं आकाशाच्या मधोमध आपल्या डोक्यावर प्रकाशतो; तेव्हां त्याचीं किरणें पृथ्वीवर लंबरूपानें पडतात, व म्हणूनच तेव्हांचें ऊन कडक असतें.

तेथून पश्चिमेकडे जात जात पश्चिमेच्या क्षितिजाखालीं तो आपल्याला मावळतांना दिसतो. पण पृथ्वीच्या सर्वच भागांत सूर्य मध्यान्हीं असा डोक्यावर प्रकाशत नाहीं. कांहीं भागांत तो क्षितिजाच्या

फारसा वर येत नाहीं. बाजूस दिलेली आकृति पाहा. या आकृतींत




०° एथून जी मधोमध रेघ गेलेली आहे, तो पृथ्वीचा मध्यभाग. अशी कांहीं खरोखरीची रेघ पृथ्वीच्या मध्यभागावर आहे असें नाहीं. ही रेघ केवळ मानलेली आहे. या मानलेल्या रेघेला विषुववृत्त असें म्हणतात. या विषुववृत्तावर म्हणजे पृथ्वीच्या मध्यभागावर असलेल्या देशावर सूर्याचीं किरणें उभीं लंबरूपानें पडतात; त्यामुळें तेथें उष्णता जास्त असते. विषुववृत्ताच्या उत्तरेस २३॥° वरून काढलेल्या रेघेपर्यंत व दक्षिणेस २३॥° वरून काढलेल्या रेषेपर्यंत दाखविलेल्या प्रदेशांत सूर्याचीं किरणें लंबरूपानें पडतात; व त्यामुळें या दोन रेघांमधील पृथ्वीच्या भागावर फार उन्हाळा असतो. या भागाला **उष्ण कटिबंध** असें म्हणतात. या उष्ण कटिबंधाच्या उत्तरेस व दक्षिणेस जसजसें यावें, तशतशी सूर्यापासून पृथ्वीस मिळणारी उष्णता कमीकमी होत जाते. कारण सूर्याचीं किरणें या प्रदेशांवर लंबरूपानें पडत नाहींत. उत्तरेस २३॥° ते ६६॥° वरून काढलेल्या दोन रेघांमधील प्रदेशास **उत्तर समशीतोष्ण कटिबंध** (मध्यम कटिबंध) व दक्षिणेस २३॥° ते ६६॥° वरून काढलेल्या या दोन रेघांमधील प्रदेशास **दक्षिण समशीतोष्ण कटिबंध**, (मध्यम कटिबंध) असें म्हणतात. या कटिबंधांनां समशीतोष्ण म्हणण्याचें कारण एथें थंडीहि बेताची व उष्णताहि बेताची असते. उष्णता कमी असण्याचें कारण या प्रदेशावर सूर्यकिरणें आपल्या इकडच्या सकाळच्या सूर्यकिरणांप्रमाणें

तिरपीं पडतात हें होय. उत्तर समशीतोष्ण कटिबंधाच्या ( मध्यम कटिबंधाच्या ) उत्तरेस व दक्षिण समशीतोष्ण कटिबंधाच्या ( मध्यम कटिबंधाच्या ) दक्षिणेस असलेल्या प्रदेशांवर सूर्यकिरणें फारच तिरपीं पडतात व कित्येक दिवस तर तीं अगदींच पडत नाहींत. म्हणजे हे दोन्ही प्रदेश फार थंडीचे व अंधाराचे आहेत. यांना **उत्तर शीत कटिबंध** व **दक्षिण शीत कटिबंध** म्हणतात.

यावरून आपल्याला असें समजलें कीं, जसजसें आपण विषुववृत्तापासून दक्षिणेस व उत्तरेस दूर दूर जाऊं, तसतसें उष्णतेचें मान कमी कमी होत जातें. उष्णतेच्या कमीजास्त प्रमाणावरून साधारणपणें आपल्याला पृथ्वीचे तीन भाग पाडितां येतील.

१ **फार उष्ण असा भाग म्हणजे उष्ण कटिबंध**—हा पृथ्वीचा मध्यभाग. एथें पाऊस फार पडतो, भयंकर जंगलें वाढतात, व त्यांत क्रूर जनावरें व साप वगैरे प्राणी वावरतात. या उष्ण प्रदेशांत माणसाला सुखासमाधानानें राहतां येणें शक्य नाहीं. म्हणून एथें मनुष्यांची फार थोडी वस्ती आहे.

२ **फार थंडीचा व अंधाराचा भाग किंवा उत्तर व दक्षिण शीत कटिबंध**— या भागांत प्रकाश व उष्णता यांच्या अभावीं सर्व प्रदेश बर्फमय असतो. झाडझुडूप वाढूं शकत नाहीं; शेतीभाती करणें शक्य नाहीं; व फार थंडीमुळें एथें फारशीं माणसें राहत नाहींत.

३ **बेताची थंडी व उष्णता असलेला भाग म्हणजे उत्तर व दक्षिण समशीतोष्ण कटिबंध**—या भागांत माणसांना राहणें आवडतें व परवडतें. हवा उत्साह देणारी असल्यामुळें एथें उद्योगधंदे, शेतीभाती वगैरे कामें चांगलीं करितां येतात. या भागांत

मनुष्याची वस्ती अर्थात् पुष्कळ असणार, व एथें राहणारीं माणसेंहि इतर कटिबंधांतील माणसांपेक्षां अधिक सुधारलेलीं असणार.

हवामानाचें वर एक कारण दिलें. विषुववृत्तापासून अंतर एवढेंच एक हवामानाचें कारण नाहीं. दुसरेंहि एक महत्त्वाचें कारण आहे. तें म्हणजे प्रदेशाची उंची. जसजसा प्रदेश उंच, तसतशी हवा थंड. डोंगरावर मैदानापेक्षां हवा थंड असते. महाबळेश्वरचा डोंगर वाईपासून फक्त दहा बारा मैलांवर आहे; पण महाबळेश्वरची हवा उन्हाळ्यांतसुद्धां थंड असते, व इकडे थोड्या मैलांवर असलेल्या वाईला त्या वेळीं उकडत असतें. या कारणामुळें एकाच कटिबंधांत जवळपास असलेल्या प्रदेशांमध्यें उष्णता व उजेड या बाबतींत पुष्कळ फरक पडतो.

या वर सांगितलेल्या वेगवेगळया प्रकारच्या प्रदेशांत राहणारीं माणसें त्या त्या ठिकाणच्या परिस्थितीप्रमाणें वेगवेगळ्या प्रकारचीं बनतात. "जसा देश तसा वेष" अशी एक म्हण आहे. जसा देश असतो, तसा वेषच असतो असें नाहीं तर खाणेंपिणें, घरदार, उद्योगधंदे, रीतीभाती सर्व कांहीं वेगळें असतें. मनुष्य आपल्या भोंव-तालच्या परिस्थितीचा गुलाम असतो असें म्हटलें तरी चालेल. त्याचें घर कसें असावें, त्यानें काय खावें, कशाप्रकारें आपलें शरीर झाकावें, काय उद्योगधंदे करावेत, कसें वागावें व राहावें हें सर्व तो कोणत्या देशांत राहतो यावरून ठरतें. व त्याला तें मुकाट्यानें पतकरावें लागतें.

तथापि मनुष्यांमध्यें व मुक्या जनावरांमध्यें अंतर आहे. मनु-ष्यास बुद्धि आहे, इच्छाशक्ति आहे, महत्त्वाकांक्षा आहे. आपलें आयुष्य सुखानें जावें अशी त्याची धडपड असते, व म्हणून बिकट परिस्थिति असली तरी तो तिच्याशीं झगडून स्वतःच्या सुख-

सोई निर्माण करीत असतो. परिस्थिति व मनुष्य यांमधील झगडा पाहणें मोठें मनोरंजक असतें. या पुस्तकांत असे झगडे टिक-ठिकाणीं आढळतील. कांहीं ठिकाणीं तर मनुष्यानें प्रतिकूल परिस्थि-तीला आपल्या अचाट प्रयत्नानें व शहाणपणानें पार बदलून आपल्याला हवी तशी सुखसोईची परिस्थिति निर्माण केली आहे, असें आपल्याला दिसून येईल.

आतां आपण पृथ्वीच्या वेगवेगळ्या भागांवर राहणारे लोक कसे वेगवेगळे आहेत, व ते तसे कां आहेत, हें पाहूं.

---

## प्रकरण ३ रें

## बर्फाच्या प्रदेशांतील एस्किमो लोक

प्रथम आपण उत्तरेकडील शीत कटिबंधांतील प्रदेशाची सफर करूं, व तेथें कोणत्या प्रकारचे लोक राहतात, त्यांचीं घरें कशीं आहेत, ते काय खातात, कशा प्रकारचीं वस्त्रें वापरतात, काय उद्योगधंदे करितात वगैरे माहिती मिळवूं.

ह्या अगदीं उत्तरेकडील प्रदेशांत भयंकर थंडी असते. इकडे कधींहि सूर्य आकाशाच्या मध्यभागीं डोक्यावर येत नाहीं. त्यामुळें एथें राहणाऱ्या लोकांना भरपूर उजेड कधींच मिळत नाहीं. हा सर्व प्रदेश बर्फमय असतो. हिवाळ्यांत पाणी गोठून दगडासारखा घट्ट बर्फ होतो. या ठिकाणीं थंडीमुळें झाडें उगवत नाहींत. कांहीं ठिकाणीं फार तर एकदोन हात उंचीचीं झुडपें उगवतात, व उन्हाळ्यांत थोडीं फुलझाडें फुलतात.

एथें राहणाऱ्या लोकांना एस्किमो म्हणतात. हे लोक पिवळसर रंगाचे, ठेंगणे व चपट्या नाकाचे असतात. यांचें त्या प्रदेशांत कसें आयुष्य जात असेल बरें? झाड नाहीं, पान नाहीं, शेती नाहीं, जवळ गुरें किंवा घोडा वगैरें जनावरें नाहींत. मग हे लोक जगतात तरी कसे? माणसाला खायाला अन्न व शरिराला वस्त्र पाहिजे. एस्किमोच्या देशांत तर कडक थंडी असल्यानें किती तरी ऊबदार वस्त्रें त्याला पाहिजेत! पण अन्न काय किंवा वस्त्र काय, कोठून मिळतें? जमिनींतून? जमिनींत धान्य उगवेल तर त्यापासून अन्न मिळणार. कापूस पिकेल किंवा जवळ मेंढयांचा कळप असेल तर सुताचे किंवा लोकरीचे कपडे मिळणार. या दोन्हींहि गोष्टी एस्किमोच्या देशांत अशक्य. मग ते काय करीत असतील? मनुष्याला कांहीं गरज असली, व ती भागविणारी वस्तु मिळत नसली तर तो अडून बसत नाहीं. तो त्या वस्तूऐवजीं दुसऱ्या एखाद्या नव्या वस्तूचा उपयोग करितो व आपलें काम भागवितो.

जमीन अन्नवस्त्र देण्यास तयार नाहीं म्हणून एस्किमो उपाशी किंवा थंडीनें कुडकुडून मरत नाहीं. तो आपलें लक्ष आपल्या शेजारींच असलेल्या समुद्राकडे वळवितो; व समुद्रांतून मिळणाऱ्या प्राण्यांवर तो आपल्या सर्व गरजा भागवितो.

आधीं आपण एस्किमोचीं घरें पाहूं. आपलीं घरें दगडाचीं, विटांचीं, लाकडांचीं किंवा नुसतीं मातीचीं असतात. एस्किमोचीं कशाचीं असतील बरें? तो दगड, विटा कोठून आणणार? त्याच्या देशांत जिकडे नजर फेकाल तिकडे बर्फाचे डोंगर! साऱ्या जमिनीवर बर्फाचे थरांवर थर!! आपण जसे लाकडें कापून त्यांच्या तुळया व खांब तयार करितों, किंवा करवतीनें लांबलचक व मोठाले दगड कापून त्यांचे घराजोगे तुकडे तयार करितों, त्याप्रमाणें तो

बापडा एस्किमो दगडासारख्या घट्ट झालेल्या बर्फाचे तुकडे पाडून, ते एकमेकांवर रचून त्यांचें घर तयार करितो. आधीं तो जमीन चांगली खोल खणतो, व आपल्या कुटुंबाला राहण्यासाठीं साधारण आपल्या एका खोलीइतका खड्डा तयार करितो. नंतर त्या खड्ड्यावर बर्फाचे ठोकळे एकावर एक अर्धगोलाकार रचून तो खड्डा झाकून काढतो कीं झालें. हें एस्किमोचें घर पाहा.



एस्किमोचें बर्फाचें घर, होडी व ढकलगाडी.

वाटी जमिनीवर पालथी ठेविली असतां, जसा तिचा आकार दिसतो तसा एस्किमोच्या घराचा आकार असतो. आतां या घरांत शिरण्याचें दार ? तो पहा चित्रांतला एस्किमो. एका अरुंद बोगद्यां- तून सरपटत आपल्या घरांत जात आहे. हेंच त्याच्या घराचें दार. त्या अर्धगोलाकार बर्फाच्या ठोकळ्यांच्या छपराला तो लहानसें भोक पाडत असतो; व त्या भोकाच्याच आकाराच बर्फाचा एक बोगदा बाहेर करितो. या बोगद्यांतून मान खालीं घालून रांगत रांगत जावें, तेव्हां एस्किमोच्या घरांत शिरतां येतें.

एस्किमोच्या घरांत भिंतीला लागून खोलीभोवतीं बर्फाचाच एक ऐसपैस बाक असतो. या बाकावर रात्रीं माणसें निजतात. त्या देशांत लाकडें नसल्यानें चूल किंवा शेगडी पेटवून शेकत बसण्याची सोय नाहीं. ही गरज एस्किमो आपल्या दिव्यानें भागवितो. आपल्या पणतीसारखी तो पणती करितो. उन्हाळ्यामध्यें तिकडे शेवाळें वाढतें त्याची तो वात बनवितो. आणि समुद्रांत सील या नांवाचे मासे असतात, त्यांपासून तेल पैदा करितो कीं झाला एस्किमोचा दिवा. हा दिवा रात्रभर मिणमिण जळत असतो. याचा उजेड फारसा नसला तरी याची उष्णता इतकी प्रखर असते कीं, एस्किमो निजतांना बहुधा अंगांतले सर्व कपडे काढून निजतो. मग त्याला शेगडीची काय जरूर? एस्किमो या दिव्यावरच आपले ओले कपडे वाळवितो. रात्रभर त्या खोल खड्ड्यांतील लहानशा खोलींत दिवा नेहमीं जळत असल्यानें त्याच्या चिकट काजळीचीं पुटेंच्या पुटें एस्किमोच्या अंगावर चढतात. त्यामुळें जरी त्याचा खरा रंग चिनी किंवा जपानी माणसांप्रमाणें पिवळसर आहे, तरी तो काळसर रंगाचा दिसतो. शिवाय एस्किमो जन्मांत कधीं स्नान करीत नसतो. मुलाला साफसूफ करावेंसें आईला वाटलें म्हणजे ती मांजरीप्रमाणें त्याचें अंग आपल्या जिभेनें चाटते कीं झालें. हें वाचून तुम्ही नाकें मुरडाल व एस्किमोंना नांवें ठेवाल. पण मी तुम्हांला विचारतों, जर तुम्हांला त्या देशांत नेऊन सोडलें तर तुम्ही तरी काय कराल? खास कधीं स्नान करणार नाहीं. स्नान करणार कशानें? पाण्यानें ना? पण त्या थंड प्रदेशांत वर्षाच्या कितीतरी महिन्यांत औषधाला पाणी मिळण्याची मारामार. मोठ्या प्रयासानें बर्फ वितळावा, तेव्हां पिण्याला पाणी मिळणार. मग स्नानाची गोष्ट दूरच राहिली. शिवाय भयंकर थंडींत कपडे काढून बर्फाच्या पाण्यानें स्नान करण्याची कोणाची छाती आहे?

एस्किमोच्या घरांत भांडींकुंडीं कांहीं सापडावयाचीं नाहींत. धान्यच नाहीं तर स्वयंपाक करणार कशाचा? सुताचे किंवा लोकरीचे कपडे किंवा अंथरूणपांघरूण हींहि नसावयाचीं. यांच्या ऐवजीं सील मासे व वालरस नांवाचा समुद्रांतील एक प्राणी यांच्या कातड्यांचीं अंथरुणें व पांघरुणें एस्किमोच्या घरांत असतात. बसायला सतरंजी किंवा चटई म्हणजे हीं माशांचीं कातडींच.

एस्किमोचीं दोन घरें असतात. वर सांगितलेलें बर्फाचें घर तें हिवाळ्यांतलें. उन्हाळ्यांत या घरांत तो राहात नाहीं. कारण या दिवसांत उन्हानें बर्फ वितळूं लागतो. मग बर्फाच्या घरांत राहून कसें चालणार? उन्हाळ्यांत एस्किमो तंबूंत राहातो. हे तंबू सील माशांचीं कातडीं एकमेकांस जोडून शिवून तयार केलेले असतात. तंबूंना मधोमध एकच खांब असतो.

एस्किमो कोणचें अन्न खात असतील याची साधारण कल्पना तुम्हांला आली असेलच. ते शेती करीत नाहींत. अर्थात् आपल्याप्रमाणें त्यांना भात, वरण, पोळ्या, भाकरी, भाज्या वगैरे पदार्थ खायाला मिळत नाहींत. त्यांच्याजवळ गाई, म्हशी किंवा शेळ्या नसतात. तेव्हां त्यांना दूध, लोणी, ताक, दहीं, तूप हेहि पदार्थ मिळत नाहींत. त्यांच्या देशांत फळांचीं झाडेंहि नाहींत. मग ते आंबा, पेरू, मुसंबीं, अंजीर वगैरे फळें कोठून खाणार? अंथरुणापांघरुणाप्रमाणें खाण्याचे पदार्थहि एस्किमोंना समुद्रांतूनच मिळतात. व म्हणूनच ते नेहमीं समुद्राच्या कांठीं राहतात. समुद्रापासून ते दूर राहाते तर खास उपाशी मरते. पूर्वीं लिहिल्याप्रमाणें तिकडच्या समुद्रांत सील नांवाचे मासे असतात; शिवाय मोठमोठे देवमासे व वालरस असतात. यांची शिकार करून एस्किमो त्यांचें कच्चें मांस खातो. 'एस्किमो' या शब्दाचा अर्थच मुळीं "कच्चें मांस

खाणारा माणूस " असा आहे. या कच्चा मांसाबरोबर तो देवमासा व सीलमासा यांची सपाटून चरबी खातो.

समुद्रांतल्या प्राण्यांपासूनच अन्न, कपडे, पांघरुणें, उन्हाळ्यांतलें घर इ. मिळत असल्यामुळें समुद्रावर शिकारीस जाणें एस्किमोला फार अवश्य आहे. हिवाळ्यांत समुद्राचें पाणी गोठून त्याचा बर्फ बनतो, व या बर्फाखालीं सील मासे लपलेले असतात; परंतु मधून त्यांना बर्फाच्या थराच्यावर मोकळ्या हवेंत श्वासोच्छ्वास करण्यासाठीं यावें लागतें. एस्किमो या बर्फाच्या थरावर अगदीं हालचाल न करितां तासचे तास स्वस्थ पडून राहतो. सील माशानें वर डोकें काढलें कीं एकदम अणकुचीदार भाला भोसकून त्याला तो मारतो व वर काढतो.

उन्हाळ्यांत बर्फ वितळून समुद्र मोकळा होतो. या वेळीं एस्किमो कयाक नांवाच्या चामड्याच्या होडींत बसून समुद्रांत मासे धरण्यास जातो. मागील चित्रांतील होडी पहा.

या होड्या फारच गमतीच्या असतात; व त्या तयार करण्यांत एस्किमोची हुशारी नजरेस पडते. ते देवमाशांचें हाड घेऊन त्याला कातडी लावून होडी तयार करितात. आपल्या होड्यांप्रमाणें या होड्या वरच्या बाजूस मोकळ्या नसतात. वरची बाजूसुद्धां कातड्यानें झाकलेली असते; फक्त एका माणसाचें शरीर होडींत शिरेल इतकें भोक ठेवलेलें असतें. बाकी सर्व खालीं वर कातड्यानें बंद. ही होडी अर्थात् फार हलकी असते. म्हणून तिच्यामध्यें बसतांना व बसल्या-वरही ती चालवितांना तोल संभाळणें फार कुशलतेचें काम असतें. जरा थोडासा झोक एकीकडे गेला कीं होडी उलटलीच. पण एस्किमोला लहानपणापासून ह्या होडया वल्हविण्याची संवय झालेली असते; त्यामुळें तो सहज तिच्यांत बसतो व वल्हवितो.

सदाकदां कच्चे मासे खावून एस्किमोला कंटाळा आला असता. मधून मधून तो तिरकमटा घेऊन शिकारीला जातो. या थंड प्रदेशांत उन्हाळ्यांत पांढरीं अस्वलें सापडतात, व कांहीं पक्षीही येतात. रेनडीयर नांवाचें एक प्रकारचें हरीण इकडे आढळतें. एस्किमो आपल्या तीरकमठ्यानें या हरणांची शिकार करितो. त्याच्याजवळ रेनडीयरांचे कळपच्या कळप असतात. उन्हाळ्यांत तो ह्या कळपांचा फन्ना उडवितो. तो मारलेल्या जनावरांचें ऊन ऊन रक्त उसाच्या रसासारखा घटाघटा पितो. एस्किमो आपला तीरकमटा समुद्रांतून वाहात आलेल्या लाकडाचा करितो व तिराला हाडाचें टोंक लावितो. एस्किमोचा नेम अगदीं अचूक असतो. लहान मुलें-सुद्धां उडणाऱ्या पक्ष्याला आपल्या तिरानें अचूक खालीं आणितात. पक्षी व अस्वलें हिवाळा सुरू होण्याच्या सुमाराला या प्रदेशाच्या दक्षिणेस कमी थंडी असलेल्या प्रदेशांत जातात. रेनडीयर मात्र एथेंच राहातें व आपल्या खुरांनीं बर्फ उकरून आंतील जमिनीवर उगवलेल्या लव्हाळ्यावर आपली उपजीविका करतें.

एस्किमो जमिनीवर बर्फावरून प्रवास करण्यासाठीं हाडांचा व वाहून आलेल्या लाकडांचा एक बिनचाकी गाडा तयार करितात. या गाड्याला चामड्याच्या वादीनें कुत्रीं जुंपतात. एस्किमोजवळ घोडा, गाय, म्हैस वगैरे जनावरें नसतात, असें मागें सांगितलें होतें. पण त्याच्यापाशीं कुत्रीं मात्र पुष्कळ असतात. हीं कुत्रीं मोटीं उग्र व दिसण्यांत अगदीं लांडग्यासारखीं असतात व हीं आपल्या धन्याप्रमाणें कच्चें मांस खाऊन राहतात. हीं कुत्रीं हाडांचा गाडा बर्फावरून घसरत घसरत वेगानें ओढून नेतात. मागील चित्र पहा.

**कपडे.**—एस्किमो अंगांत सील माशाच्या चामडीचे कपडे घालतो. हिवाळ्यांत तो अंगावर दोन कपडे चढवितो. पुरुष व स्त्रिया यांचा पोषाक सारखाच असतो. दोघांच्याहि कोटांना पाठीमागें झुली असतात. बायकांच्या कोटांची झूल मात्र फार मोठी असते. या झुलींचा उपयोग मुलांच्या झोळीसारखा करितात. बायका चालल्या म्हणजे त्यांच्या पाठकुळीला ऊबदार झुलीमध्यें त्यांचीं मुलें असतात.



एस्किमो व तिचा मुलगा.

जेव्हां अंगांत दोन कोट असतात तेव्हां आंतील कोटाच्या केसाची बाजू आंतल्या अंगाला असते व बाहेरच्या कोटाच्या केसाची बाजू बाहेर असते. लांबून पाहणाराला हे लोक केसाळ जनावरेंच आहेत असें वाटत असेल! कोटांप्रमाणेंच पायांत ते दोन जोडे घालतात, व त्यांच्या केसांच्या बाजू कोटांप्रमाणेंच असतात. हातांत ते केसाळ चामडयाचे हातमोजे घालतात. हें चामडें बहुधा कुत्र्याचें असतें. कुडतीं पक्षांच्या मऊ चामडयांचीं असतात.

कपडे तयार करण्याचें काम बायकांचें असतें. जनावरांचें चामडें दांतांनीं चावून चावून त्या मऊ करितात व मग त्यांचे कपडे बनवितात. त्यांची सुई म्हणजे अणकुचीदार हाड, व दोरा म्हणजे प्राण्यांचीं पोटांतलीं आंतडीं. शार्क नांवाच्या माशाच्या जबडयांच्या हाडांचा त्या चाकूसारखा उपयोग करितात.

**हत्यारें.**–एस्किमोंच्या तीरकमठ्याची माहिती वर आली आहे. याशिवाय ते शिकारीसाठीं भाल्याचा उपयोग करितात. दुसरें एक भाल्यासारखेंच एस्किमोंचें हत्यार असतें. लाकडाच्या लांब काठीला एका टोंकाला ते अणकुचीदार दगड किंवा हाड बांधतात व दुसऱ्या टोंकाला लहानशी दोरी बांधितात. समुद्रांत माशांची शिकार करितांना एस्किमो हा छोटा भाला माशांच्या पोटांत खुपसतो. तेव्हां तें अणकुचीदार हाडाचें टोंक माशांच्या पोटांत जातें व लाकूड वर तरंगून येतें. भाल्याच्या लाकडांना हे लोक फार जपतात. कारण त्यांच्या देशांत झाडेंच नाहींत, मग लाकडें कोठून मिळणार? समुद्रांतून वाहून कधीं काळीं येईल तेव्हां लाकूड मिळावयाचें. कांहीं एस्किमो लोक तर किनाऱ्याच्या ज्या भागांत लाकडें वाहून येतात अशा भागांतच घरें करून राहतात.

हे लोक मासे पकडण्यासाठीं हाडांचे गळ करितात. हे गळ आपल्या इकडच्या सुधारलेल्या देशांतील लोकांनीं तयार केलेल्या गळांपेक्षांहि चांगले असतात असें म्हणतात.

मनुष्य आपल्या परिस्थितीचा गुलाम आहे. तो जेथें राहातो तेथें जें मिळेल तें त्याला पतकरावें लागतें. या तत्त्वाचें उत्तम उदाहरण म्हणजे हे एस्किमो लोक होत; हें आतांपर्यंतच्या हकीकतीवरून दिसून येईल. तरी पण एस्किमोसुद्धां आहे त्या परिस्थितींत आपली हुशारी दाखवितो, फार सुबक अशीं हत्यारें बनवितो, होडया तयार करितो व मोठ्या कौशल्यानें त्या भर समुद्रांत वल्हवितो. तुम्हांआम्हांला जसा आपल्या गाडीघोडयांचा अभिमान वाटतो, तसा एस्किमोला आपल्या हाडाच्या बिनचाकी गाडयाचा वाटतो. तुम्ही जितक्या आवडीनें उसाचा रस पितां तितक्याच आवडीनें तो ताजें रक्त पितो. कदाचित् माशांची चरबी टाकून भातभाकरी घ्या

असें तुम्ही त्याला सांगितलें तर तें त्याला पटणार नाहीं. तुम्हीं त्याला पुण्यामुंबईस येऊन रहा म्हटलें तर तो कबूल होणार नाहीं. कारण कशीहि असली तरी ती त्याची जन्मभूमि आहे, व ती त्याला आवडणारच !

---

## प्रकरण ४ थें

## भयंकर उष्णतेच्या व मुसळधार पावसाच्या देशांतले खुजे लोक.

आतां आपण दुसऱ्या एका प्रदेशांतील लोकांकडे जाऊं. हा प्रदेश म्हणजे विषुववृत्तावरचा एक भाग. हा एस्किमोंच्या देशाच्या अगदीं उलट आहे. एस्किमोंच्या देशांत भयंकर थंडी तर या विषुववृत्ताच्या प्रदेशांत भयंकर उष्णता. या प्रदेशांत सारखा मुसळधार पाऊस पडत असतो. खूप पाऊस व भरपूर उष्णता असलेला प्रदेश झाडांना फार चांगला. या प्रदेशांत उंच उंच व एकमेकांस लागून दाट वाढलेल्या झाडांचीं विस्तीर्ण जंगलें आहेत. यांतील झाडें दोनशें फुटांइतकीं उंच आहेत. या झाडांच्या भोवतीं सापाच्या वेटोळ्यासारखा जाड वेलींचा वळसा असतो, व या वेली एका झाडावरून दुसऱ्या झाडावर चढून त्यांना जाळ्यांत बांधून टाकतात. दुपारच्या भर बारा वाजतांसुद्धां या जंगलांत अंधुक प्रकाश असतो. जमीन पाचोळा व झाडांच्या फांद्या यांनीं आच्छादलेली असते. वरून सारखा पाऊस पडत असतो; परंतु थंडी वाजत नाहीं. खालून जमिनींतून गरम वाफ वर जात असते. जंगलांत वारें येण्यास मार्ग नसतो, व उष्णतेमुळें अंगांतून घामाच्या धारा निघत असतात.

या जंगलांत अंगाला कडकडून चावणाऱ्या नाना प्रकारच्या माशा, डांस व इतर किडे असतात. मुंग्या तर कांहीं विचारूं नका. जरा जमिनीवर पाय ठेविला, कीं त्यांनीं पायावर हल्ला केलाच म्हणून समजा. यांशिवाय माकडें व खारी असतात. जंगली डुकरें, जंगली म्हशी, जंगली हत्ती, जंगली मांजरें, अगडबंब असे जंगली उंदीर असे अनेक जंगली प्राणी या जंगलांत फिरत असतात. रात्रीं वटवाघुळांच्या टोळ्यांच्या टोळ्या उडत असतात.

या अशा अरण्यांत कोण लोक राहात असतील बरें ? तुम्हांला वाटलें असेल अशा ठिकाणीं कसचीं माणसें राहतात ? जंगली प्राण्यांचेंच तें घर असावें. पण तसें नाहीं. एथेंहि माणसें राहातात. तीं असतात मात्र गमतीचीं. हें पहा चित्र. यांत एक आपल्याकडील ५॥–६ फूट उंचीचा माणूस उभा आहे व त्याच्या शेजारीं त्याच्या छातीपर्यंत लागणारा एक उघडा बोडखा ठेंगणा माणूस उभा आहे. अशा प्रकारचीं ठेंगणीं खुजीं माणसें या जंगलांत राहतात.



खुजेराव, त्याचें घर व हिंदी मनुष्य.

हीं खुजीं माणसें साधारणपणें आपल्याकडच्या चौदा वर्षांच्या मुलांइतकीं उंच असतात. तरी पण त्यांच्या अंगाची ठेवण चांगली असते. या खुजा माणसांतहि पुष्कळ प्रकार आहेत. कांहींजण

पिंगट रंगाचे व लाल केसांचे असतात, व कांहींजण काळ्याकुट्ट केसांचे असतात.

एस्किमोच्या देशांत सपाटून थंडी असल्यानें तो भले जाड दोनदोन कोट घालतो. परंतु खुजांच्या जंगलांत अंगांतून घामाच्या धारा निघण्याइतकी उष्णता असल्यानें ते जवळजवळ कांहींच कपडे घालीत नाहींत. कमरेला हातभर कपडा मिळाल्यास कपडा, नाहीं तर झाडांचीं पानें लाविलीं कीं सजले खुजेराव. या कपड्यांनीं कांहीं भागत नाहीं; दागिने पाहिजेतच. यासाठीं ही खुजी मंडळी आपल्या खालच्या ओठांना मोठालीं भोकें पाडतात, व त्यांत ऐटीनें जंगलांतल्या जनावरांचीं हाडें बसवून देतात.

यांचीं घरें कशीं असतील? एस्किमो बर्फाचें व कातड्याचें घर तयार करितो. खुजेराव जंगलांतलीं झाडें जाळून उघडी जागा करितात, व त्या जागेवर झाडांच्या फांद्या व पानें यांचीं घरें बांधतात. आधीं बारक्या फांद्या जमिनींत रोवतात, व वेली आणि केळींच्या व इतर झाडांच्या पानांचें छप्पर करितात. झोपडीला दोन दारें असतात व ती फारच ठेंगणी असते. वरील चित्रांतील खुजेरावांच्य मागची त्यांची झोपडी पहा. अर्थात् एस्किमोंप्रमाणें खुज्यांनासुद्धां सरपटत आंत जावें लागतें. दोन दारें ठेवण्याचें कारण शत्रू एका दारानें आंत शिरूं लागला तर दुसऱ्या दारानें पळून जाण्यास मिळावें. एका झोपडीमध्यें साधारणपणें आठ नऊ माणसें राहतात, व आपल्यांतल्या एका म्होरक्याची आज्ञा पाळतात. हा म्होरक्या त्यांचीं भांडणें मिटवितो, व एका जागेहून दुसऱ्या जागीं झोपडी केव्हां हलवायाची तें ठरवितो. कारण एस्किमोप्रमाणें खुजे लोकसुद्धां एकाच जागेवर घर करून राहत नाहींत. जिकडे भक्ष्य मिळेल तिकडे ते जात असतात.

तथापि खुजे लोकांच्या कांहीं जाती एकाच ठिकाणीं झोपड्या बांधून समुदायानें राहतात. या गांवांची रचना वर्तुळाकार असते, व त्यांच्या मधोमध त्या जातीच्या पुढाऱ्याचें घर असतें. गांवाच्या भोवतीं ठिकठिकाणीं खोल खड्डे खणलेले असतात व आसपास विषानें माखलेले लाकडांचे तुकडे टाकलेले असतात. ही खबरदारी शत्रूचा हल्ला आला असतां आपलें संरक्षण व्हावें या हेतूनें घेतली जाते हें उघड आहे.

घनदाट अरण्यांत शेती करणें फार कष्टाचें असतें. मोठमोठीं झाडें तोडावीं तेव्हां मोकळी जागा मिळावयाची, व मग तिच्यांत धान्य पिकवावयाचें. पण सारखा पाऊस पडत असल्यानें पीक येणें मुष्कील. जंगलांत वाटेल तितकीं जनावरें असतात, त्यांची शिकार करून त्यांचें मांस खावें याखेरीज खुजे लोकांना दुसरा मार्ग नाहीं. यामुळें हे लोक शिकार करण्यांत फार हुशार असतात. लहानपणापासून मुलांना तीरकमटा देऊन नेम मारण्यास शिकविण्यांत येतें. खुजे लोक इतक्या जलदीनें एका मागून एक बाण सोडतात कीं, पहिला बाण नेमलेल्या ठिकाणीं जाऊन पोंचण्यापूर्वीं एकामागून एक तीन बाण सोडतात. नेम चुकला कीं खुजेराव संतापून तीरकमट्याचे तुकडे तुकडे करितात.

खुजे लोक मनुष्याखेरीज वाटेल त्या प्राण्याचें मांस खातात. त्यांना विशेषतः माकडें, उंदीर, साप व पक्षी यांचें मांस फार आवडतें. गोगलगाया, पांढऱ्या मुंग्या व इतर बारीकसारीक किडे यांना ते तोंडीं लावितात. एस्किमोंप्रमाणें ते कच्चें मांस मात्र खात नाहींत. त्यांच्या बायका पुरुषांनीं शिकार करून आणलेलें मांस कोळशावर भाजतात.

मांसाशिवाय खुजे लोकांचें आवडतें खाद्य म्हणजे केळीं. एका बैठकीला ते साठ साठ केळ्यांचा फन्ना उडवूं शकतात असें म्हण-

तात. ते केळीच्या झाडावर मारलेल्या जनावराच्या मांसाचा तुकडा ठेवितात व तो तुकडा म्हणजे केळ्यांची किंमत समजून मग केळीं तोडतात. कधीं कधीं पिकल्यावर केळीचा घड ओळखितां यावा म्हणून तो कच्चा असतांना खुणेसाठीं आधींच त्यावर बाण रोवितात. रोवलेला बाण पाहिला म्हणजे मग तो घड त्या खुजाच्या मालकीचा झाला. मग दुसरा कोणी त्याला हात लावीत नाहीं.

खुजे लोक गळ टाकून मासे पकडतात. ते रानांत खड्डे खणून त्यांना पानांनीं झाकून ठेवितात, व जनावरें फसून खड्डयांत पडलीं म्हणजे मग त्यांना पकडतात. जंगली हत्तींना तर ते फार खुबीनें पकडतात. दुरून डोळ्यांवर बाण मारून ते हत्तींना आधीं आंधळे करितात, व मग त्यांना बाण मारीत मारीत त्यांच्यासाठीं तयार केलेल्या खड्डयांत आणून पाडतात व मग भाल्यानें भोंसकून ठार करितात.

खुजे लोकांना दाट जंगलांतील लहानसहान पायवाटा माहीत असतात. आपल्याला जेथें दाट वाढलेल्या झाडांखेरीज कांहींच दिसणार नाहीं तेथें हे खुजे लोक अचूक वाट काढून वाटेल त्या ठिकाणीं आपल्याला नेतील. एस्किमोला जसा समुद्र तसें खुजाला जंगल म्हणजे परसांतली भाजी !

ही खुजी मंडळी अगदींच अरसिक आहे असें नाहीं. ते नाचण्याचे फार शोकी आहेत. रात्रीच्या रात्री ते नाचण्यांत घालवितात. बरेचजण मिळून ते गोलाकार नाचतात. कांहींजण तीरकमट्यांच्या साह्यानें साथ करितात.

हे लोक भित्रे असतात. त्यांना परके लोक आवडत नाहींत. एखादा परका मनुष्य त्यांच्या जंगलांत शिरला, तर ते झाडांआड लपून त्याला बाण मारून ठार करितात.

त्यांची एकंदर स्थिति फारशी समाधानकारक नाहीं. वर्षांतून आठ महिने भयंकर पाऊस पडत असतो, व त्यामुळें भक्ष्य मिळणें फार कठीण जातें. उंदीर, बेडूक, किडे इ० जें मिळेल तें त्यांना खावें लागतें. सतत पाऊस पडत असल्यामुळें त्यांना नेहमीं सरदी खोकला होतो. जंगलांत राहणें आरोग्याच्या दृष्टीनें इतकें अनिष्ट आहे कीं, बिचारे खुजे लोक चाळीस वर्षांच्या पुढें सहसा जगत नाहींत.

---

## प्रकरण ५ वें

## सहारा वाळवंटांतील बदाउन लोक

आतां आपण खुजे लोकांच्या उत्तरेकडील 'सहारा' या नांवाच्या विस्तीर्ण प्रदेशाची सफर करूं. 'सहारा' या शब्दाचा अर्थ 'माणसांची वस्ती नसलेला भयाण प्रदेश' असा आहे. सहारा खरोखरीच भयाण आहे. आपला हिंदुस्थान देश आपल्याला एवढा मोठा वाटतो, पण सहारा हिंदुस्थानपेक्षां जवळ जवळ अडीचपट मोठा आहे. हिंदुस्तानांत आपण जिकडे जाऊं तिकडे मोठमोठीं गांवें, शहरें, शेतें, नद्या, पर्वत आपल्याला आढळतात; जिकडे जावें तिकडे माणसें आहेतच. सहारामध्यें असें कांहीं नाहीं. हें एक भलें थोरलें वाळवंट आहे. यांत नद्या नाहींत; पर्वत नाहींत; कांहीं नाहीं. सर्व मुलूख रेताड. जिकडे जाल तिकडे रेती. ही रेती एकाच रंगाची नसते. ती भुरकट, पिवळी किंवा पांढरी शुभ्र असते. कांहीं ठिकाणीं वाऱ्यानें रेती उडून येऊन तिच्या टेकड्या बनल्या असतात, तर कांहीं ठिकाणीं शेकडों मैलपर्यंत नुसतें सपाट वाळूचें पठार असतें. झाड नाहीं, झुडूप नाहीं, पक्षी नाहीं, कांहीं नाहीं. आपण पुण्याहून निघून थेट

इंदूरपर्यंत पायीं गेलों, व मध्यें वाटेंत माणसें नाहींत, शेतें नाहींत, घाट किंवा डोंगर नाहींत, अर्थात् दऱ्याही नाहींत, जनावरें–पाखरें नाहींत, विहिरी, तलाव, नद्या-नाले नाहींत, इंदूरपर्यंत थेट नुसता रेताड, निर्जल व ओसाड सपाट पठार आहे अशी मनाची समजूत करा म्हणजे सहारामधल्या एखाद्या पठाराची तुम्हाला कल्पना येईल.

या प्रदेशांत पाऊस जवळ जवळ पडतच नाहीं म्हटलें तरी चालेल. खुजे लोकांच्या जंगलाच्या अगदीं उलट प्रकार. पाऊस नाहीं, अर्थात् शेती नाहीं, हिरवेंगार कुरण नाहीं, व गुरेंही नाहींत. पाऊस नसल्याकारणानें दिवसा वाळवंटांतील वाळू भयंकर तापते व माणसांचा जीव कासावीस होईल, गुदमरेल इतकें उकडतें. रात्रीं वाळू एकदम थंड होते व सपाटून थंडी वाजूं लागतें. असें या प्रदेशाचें चमत्कारिक हवामान आहे.

परंतु सर्वच सहारा कांहीं असें निर्जल ओसाड वाळवंट नाहीं. सहारामध्येंसुद्धां कांहीं ठिकाणीं पाण्याचे झरे व विहिरी आहेत. या झऱ्यांच्या व विहिरींच्या भोवतीं लोक घरें करून राहतात व बागा आणि शेतीभाती करितात. वाळवंटांतील या झऱ्यांलगतच्या सुपीक स्थळांना 'ओयासिस्' म्हणतात.



ओयासिस्.

चला आपण सहारा वाळवंटांतल्या एका ओयासिसला (Oasis) भेट देऊं. तीं पाहा दुरून वाळवंटांत एकाच ठिकाणीं उंच उंच झाडें दाट उगवलेलीं दिसत आहेत. तीं खजुरीचीं झाडें. लांबून हीं झाडें दिसलीं कीं समजावें आलें ओयासिस्. कारण इतर ठिकाणीं पाऊस नाहीं, विहिरी नाहींत; तेथें झाडें कोठून उगवणार ?

कांहीं ओयासिस् लहान असतात; कांहीं मोठीं असतात. जेथें पाणी पुष्कळ, तेथें पुष्कळ माणसें वस्ती करून राहतात, व पुष्कळ खजुरीचीं झाडें उगवतात. जेथें एखादा लहानसा पाण्याचा झरा वाहात असेल तेथें थोडींच माणसें राहतात. फार माणसें राहिलीं, तर त्यांना पाणी पुरणार नाहीं, व तीं मरून जातील. मोठाल्या ओयासिस्मध्यें खजुरीचीं झाडेंही पुष्कळ असतात. 'बिस्क्रा' नांवाचें ओयासिस् म्हणजे एक शहर आहे. तेथें सुमारें दोन लाख खजुरीचीं झाडें आहेत.

बोलतां बोलतां आपण ओयासिसला येऊन पोंचलों. ती पाहा घरें. जीं मातीचीं घरें दिसतात, तीं सुखवस्तु लोकांचीं. त्यांच्या शेजारीं त्या खजुरीच्या पानांच्या झोपडया दिसतात त्या गरीब लोकांच्या. पाहा ह्या झोपडयांना खिडक्या नाहींत. घरांत कितीतरी अंधार आहे.

ह्या ओयासिसमध्यें राहणाऱ्या लोकांना 'बदाउन' म्हणतात. हे लोक मुसलमानी धर्माचे आहेत. आपल्या इकडे मुंबईस अरब जातीचे कांहीं लोक दृष्टीस पडतात, त्यांच्याचपैकीं हे बदाउन लोक आहेत. हे लोक ओयासिसमध्यें शेती करितात.. वास्तविक पाहतां सहाराची जमीन फार चांगली आहे. पाऊस पडता, किंवा तेथें कालव्यानें अगर अन्य तऱ्हेनें पाणी आणतां आलें असतें, तर सहारा म्हणजे पृथ्वीवरचें नंदनवन झालें असतें. बदाउन लोक

अभिमानानें म्हणत असतात, "आमच्या वाळवटांत नुसती काठी जमिनींत पेरा व तिला पाणी मात्र घाला, कीं तिचें झाड होईल." परंतु पाऊस नसल्यानें जमीन उत्तम असून वाया गेली. ईश्वरी कोप म्हणावयाचा— दुसरें काय? असो. ओयासिस्‌मध्यें पाण्याची सोय असल्यानें बदाउन लोक नारिंगें, लिंबें, ॲप्रिकट, आलिव्ह झाडें यांच्या बागा लावतात, व गव्हाचें आणि भाताचें पीक काढितात. खजुरीचीं झाडें तर प्रत्येकजण लावतो. जमीन इतकी सुपीक आहे कीं, एका वेळेला हे लोक तीन प्रकारचीं पिकें काढतात. खजुरीचीं उंच झाडें लावून त्यांच्याखालीं फळझाडें लावतात, व फळझाडांखालीं भाजीपाला काढितात. यांशिवाय ओयासिस्‌मध्यें सुंदर फुलझाडेंहि उगवतात. काय चमत्कार आहे पाहा! भोवतालीं शेकडो मैल नुसतें रखरखीत रेताड मैदान, व मध्येंच टीचभर जागेंत फळझाडें, फुलझाडें व नानाप्रकारचीं धान्यें यांची एकच गर्दी. ओयासिसच मुळीं लहान, मग त्यांतील शेतें कितीशीं मोठीं असणार? प्रत्येक बदाउनचें कोकणांतल्याप्रमाणें लहानसें शेत असतें, व त्याच्या भोवतीं तो मातीच्या भिंतीचें कुंपण घालतो. ठिकठिकाणीं विहिरी असतात, त्यांच्यांतील पाणी उंट लावून रहाटानें उपसून शेतांना दिलें जातें. पाण्याचें दुर्भिक्ष्य असल्यानें प्रत्येक शेतकऱ्याला अगदीं कामापुरतें पाणी मिळतें.

बदाउन लोक बकऱ्या व मेंढ्या पाळतात, व त्यांच्या लोकरीच्या घोंगड्या आणि सतरंज्या विणतात. ते मातीचीं भांडींहि तयार करितात. बदाउनांचा मुख्य व्यापार म्हटला म्हणजे खजुराचा. सर्व ओयासिस्‌मध्यें खजुराची जंगी देवघेव चालत असते व परदेशांत मोठ्या प्रमाणांत खजूर पाठविण्यांत येतो.

बदाउन लोकांचें मुख्य खाणें सुद्धां खजूरच. खजुराचे तिकडे

निदान शंभर वेगळे प्रकार आहेत. कांहीं प्रकारचे खजूर मऊ असतात; कांहीं कठीण असतात; कांहीं इतके वातड असतात कीं, दांतांनीं सुद्धां तोडवत नाहींत; कांहीं गोड असतात; कांहीं फिके असतात; कांहींत इतका रस असतो कीं, बदाउन लोक तो रस साठवून ठेवतात व त्याला खजूरीचा मध म्हणतात. हे लोक खजूर तसाच वाळवून, उकडून किंवा त्याचे नाना प्रकार करून खातात. खजुराला वाळवंटांतील भाकर म्हणतात. माणसांप्रमाणें जनावरांचेंहि खाणें खजूरच.

ओयासिस्‌मध्यें राहणारे बदाउन आपण पाहिले. पण सारेच बदाउन घरदार करून राहात नाहींत. या निरनिराळया ओयासिस्‌-मध्यें दळणवळण करण्यासाठीं, त्यांना हव्या त्या वस्तु आणून देण्यासाठीं, आणि त्यांचा खजूर व इतर पदार्थ विक्रीस नेण्यासाठीं इतर माणसें पाहिजेतच. हा देवघेवीचा धंदा कांहीं फिरते बदाउन करितात. ते नेहमीं सहारा वाळवंटांत एका ओयासिस्‌पासून दुसऱ्या ओयासिसला असे नेहमीं फिरते राहतात. ते ओयासिस्‌-मध्यें घरें किंवा शेतीभाती करीत नाहींत. सर्व सहाराभर भटकत असतात. रेताड मुलखांत पायीं चालणें अशक्य. दोन ओयासिस्‌-मध्यें कधीं कधीं पुष्कळच अंतर असावयाचें. अशा वेळीं पायीं चालून कसें भागणार? म्हणून देवानें या फिरत्या बदाउनच्या सोईसाठींच कीं काय उंट हा प्राणी उत्पन्न केला आहे. उंट नसता तर हे बदाउन कसें जगले असते कोण जाणे. वाळवंटाच्या मुशा-फरीसाठीं योग्य अशीच देवानें उंटाच्या देहाची रचना केली आहे. तो आपल्या कोठ्यांत पुष्कळ पाणी व मदारमध्यें चरबी साठवून ठेवतो. यामुळें वाळवंटांत त्याला पुष्कळ दिवस पाणी किंवा अन्न मिळालें नाहीं तरी चालतें. त्याच्या तोंडाची कातडी खूप कठीण

असते; म्हणून तो रेतींत उगवणारीं कांटेरी झुडपें सहज खातो. उंटाचें दूध व मांसही वेळीं प्रसंगीं बदाउनांच्या उपयोगीं पडतें. हे लोक उंटाच्या केसांचे दोरखंड, कपडे व पांघरुणें तयार करितात.

वाहनाची तरतूद झाली पण राहण्याला घर पाहिजेच. विंचवासारखें पाठीवर बिऱ्हाड असणाऱ्या या लोकांना दगडामातीचीं घरें काय कामाचीं ? त्यांना सुटसुटीत असा तंबूच



बदाउनचा तंबू.

पाहिजे. हे लोक बकरीचे व उंटाचे केस विणून तयार केलेल्या कपड्यांचे तंबू बनवितात. तंबूंना सहा पासून आठ खांब असतात. तंबूचे दोरही उंटाच्या केसाचे असतात. मध्यें पडदा लावून पुरुषांचा व स्त्रियांचा असे तंबूचे दोन वेगळे भाग पाडतात. दिवसाची बिछायत म्हणजे मऊ वाळू. रात्रीं वाळू फार थंड असते, म्हणून जाजमें, सतरंज्या अंथरतात व त्या जनावरांच्या लोकरीच्याच असावयाच्या. तंबूंत पाण्यानें व खजुरानें भरलेल्या उंटाच्या कातड्याच्या पिशव्या व दुधानें भरलेल्या बकऱ्याच्या कातड्याच्या लहान पिशव्या टांगलेल्या असतात. याशिवाय गालिचे, जाजमें, उशा, गरम पांघरुणें, खोगीर वगैरे सामान तंबूत असतें.

तंबूच्या शेजारीं उंट, घोडे, शेळ्या, मेंढ्या असतात. मुक्काम हलवायाची वेळ झाली कीं, लगेंच तंबू काढून एका उंटावर लादतात; दुसऱ्या उंटावर कपडे, पांघुरणें घालतात; व तिसऱ्यावर पाण्याच्या, दुधाच्या व खजुराच्या पिशव्या लादतात. बायका व मुलें उंटावर आणि पुरुष घोड्यावर बसतात.

बदाउन अरबांचें आपल्या घोड्यांवर मुलांप्रमाणें प्रेम असतें. दुपारी कडकडीत ऊन पडलें म्हणजे ते घोड्यांना तंबूत आणून आपल्या शेजारीं बांधतात. मुक्कामाला येऊन पोचल्यावर त्यांच्या खुरांना तेल चोळतात. हे घोडेही देखणे, शूर पण गरीब स्वभावाचे असतात.

या भटकणाऱ्या बदाउन लोकांचें अन्नही मुख्यतः खजूर व बकरीचें दूध आणि अडीअडचणीला उंटाच्या मादीचें दूध हें होय. दुसरें अन्न नसलें म्हणजे यांना उंटाचें मांसही खावें लागतें. याशिवाय ओयासिसमधल्या बदाउन शेतकऱ्यांकडून गहूं मिळाले तर त्यांच्या चपात्या करून हे लोक खातात.

यांचा सर्व जन्म भटकण्यांत जातो. मुलेंबाळें, बायका, नोकर-चाकर या सर्वांसह हे उंट, बकऱ्या व घोडे यांना घेऊन भटकत असतात. ओयासिसमधल्या लोकांना घोडे व खजूर विकून त्यांच्या मोबदला हे स्वतःसाठीं गहूं, कॉफी व कपडे, व घोड्यासाठीं जव घेतात. सहारा वाळवंटांत धान्य पिकत नसलें तरीं मिठाच्या खाणी आहेत. खाणींतून मीठ काढून तें ओयासिसमधल्या माणसांना पुरवावयाचें व त्याच्या मोबदला आपल्याला हव्या त्या वस्तु घ्याव-याच्या हाही बदाउन लोकांचा एक उद्योग असतो. त्याचप्रमाणें इतर वाटसरूंना वाट दाखविणें व इष्ट स्थलीं नेऊन पोचाविणें हाही एक त्यांचा मुख्य धंदा आहे.

वाळवंटांत चोरटे पुष्कळ असतात. वाटसरूंना गाठून ते त्यांची चीजवस्त लुटून नेतात. यामुळें बदाउन लोकांना आपलें संरक्षण करण्याचें वारंवार प्रसंग येतात. चोरटे अचानक छापे घालीत असल्यामुळें बदाउन लोक लढाईला नेहमीं तयार असतात. मुलांना ते लहानपणापासून शत्रूवर सफाईनें भाला कसा फेकावा याचें

शिक्षण देतात. तसेंच ते घोड्यावर बसण्यांत पटाईत करितात. या मुलांच्या शिक्षणाचा दुसरा विषय म्हटला म्हणजे आकाशांतील ताऱ्यांची माहिती. सहारा वाळवंटांत रस्ते वगैरे कांहीं नाहीं. आपण कोणत्या दिशेनें चाललों हें जाणण्यास एकच साधन असतें. तें म्हणजे डोक्यावरचे तारे. ताऱ्यांची माहिती नसली तर मनुष्य या वाळवंटांत वाट चुकून अन्नपाण्यावांचून खात्रीनें मरावयाचा.

चोरट्यांच्या भीतीनें बदाउन लोक टोळीटोळीनें फिरत असतात. एक टोळी म्हणजे एक फिरतें गांवच म्हणाना. तिच्यांत गुरेंढोरें, घोडे, उंट, मुलेंबाळें, नोकर-चाकर वगैरे पुष्कळ लटांबर असतें. या टोळ्यांना कारवान असें म्हणतात.



सहारांतील बदाउनांचा कारवान.

आपण आतां कारवानाबरोबर वाळवंटांत प्रवास करूं, म्हणजे आपणांस या प्रदेशाची बरीच चांगली कल्पना येईल, व रस्ता चुकावयाचीही भीति नको.

प्रवासाची तयारी करावयाची म्हणजे प्रथम आपल्याला चपळ उंटाची निवड केली पाहिजे. चांगले उमदे उंट दिवसांत १०० मैलांची मजल मारतात असें म्हणतात. यानंतर विश्वासू व हुशार अशा

फिरत्या बदाउन वाटाड्याची पारख करून त्यांची मजुरी ठरविली पाहिजे. नंतर प्रवासांत पुरेल इतकें पाणी कातड्याच्या पिशव्यांत भरून घेतलें पाहिजे. तसेंच दोनचार पिशव्या भरून खजूर पाहिजेच. नाहींतर उपाशीं राहावें लागेल. याशिवाय वाळवंटांतल्या प्रवासाला योग्य असे कपडे केले पाहिजेत. धोतर, कोट किंवा टोपी वाळवंटांत उपयोगाची नाहीं. तेथें वाऱ्यानें गरम गरम रेती उडत असते ती कानांत शिरावयाची. ते पाहा बदाउन लोक. त्यांनीं आपलें सगळें अंग कसें कपडयांनीं झाकलें आहे. आपल्याकडेही उत्तर हिंदुस्तानांत दुपारीं माणसें घराबाहेर पडतांना कान बांधून जातात. डोळयांना ऊन लागेल म्हणून आपल्याला उन्हाचा चष्माही बरोबर घेतला पाहिजे.

चला झाली तयारी. तो पहा कारवान निघाला. सर्वांच्या पुढें ते वाटाडे व कारवानाचे पुढारी चपळ उंटावर बसून चालले आहेत. त्यांच्या हातांत भरलेल्या बंदुका आहेत व ते इकडे तिकडे पाहात सावधगिरीनें चालले आहेत. त्यांच्यामागें त्यांच्या बायका व मुलें उंटावर बसून येत आहेत. त्यांच्या मागून ते पाहा चाळीस पन्नास ओझ्यानें लादलेले उंट येत आहेत. कांहींच्या पाठीवर खजूर, मीठ, लोकर वगैरे विक्रीचा माल आहे; व कांहींच्या पाठीवर तंबू, राहुटया, जाजमें, सतरंज्या आणि पाण्याच्या व इतर खाण्याच्या पदार्थांच्या चामडयाच्या पिशव्या आहेत. या पिशव्यांतील पाण्याला चामडयाचा वास मारतो, पण आपल्याला तेंच पाणी प्यालें पाहिजे. संवयीनें पुढें वाईट वाटणार नाहीं. कारवानाबरोबर तीं पाहा कुत्रे, घोडे व शेळ्या हीं चाललीं आहेत.

आपल्याला रेताड मुलखांतून जाणें आहे. एथें रस्ते नाहींत. दिवसां टेकडया, खडक वगैरेंच्या ओळखीच्या खुणांवरून व रात्रीं

ताऱ्यांच्या साहाय्यानें वाटाडे वाट काढीत असतात. आपल्याला त्यांच्या-मागें मुकाट्यानें गेलें पाहिजे. आपले सर्वांचे जीव त्यांच्याच स्वाधीन आहेत म्हणाना. जरा का ते वाट चुकले कीं पाण्यावांचून आपले प्राण गेलेच म्हणून समजा.

आपल्याला पहाटेस किंवा सूर्य मावळल्यावर प्रवास केला पाहिजे. दुपारीं मुक्काम केले पाहिजेत, कारण त्या वेळीं वाळवंटांत भयंकर उष्णता असते, व पायांखालची वाळू निखाऱ्यासारखी तापते. उंटाच्या पायानें ही वाळू आपल्या अंगावर उडण्याची भीति असते. आपण आपलें सगळें अंग कपड्यानें झाकून घेऊं.

ती पाहा मुक्कामाची जागा आली. नोकर लोक कसे तातडीनें तंबू व राहुट्या जमिनीवर ठोकूं लागत आहेत. ते पाहा, कांहींजण उंटांचे पाय काळजीपूर्वक तपासीत आहेत. ते दुसरे नोकर घोड्यांच्या पायांच्या खुरांना तेल चोळूं लागले पहा. या जनावरांच्या जिवांवर तर हा प्रवास करावयाचा. त्यांची निगा राखलीच पाहिजे. चला तंबूंत. पाहा कशीं छानदार जाजमें अंथरलीं आहेत. पिशव्यां-तील पाणी प्या. तोंपर्यंत कॉफी तयार होईल. पलीकडे पडद्या-आड घरघर आवाज सुरू झाला. आपल्या बरोबरीच्या बाया व मुली गहूं दळूं लागल्या. आपलें नशीब म्हणून आपल्याला गव्हांची पोळी खायाला मिळणार. नाहींतर खजूर खाऊन व शेळ्यांचें दूध पिऊन एकादशी करावी लागती. तीं मुलें पाहा, कशीं माकडांप्रमाणें खजुरीच्या उंच सरळसोट झाडांवर भराभर चढून जाऊन खजूर खाऊं लागलीं. तीं पलीकडचीं मुलें पाहा, भाल्यांची फेक करावयास शिकत आहेत.

आतांच पायांतले जोडे काढूं नका. वाळूनें पाय भाजून फोड येतील. ते पहा बदाउन पूर्वेकडे तोंड करून गुडघे टेकून काय करीत आहेत. ते मुसलमानी धर्माचे आहेत. मक्केच्या दिशेला

तोंड करून ते नियमानें रोज नमाज पडतात. मोठमोठ्या ओयासिसमध्यें आपल्याला यांच्या मशिदी आढळतील.

चला स्वयंपाक झाला. बसा जाजमावर. एथें पाटबीट कांहीं मिळणार नाहीं. शिजवलेला खजूर, पोळया, मांस व कसली तरी डाळ मिळून केलेलें कालवण हेंच आपल्याला खायला मिळणार. मेजवानीच्या प्रसंगीं ही बदाउन मंडळीं सबंध कोकरूंच्या कोकरूं विस्तवावर भाजतात. ते एक लोखंडाची सळई कोकराच्या पोटांतून आरपार भोसकतात, व ती सळई विस्तवावर ठेवून सर्व बाजूनें कोकरूं भाजतात. मग त्या आंतल्या सळईसह भाजलेलें कोकरूं आणून वाटतात. मग बदाउनराव सुरा घेऊन त्याचा एकेक तुकडा कापून तोंडांत टाकतात. हा झाला मेजवानीचा थाट. नेहमीं खजुरावर एकादशी केल्यावर मधून मधून असें पारणें फेडावें लागणारच.

असो. जेवण झालें. आतां शेगडीपाशीं आपण बदाउन लोकांच्या गोष्टी ऐकूं. काय भयंकर थंडी पडली आहे! याच ठिकाणीं दुपारीं किती तरी उकडत होतें! बदाउनांच्या गोष्टी ऐकावयाच्या नसल्यास चला झोपूं. चारपांच पांघुरणें गुरफटून घ्या. सकाळ उजाडली. गरमगरम कॉफी पिऊन व दोनचार खजूर तोंडांत टाकून निघण्याची तयारी करूं. चला. तें पाहा, नोकर लोकांनीं तंबूच्या घडया करून उंटांवर सामान लादलें. ते बदाउन घोड्यावर स्वार झाले. चला आपणही निघूं. पण थांबा. तें पलीकडे काय दिसत आहे? लांब पूर्वेकडे काळा कुट्ट ढग कसला दिसत आहे बरें? बघतां बघतां तो किती मोठा झाला, व जवळ येत चालला? हे सारे बदाउन घोडयांवरून व उंटांवरून लगबगीनें कां उतरले? काय म्हणतां? वाळूचें वादळ आलें? म्हणजे? भयंकर वारे सुटून त्यांने

वाळवंटांतली वाळू वर उडते, गरगर फिरत वाऱ्याबरोबर वेगानें वाहूं लागते. अरे बापरे! हें काय! भर दुपारीं अंधार पडला!! सर्व आकाशभर वाळूच वाळू. ते उंट पाहा, कसे जमिनींत तोंड खुपसून बसले आहेत. ते बदाउन काय करीत आहेत? उंटाच्या आड ते सपशेल जमिनीवर पालथे निजले. चला आपणही तसेच निजूं. नाहींतर या वाळूच्या वादळांत सापडून कोठेंतरी उडून जाऊं. डोकें अगदीं जमिनींत खुपसून निजा. कान बंद करा, वर बघूं नका. थांबा, गेलें वादळ. तो पाहा, हळू हळू सूर्य दिसूं लागला. आपल्या हिंदुस्तानांतही राजपुताना व मारवाड या रेताड प्रदेशांत अशा प्रकारचीं वाळूचीं वादळें होत असतात. त्यांना तिकडे "अंधी" असें म्हणतात.

हें पाहा, आपण आपल्या मुक्कामाला येऊन पोंचलों. वाटाड्यांनीं आपल्याला जपून सुरक्षितपणें आणलें. त्यांना चांगलें बक्षीस दिलें पाहिजे. बरें का?

---

## प्रकरण ६ वें

# नाईल नदीचीं संतानें

वाळवंटांतील रखरखीत धुळीचा तुम्हाला आतां कंटाळा आला असेल. नद्या नाहींत; अंग धुवायाला व प्यायाला पुरेसें पाणी नाहीं; हिरवींगार झाडें किंवा शेतें नाहींत असा मुलूख केव्हां सोडूं असें तुम्हांला झालें असेल. चला तर, तुम्हांला मी भयाण रेताड वाळवंटांतून पृथ्वीवरील अत्यंत सुपीक अशा प्रदेशांत नेतों. झाका डोळे. हे बघा, आलों आपण इजिप्त देशामध्यें. इजिप्त देश म्हणजे जगां-

तील एक मोठें आश्चर्य आहे. तुम्हाला कदाचित् खरें वाटणार नाहीं. तुम्ही आतां सुपीक, माणसांनीं गजबजलेल्या देशांत आलांत खरे, परंतु अद्यापि तुम्ही सहारा वाळवंटांतच आहांत. होय, इजिप्त देश हा सहारा वाळवंटाचाच एक भाग आहे. वास्तविक एथें नुसतें वाळूचें सपाट मैदान असावयाला हवें, पण पाहावें तर एथें सारें उलट.

हें असें कसें झालें? ही अशी जादुगिरी कोणीं केली? नाईल नदीनें. नाईल नांवाची एक मोठी नदी सहाराच्या कोपऱ्यांतून वाहात जाऊन समुद्राला मिळते. तिनें वाळवंटाला बागेचें रूप दिलें. ही नदी एका सरोवरांत उगम पावून शेंकडों मैल खडकाळ प्रदेशांतून खालीं उड्या घेत घेत सहाराच्या सपाट मैदानावर येते. एथें हिचें पात्र अर्थात् विस्तृत होतें. समुद्रापासून शंभर दीडशें मैलावर तिचे अनेक भाग होऊन तिचा पंख्यासारखा आकार होतो, व हे सर्व भाग समुद्राला मिळतात.

सहारापर्यंत येऊन पोचण्यापूर्वीं नाईलला निळी नाईल व काळी नाईल या दोन नद्या येऊन मिळतात. ह्या उंच पठारावरून वाहात येतात. हें पठार बिलकूल खडकाळ नसून त्याची जमीन मऊ भुसभुशीत आहे. पठारावर पुष्कळ पाऊस पडतो. पावसाचें सर्व पाणी या दोन नद्यांत येतें, व त्यांना पूर येतो. पावसाच्या पाण्याबरोबर पुष्कळ माती नद्यांमध्यें येते. यामुळें नाईल नदीला मिळतांना ह्या दोन्ही नद्या आपल्या पुराच्या पाण्यासह मनस्वी गाळ तिला जणूं काय अर्पण करीत असतात.

सपाट वाळवंटावर नाईलला पूर आला म्हणजे तिचें पाणी तिच्या दोन्ही तिरांपलीकडे कित्येक मैलपर्यंत पसरतें. पूर कमी झाल्यावर पाणी ओसरतें; परंतु दोन्ही तिरांवर वाहून आलेला मऊ मऊ गाळ

तसाच राहातो. दरवर्षी काळ्या व निळ्या नाईल नद्यांमुळें नाईलला पूर यावा, पुराचें पाणी भोवतालीं पसरावें, व त्याबरोबरचा गाळ पाणी ओसरल्यावर तेथेंच राहावा असा प्रकार हजारों वर्षांपासून इजिप्तमध्यें चालत आला आहे. दरवर्षी मऊ गाळाचे थरावर थर बसून नाईलच्या दोन्ही कांठच्या सहारा वाळवंटाच्या भागाचें तें रूक्ष स्वरूप नाहींसें होऊन तो अत्यंत सुपीक झाला आहे. साधारणपणें हे थरावर थर जमून नाईल कांठची जमीन वीसपासून चाळीस फुटांपर्यंत उभारली गेली आहे. दर शंभर वर्षांनीं या जमिनीच्या पृष्ठभागाची उंची सहा इंच वाढते असें म्हणतात.

पुराचें पाणी नाईलच्या दोन्ही बाजूंला जितक्या लांब जातें, तितक्या भागावर गाळ सांचून जमीन सुपीक होते. सुपीक भागापलीकडे दोन्हीही बाजूंस भयाण रेताड वाळवंट. नाईल नदीचें हें सुपीक खोरें फक्त नऊ दहा मैल रुंद आहे, पण सुमारें हजार मैल लांब आहे.



फेल्ला.

आतां आपण इजिप्तमधील शेतकऱ्यांची भेट घेऊं व ते आपल्या सुपीक जमिनीचा कसा उपयोग करतात तें पाहूं. इजिप्तच्या शेतकऱ्यांना फेल्ला म्हणतात.हे सर्व मुसलमान आहेत. तें त्यांचें चित्र पहा. त्यांनीं आखूड अशा विजारी व अंगांत पायघोळ निळ्या रंगाचा

सुती झगा घातला आहे. त्यांच्या डोक्याला लहानशी आपल्या इकडच्या पुरभय्यासारखी टोपी आहे. कांहींजण या टोपीवरून रंगीबेरंगी हातरुमाल गुंडाळतात. या फेल्लांच्या बायकाहि पुरुषांप्रमाणें विजारी घालतात. मात्र अंगावरून ओढणी व डोकीवरून एक लांब काळ्या रंगाच्या कापडाचा बुरखा घेतात. या शेतकऱ्यांचीं मुलें बहुधा नागवींच हिंडतात. सहारा वाळवंटच तें. वाळू नसली तरी हवा उष्णच. कपड्यांची तेथें काय जरूर? शिवाय जरूर असली तरी गरीब बिचारा फेल्ला मुलांबाळांच्या कपडयाला पैसा कोठून आणणार? जमीन सुपीक असो, कशी असो, शेतकऱ्यानें राबावें व स्वतः अर्धपोटीं राहावें हा जगाचा नियम आहे. त्याला फेल्लाही अपवाद नाहीं. बरेच फेल्ला श्रीमंत जमीनदारांच्या जमिनीवर नोकर म्हणून काम करितात. त्यांना वेतन फार थोडें मिळतें. कांहीं जणांच्या स्वतःच्या थोडयाबहुत जमिनी असतात.

चला आपण फेल्लांचीं घरें कशीं आहेत तें पाहूं. तें पाहा एक गांव. या गांवांत किती खजुराचीं झाडें आहेत? फेल्ला नाईल नदींतून वाहात आलेल्या मातीच्या विटा बनवून त्या उन्हांत चांगल्या कडकडीत सुकवून त्यांचीं घरें बांधतात. छप्पर गवताचें किंवा खजुरीच्या झाडांच्या पानांचें असतें व तें अगदीं ठेंगणें असतें. हीं घरें सारीं एकमजलीच असतात. यांना खिडक्या नाहींत. हीं कशीं एखाद्या बंद केलेल्या पेटीप्रमाणें दिसतात. यांच्यांत एक किंवा फार झाल्या तर दोन खोल्या आहेत. बिचाऱ्या फेल्लाच्या घरांत दोनचार चटया व मातीचीं थोडीं गाडगीं-मडकीं एवढाच संसार दिसतो. स्वयंपाकासाठीं आपल्याप्रमाणेंच मातीच्या चुली दिसतात; पण त्या घराच्या बाहेर आहेत. घराला धूर जाण्याला खिडक्या नाहींत, तेव्हां स्वयंपाक बाहेरच होणार. शिवाय, इजिप्त सुपीक झाला तरी साहारा वाळवंटच. त्यांत कधीं पाऊस पडावयाचा नाहीं. मग बाहेर स्वयंपाक

करावयाला काय हरकत? फेल्लांची निजण्याची सोय पाहिली का कशी आहे? त्यांनीं खोलीच्या भिंतीला लागूनच निजण्यापुरता ओटा बांधिला आहे. त्याच्यावर चटई घालून ते निजतात.

फेल्लांचें खाणें म्हणजे मका, गहूं किंवा डाळी यांची मोठी थोरली जाडीभरडी भाकर व तिच्याबरोबर भाज्या, अंडीं किंवा खजूर. हे लोक बहुधा मांस खात नाहींत, खाल्लेंच तर बहुधा म्हशीचें खातात. दूधही म्हशीचेंच. म्हशींचा फेल्लांना फार उपयोग होतो. आपल्या इकडील बैलांप्रमाणें इजिप्तमध्यें म्हशींचा शेतकामाकडे उपयोग कारितात. उंट व गाढव यांनाही या कामाकडे लावतात. तो पाहा तो शेतकरी नांगराला एक उंट व एक गाढव जुंपून जमीन नांगरीत आहे. हीं शेतें किती लहान लहान आहेत! प्रत्येकाला मातीच्या भिंतीचें कुंपण घातलें आहे. शेतांत तुम्हांला विहिरी आढळणार नाहींत. चोहोंकडे पाण्याचे लहान मोठे पाट शेताशेतांतून काढलेले आहेत. चोहोंकडे नाईल नदीच्या पाण्याच्या पाटांचें जणूं काय जाळेंच पसरलें आहे!

सर्वच शेतांना पाटाचें पाणी लागत नाहीं. पाऊस तेथें नसतोच. मग शेतीसाठीं पाणी कोठून आणीत असतील? ओळखा बरें! जून महिन्याच्या पहिल्या तारखेपासून नाईल नदीचें पाणी चढूं लागतें. तें आक्टोबर महिन्यापर्यंत सारखें चढत असतें. नदीच्या दोन्ही तीरांस लागून असलेल्या पांच सहा मैलांतील शेतांवर पुराचें पसरलेलें पाणी या चार पांच महिन्यांत ओसरत नाहीं. मग नोव्हेंबर पहिलीपासून तें ओसरूं लागतें व शेतें उघडीं पडतात. या शेतांवर आयता सांचलेला गाळ असतो. तो खताला उपयोगी पडतो. पाणी ओसरल्यावर शेतकरी त्या मऊ ओलसर जमिनींत सोन्याच्या मोलाचें पिक काढतात.

नदीपासून बऱ्याच अंतरावर असलेल्या शेतांना अर्थात् पाटाचें पाणी लागणार. हें अनेक प्रकारानें शेतांवर नेण्यांत येतें. एक ठराविक जुनी पद्धत आहे ती अशी :——शेतकरी नदींत किंवा नदींतून काढलेल्या कालव्यांत उभें राहून, टोपलीसारख्या बादलीनें पाणी उपसतात व तें नदीच्या किंवा त्या कालव्याच्या पेक्षां अधिक उंचीवर असलेल्या आपल्या शेताकडे जाणाऱ्या पाटांत फेकतात. म्हणजे तें पाणी त्यांच्या शेतांना मिळतें. काय हा प्रयास! इजिप्तमध्यें हजारों फेल्ला व त्यांचे मुलगे याप्रमाणें पाणी उपसून आपापल्या पाटांना देतांना तुमच्या दृष्टीस पडतील.

दुसरा एक प्रकार म्हणजे नदीला किंवा नदीलगतच्या कालव्याला कोकणांतल्या सारखा अनेक पोहऱ्यांचा रहाट लावतात. व ते पोहरे वरच्या बाजूला असलेल्या पाटांमध्यें रिचवितात. घाण्याच्या बैलाप्रमाणें डोळे बांधलेलीं गाढवें किंवा म्हशी हे रहाट चालवितात.

इजिप्तमध्यें असे सुमारें पन्नास हजार रहाट नाईल नदीचें पाणी उपशीत असतात. हे रहाट चालविण्यास एक लाख म्हशी किंवा गाढवें लागतात व शेतकऱ्यांचीं पन्नास हजार मुलें त्यांना हाकीत असतात.

पूर्वीं नाईलच्या पुराचें बरेचसें पाणी व त्याबरोबरचा गाळ समुद्रांत जात असे. त्याचा शेतीला कांहीं उपयोग होत नव्हता. अलीकडे इजिप्त देश हा इंग्रज सरकारच्या देखरेखीखालीं आला आहे. इंग्रजांनीं नाईलला ठिकठिकाणीं धरणें बांधून पाणी अडविलें आहे. आस्वानचें धरण सर्वांत मोठें आहे. तें सातमजली इमारतीइतकें उंच आहे; व त्याच्या भिंतीवरून एका वेळीं तीन गाड्या सहज जाऊं शकतील इतकें तें रुंद आहे. हीं धरणें पुराचें पाणी व गाळ अडवितात. पूर ओसरला म्हणजे धरणाच्या भिंतीच्या

पायथ्याला दारें असतात तीं उघडतात. म्हणजे त्यांतून पाणी व गाळ बाहेर पडून कालव्यांमधून शेतामध्यें नेण्यांत येतो.

आपल्या मुंबई इलाख्यामध्यें भंडारदरा येथील विल्सन धरण, भाटघर एथील लॉइड धरण, व सिंधप्रांतांत सिंधूनदीवर तयार होत असलेलें सक्कर एथील धरण हीं तीन धरणें आस्वान इतकीं किंबहुना त्यापेक्षांही अधिक प्रचंड आहेत. भाटघरचें धरण तर जगांत सर्वांत मोठें आहे. असो.

नाईल नदीच्या पाण्यावर फेल्ला वर्षांतून तीन पिकें काढतात. उन्हाळ्यांतलें पीक म्हणजे कपाशी, ऊस व भात होय. जुलै ते आक्टोबरमध्यें मका, भात व निरनिराळ्या भाज्या काढितात. नोव्हेंबर ते मे मध्यें सर्व प्रकारचीं धान्यें पिकतात. इजिप्तचें सर्वांत अधिक महत्त्वाचें पीक म्हणजे कपास. लाखों रुपये किंमतीचा कापूस तेथें पैदा होतो. इजिप्तचा कापूस फार मुलायम असतो; त्याच्याशिवाय नाजूक तलम कापड तयार होत नाहीं.

## २

## कायरोला भेट.

नाईल कांठच्या फेल्लांची आपण ओळख करून घेतली. आतां इजिप्तची राजधानी जी कायरो तेथें जाऊन शहरवासीयांची राहाणी कशी काय आहे तें पाहूं.

कायरोला आपण आगगाडीनें जाऊं. ही आगगाडी नाईलच्या जवळूनच जाते. आगगाडीच्या दोन्ही बाजूला भरगच्च पिकें दिसत आहेत. मधून मधून शेतांतून उंट, गाढवें व म्हशी चरतांना दिसतात. दर स्टेशनवर निळ्या रंगाचे लांब झगे घातलेलीं मुलें व मुली संत्रीं, ऊंस किंवा अंडीं विकत असतांना दिसतात. कांहीं बाया डोकीवर पाण्याच्या लांब सुरया घेऊन प्लॅटफार्मवर फिरत आहेत.

ते पाहा, लांबून मशिदींचें उंच मनोरे दिसत आहेत. तेंच कायरो शहर. ते पलीकडे उंच इमारतीसारखे दिसतात, ते कायरोचे प्रसिद्ध मनोरे. हें आलें स्टेशन. गाढववाल्या पोरांची कोण गर्दी! हीं गाढवें कशाला? अहो, इजिप्तमध्यें गाढवांचा मान फार. श्रीमंत लोक घोड्यांप्रमाणें इकडे गाढवांवरच बसतात. चला, आपल्यालाही बसायला ठरवा गाढवें. काय करतां, ज्या देशांत जावें तेथें तिकडील रिवाजांप्रमाणें वागलें पाहिजे. तीं पोरें कशीं मोडकें तोडकें इंग्रजी बोलतात पहा, 'My donkey, good donkey'. ठीक ठीक, बसा त्याच्यावर. तो पोरगा पाठीमागून गाढवाला आपल्या काठीनें पळवील.

शहरांत युरोपियन लोक राहातात, त्या भागांतील रस्ते किती मोठे व स्वच्छ आहेत पहा. इकडे बागबगिचेही पुष्कळ आहेत व छानदार बँडही वाजतो; पण शहराचा बाकीचा भाग इतका चांगला नाहीं. रस्ते अगदीं अरुंद व घाण आहेत. त्यांच्यांत पुष्कळ गर्दी असते. कांहीं लोक गाढवावर तर कांहीं उंटावर बसून जात आहेत. मुली डोकींवर उंच अशा मडक्यांत पाणी घेऊन चालल्या आहेत; आंधळे भीक मागत आहेत; गारुडी खेळ करीत आहेत; भिस्ती रस्त्यांत पखालींतून लोकांना पाणी पाजीत आहेत; रस्त्यांत मारे गर्दी उडाली आहे!

घरें कशीं बंद केलेल्या पेटीसारखीं व आपल्या माळवदी घरांप्रमाणें सपाट आहेत. खिडक्या जाळीच्या आहेत व दरवाजांवर नक्षीचें खोदकाम छान केलेलें आहे. बहुतेक सर्व घरांना पांढरा रंग दिलेला आहे. कायरोमध्यें कितीतरी मशिदी आहेत. फार उंच विस्तीर्ण इमारत दिसली कीं समजावें ही मशीद आहे. प्रत्येक मशिदीपुढें एक मोठा चौक असतो; व तेथें पाण्याचा हौद असतो.

नमाज पढण्यास आंत जाण्यापूर्वी लोक एथें आधीं हातपाय स्वच्छ धुतात.

मशिदींचा प्रार्थनेशिवाय शिक्षणाकडेही उपयोग होतो. मुसलमानांच्या शाळा मशिदींतच असतात. चला, आपण 'अझार' नांवाचें प्रसिद्ध विश्वविद्यालय पाहूं. एथें विद्यार्थ्यांना फी नाहीं व शिक्षकांना पगार नाहीं. शिक्षक शिकवण्या करून किंवा ग्रंथाच्या हस्तलिखित प्रती करून पोट भरतात. चार पांच वर्षांच्या मुलापासून सत्तर वर्षांच्या म्हाताऱ्यापर्यंत एथें विद्यार्थी आहेत. शिक्षणाचे विषय म्हणजे मुसलमानांचा अरबी भाषेंत लिहिलेला धर्मग्रंथ कुराण, बीजगणीत, व्याकरण, काव्य, अलंकार हे होत. विद्यार्थी तुकड्या करून जमिनीवर बसले आहेत व सर्वजण मागें पुढें डुलत कुराण पाठ करीत आहेत. कोणी अरबी भाषेंतील मुळाक्षरें शिकत आहेत. इजिप्तमध्यें मशिदींत भरणाऱ्या दहा हजार शाळा आहेत. या जुन्या पद्धतीच्या शाळांखेरीज प्राथमिक, दुय्यम, धंदे, अध्यापन, शेतकी, कायदा, वैद्यक वगैरे विषयांच्या शिक्षणसंस्था इजिप्त सरकारानें काढल्या आहेत. प्राथमिक शिक्षण अरबी भाषेंतून दिलें जातें.

आतां आपण बाजार पाहूं. पहा, रस्त्यानें किनारीचे मौल्यवान् झगे घातलेले लोक चालले आहेत. बुरखा घेतलेल्या सुंदर पोषाख केलेल्या बाया गाढवांवरून किंवा पायीं चालल्या आहेत व त्यांच्यापुढें त्यांचे काळे शिद्दी नोकर चालले आहेत.

एथें प्रत्येक प्रकारच्या जिनसांचा वेगळा बाजार आहे. सुंदर गालिचे विकतात तो तुर्की बाजार, घड्याळें व जवाहिरांचा बाजार, अत्तरांचा बाजार, पुस्तकांचा बाजार, खोदकाम केलेल्या वस्तूंचा बाजार, भांड्यांचा बाजार, मिठाईचा बाजार असे अनेक बाजार आहेत. दुकानदार फार सभ्य असतात. कांहीं मालाची चौकशी करावयाला जा, दुकानदार तुम्हांला आधीं दुकानाच्या ओट्यावर

बसवील, तुमच्या हातांत गरम गरम कॉफीचा प्याला देईल, मग पुढची बात.

कायरोंत तुम्हांला एक गोष्ट विशेष नजरेस पडली असेल. एथील लोक मुसलमान आहेत, पण दिसतात अगदीं युरोपियनांसारखे. हुबेहुब तितकेच गोरे. यांचे कपडेही युरोपियन पद्धतीचेच आहेत. फक्त डोक्याला तांबडी फेझ टोपी घालतात इतकेंच. इजिप्शियन स्त्रिया तुमानी, अंगरखा व जाकीट वापरतात. व बाहेर जातांना अंगावर झगा घेतात. त्या नेहमीं पायांत सपाता घालतात.

इजिप्त देश युरोपखंडाच्या अगदीं जवळ आहे. एथें हिवाळ्यांत हवा खाण्याला व प्रसिद्ध स्थळें पाहाण्याला दरवर्षीं हजारों युरोपियन लोक येतात. त्यांच्यासाठीं एथें मोठमोठीं हॉटेलें आहेत. शिवाय फ्रेंच, इटालियन, ग्रीक वगैरे सुमारें दीड लाख युरोपियन एथें कायमचे राहातात. इजिप्तचे बरेच लोक युरोपियन स्त्रियांशीं लग्न लावतात. इजिप्तचे पुष्कळ तरुण फ्रान्समध्यें शिकून येतात. कायरो-मध्यें लोकांना फ्रेंच भाषा चांगली समजते.

कायरोची खरी जम्मत तुम्हांला दिवसां दिसणार नाहीं. त्यासाठीं रात्रीं जागरण केलें पाहिजे. एथील लोक फार चैनी व रंगेल आहेत. रात्रीं बारा दोन वाजेपर्यंत हॉटेलांत किंवा उघड्यावर कॅफे नांवाचीं हाटेलें असतात, तेथें बसून कॉफीचा एक एक घोट सावकाश घेत, गाणें ऐकत किंवा नाच पाहात बसणें हा या लोकांचा रोजचा उद्योग. सर्व हॉटेलांत गाणें व नाच व बागांमध्यें बँडचें सुंदर वादन चालू असतें.

या रंगेल लोकांचें दुसरें आवडीचें ठिकाण म्हणजे हमामखाना. हमामखाना म्हणजे सार्वजनिक स्नानगृह. कायरोला पुरुषांसाठीं व स्त्रियांसाठीं अनेक हमामखाने आहेत. एथें अंगाची अगोदर चांगली चंपी करून मग स्नान घालण्यांत येतें. बायकांचा दुपारचा उद्योग

म्हणजे शेजारणीकडे ‘ बसायला ’ किंवा हमामखान्यांत स्नानाला जाणें हा होय.

हे लोक सकाळीं फराळ, दुपारीं जेवण व रात्रीं मुख्य जेवण करितात. हे मिठाई व फळें खूप खातात. कॉफी तर पाण्यासारखी पितात. त्यांचें दुसरें व्यसन म्हणजे तंबाखू. सर्व दर्जाचे लोक तंबाखू फार ओढतात. श्रीमंत स्त्रियांना सुद्धां ही संवय असते.

आतां आपण कायरो शहराजवळच असलेलीं जुन्या काळचीं स्मारकें पाहाण्यास जाऊं. नाईल नदीच्या उपकारामुळें इजिप्त देश फार सुपीक व संपन्न आहे. खाणें पिणें मिळण्याची ददात नसली म्हणजे मनुष्य ललितकलांची जोपासना करितो व वाङ्मय निर्माण करितो.

या नियमाप्रमाणें इजिप्त हा देश तेथील प्राचीन लोकांच्या अद्भुत व भव्य मनोऱ्यांविषयीं प्रसिद्ध आहे. कायरोपासून आठ मैलांवर असलेले तीन मनोरें आपण आधीं पाहूं. मनोरे हें इजिप्तच्या प्राचीन राजांच्या थडग्यांवर बांधलेलें प्रचंड दगडी काम. हे पांच हजार वर्षांपूर्वीं बांधलेले आहेत. सर्वांत मोठा मनोरा चारशें ब्यायशीं फूट उंच आहे. त्याच्या पायानें सुमारें तेरा एकर जागा व्यापली आहे.



मनोरे चढून जाण्याची रीत.

एकावर एक मोठे दगड पायरी पायरीनें रचून हे मनोरे बनविले

आहेत. खालीं पाया विस्तृत व वरचाभाग निमुळता होत गेलेला अशी यांची रचना आहे. मनोऱ्याच्या शिखरावर जाण्यासाठीं तीन माणसांची जरूर लागते. दोघे वर उभे राहून मुशाफराला वर ओढतात व खालून एकजण रेटीत असतो.

इजिप्त हा केवळ मऊ गाळानें बनलेला देश. तेथें मनोऱ्यांकरितां प्रचंड दगड कोठून आले? असें सांगतात कीं, अरबस्थानांतल्या डोंगरांतून शेंकडों मैलांवरून हे दगड आणिलेले आहेत. दगड आणण्याचा नुसता रस्ता तयार करण्यासच दहा वर्षें लागलीं. मोठा मनोरा बांधण्यास एक लाख गुलाम वीस वर्षें राबत होते काय ही राजेलोकांची हौस व महत्त्वाकांक्षा.

आतां आपण स्फिंक्स नांवाचा दगडाचा प्रचंड स्त्रीमुखी सिंह



स्फिंक्स अथवा स्त्रीमुखी सिंह.

पाहाण्यास जाऊं. हा सिंह बसलेला आहे. याचा खालचा थोडासा

भाग वाळूंत पुरला गेला आहे. ही आकृती खडक कोरून खोदून बनविलेली आहे. हा सिंह पांच मजली इमारती इतका उंच आहे. याची लांबी १४० फूट आहे. त्याचे पुढचे पाय ५० फूट लांब आहेत. डोकें इतकें मोठें आहे कीं, त्यानें एक मोठी खोली सहज भरेल. त्याच्या कानावर मनुष्य उभा राहीला तरी तो त्याच्या डोक्यापर्यंत पोहोंचावयाचा नाहीं. कान चार फूट व नाक साडेपांच फूट आहे. तोंडाचा जबडा इतका मोठा आहे कीं, तो उघडला गेला तर त्यांतून एखादा बैल सहज तोंडांत जाईल. हा राक्षसी दगडी पुतळा कोणी तयार केला, केव्हां केला, ह्याबद्दल कांहींच माहिती नाहीं. तरी तो ५।६ हजार वर्षांपूर्वींचा आहे हें खास.

मनोरे किंवा दगडी सिंहासारखीं प्रचंड स्मारकें पाठीमागें ठेऊन जाणाऱ्या प्राचीन काळच्या राजे लोकांचीं प्रेतें अजून आपल्याला कायरोच्या पदार्थसंग्रहालयांत पाहण्यास सांपडतात. पांच सहा हजार वर्षे प्रेतें जशींच्या तशींच राहणें म्हणजे मोठी अद्भुत गोष्ट आहे. त्या वेळचे लोक एक प्रकारचा मसाला प्रेताच्या अंगाला लावून तीं लाकडी पेटींत बंद करून ठेवीत. परवां त्या पेट्या उघडून लोकांनीं पाहिलें तों जणूं काय नुकताच मृत्यु झाला आहे, अशीं तीं प्रेतें दिसलीं. काय त्या जुन्या काळच्या लोकांची हुशारी वर्णावी !

---

## प्रकरण ७ वें

## मध्य -आफ्रिकेंतील निग्रो लोक.

सहारा वाळवंटाच्या दक्षिणेस बदाऊन अरबांची हद्द संपते व निग्रो नांवाच्या लोकांच्या हद्दीला सुरवात होते. वाळवंटाच्या दक्षिणेस असलेल्या 'सुदान' नांवाच्या विस्तीर्ण प्रदेशांत, व त्याच्या दक्षिणेस

त्याच्या इतकेंच विस्तीर्ण असलेल्या कांगो नदीच्या खोऱ्यांत हे लोक राहतात. त्यांच्या हजारों निरनिराळ्या जाती आहेत. या सर्वांचे रीतिरिवाज, भाषा वगैरे एकमेकांहून भिन्न आहेत.

निग्रो लोक शाईसारख्या काळ्याकुट्ट रंगाचे असतात. त्यांचे ओठ फार जाड असून केस कुरळे व जाड लोकरीसारखे असतात. नाकें चपटीं असतात. उत्तर आफ्रिकेंतील उजळ रंगाच्या लोकांशीं लग्नव्यवहार होऊन, जी निग्रोंची मिश्र जात उत्पन्न झाली आहे, तिला बांटू म्हणतात. बांटू लोक निग्रोइतके काळे नसतात व त्यांचे ओठही जाड नसतात.


निग्रो

निग्रोंच्या इतक्या जाती आहेत व त्या जातींचे रूपरंग, पेहराव, चालीरीती इतक्या वेगवेगळ्या आहेत कीं, सर्व जातींची माहिती या पुस्तकांत देणें अशक्य आहे. उत्तरेकडे बदाउन अरबांच्या सहवासानें तिकडचे निग्रो मुसलमान झाले आहेत व खाणेंपिणें, उद्योगधंदे वगैरे बाबतींत सुधारले आहेत. त्याचप्रमाणें समुद्र किनाऱ्याच्या लगतच्या भागांतील निग्रो लोकही व्यापारासाठीं तेथें येऊन राहिलेल्या युरोपियन लोकांचा सहवास घडून पुष्कळ सुधारले आहेत. हे दोन भाग सोडून देऊन अफाट अशा मध्य आफ्रिकेकडे नजर फेकली, म्हणजे रानटी अवस्थेच्या निरनिराळ्या पायऱ्यांवर असलेल्या असंख्य निग्रो जाती आपल्या दृष्टीस पडतात.

मध्य आफ्रिका हा प्रदेश विषुववृत्तावर असल्यानें, तेथें भयंकर

उष्णता असते. या प्रदेशांत खूप पाऊस पडत असतो. मोठमोठ्या नद्या, सरोवरें व निबिड अरण्यें यांचें हा प्रदेश माहेरघर आहे. खुजे लोक याच प्रदेशांतील अरण्यांत राहतात. भूपृष्ठभाग सपाट नसल्यानें या प्रदेशांतील नद्यांना अनेक धबधबे आहेत व ते वाहतुकीला अडथळे आणितात. सिंह, हिपोपोटॅमस्, हत्ती, गेंडा वगैरे प्राणी या भागांत स्वैर संचार करीत असतात. नद्यांलगतची जमीन सुपीक असल्यानें एथें शेती उत्तम प्रकारें होऊं शकते.

उत्तरेकडील अरब किंवा समुद्र किनाऱ्यावरील युरोपियन यांचें साहचर्य झाल्यानें कांहीं निग्रो अंगांत थोडेबहूत कपडे घालतात; परंतु मध्य आफ्रिकेंतील निग्रो स्त्रीपुरुष जवळ जवळ नग्न राहतात. निग्रोंच्या कांहीं जाती अशा आहेत कीं, त्यांतील लोक अंगावर बिलकुल कपडे घालीत नाहींत. उष्णता फार असल्यानें निग्रोंना अंगावर कपडे घ्यावेसें वाटत नाहीं. त्यांत त्यांचा कांहीं दोष नाहीं. आपण नाहीं का उन्हाळ्यांत दुपारीं खुशाल अंगांतील कुडतें काढून पंखा घेऊन हुश्श हुश्श करीत बसत. मध्य आफ्रिकेंत आपल्या इकडच्या पेक्षां कितीतरी उकडतें! निग्रोला आपण मध्य आफ्रिकेंतून उचलून उत्तर ध्रुवाजवळ एस्किमोच्या शेजारीं नेऊन बसविलें तर तो कधीं नागवा फिरणार नाहीं. पटकन् चामड्याचे एक सोडून दोन कोट अंगावर चढवील. उलट एस्किमोला मध्य आफ्रिकेची हवा दाखविली तर तो ताबडतोब आपले जाडेभरडे केसाळ कोट फेकून देऊन खुशाल नागवा फिरेल. जसा देश तसा वेश! जे निग्रो नागवे राहात नाहींत ते कमरेला चामड्याचे नाहीं तर झाडांच्या सालीचें पटकुरें गुंडाळतात. समुद्राजवळचे निग्रो मात्र युरोपियन लोकांनीं विलायतेंतून आणलेले भडक रंगाचे कपडे वापरतात. त्यांना रंगीबेरंगी कापड फार आवडतें. त्यांच्या बायका रंगीबेरंगी हातरुमाल डोक्याला गुंडाळतात.

कपडे फारसे लागत नसले तरी निग्रोंना दागिन्यांची हौस फार. नागवे राहतील, पण दागिन्यांवांचून त्यांचें चालावयाचें नाहीं. असें म्हणतात कीं कसल्याही प्रकारचें होईना अंगावर वस्त्र घेण्याची जगांत प्रथम कल्पना सुचण्यास थंडीवाऱ्यापासून शरिराचा बचाव किंवा लज्जारक्षण हे हेतु कारण झाले नसून आपण सुंदर दिसावें हाच हेतु कारण झाला असावा. आफ्रिकेंतील दागिने घालून नागवें फिरणाऱ्या निग्रोंच्याकडे पाहिलें म्हणजे हें म्हणणें आपल्याला तात्काळ पटतें.

दागिने सोन्याचांदीचेच असतात असें नाहींत. ते वाटेल त्या वस्तूंचे व वाटेल त्या प्रकारचे असूं शकतात. ज्या निग्रोंना सोनें मिळूं शकतें ते सोन्याचे गोट, कडीं, तोडे, भिगबाळ्या घालतात. सोनें नाहीं, तेथें हस्तिदंताच्या कड्यांवर तहान भागवून न्यावी लागते. स्त्रिया लहानपणींच भले जाड जाड अनेक हस्तिदंती तोडे पायांत घालतात. ते इतके जड असतात कीं, त्या बायांना चालण्याला त्रास होतो. लहानपणीं घातलेले हे तोडे मरेपर्यंत पायांत असावयाचे. कांहीं जातींत लोखंडाच्या माळा गळ्यांत व पायांत घालावयाची चाल आहे. कांहीं निग्रो बाया पितळेच्या तोड्यांची माळ गुडघ्यापासून पायापर्यंत घालतात. कांहींजणी काचेच्या मण्यांचे हार गळ्यांत लटकवितात. कवड्यांची तर हौस कांहीं विचारूं नका. आपल्या इकडच्या बाया जशा पोलक्यांना लेस लावितात त्याप्रमाणें त्यांच्या निग्रो भगिनी आपल्या सर्व कपडयांना कवड्यांची लेस लावित असतात. याशिवाय गळ्यांत कवड्यांचे हार, केसांत कवड्यांचे दागिने, कवडयांचे बाजूबंद, कवडयांच्या मुदी, गळ्यांत चिंचपेट्या, जिकडे बघावें तिकडे मारे कवडयांची रेलचेल. कांहीं बाया कानाच्या पाळीला भोंक पाडून, लाकडाचा मोठा

तुकडा अडकवितात; तर कांहींजणी हातापायांत तारांचें जाळें घालतात.

निग्रो स्त्रीपुरुषांच्या केशरचनेच्या रीति विचित्र व विविध प्रकारच्या असतात. कांहींजण केसांना तेल व माती चोपडून त्यांचे नाना-प्रकारचे आकार बनवितात. कांहीं बाया केस डोकीस गुंडाळून, डोक्यावर केसांचीं दोन शिंगें उभीं करितात; कांहींजणी केसांच्या लहान लहान बटा खालीं सोडतात. कांहीं निग्रो केसांची उभारलेल्या पंख्यासारखी रचना करितात. कांहींजण वेगवेगळ्या ठिकाणचे केस काढून टाकून, मधून मधून झुपके ठेवितात. कांहीं अजिबात केस काढितात, तर कांहीं पैशाएवढा घेरा कोठेतरी ठेवितात. स्त्रिया व पुरुष दोघेही केसांत कवडयांचे झुपके गुंफतात किंवा पक्ष्यांचीं पिसें खोवतात.

निग्रो लोकांची दुसरी एक विचित्र चाल म्हणजे तोंड व छाती गोंदण्याची होय. प्रत्येक जमात वेगवेगळ्या आकृती गोंदवते. तोंडावर व छातीवर गोंदलेल्या पट्टयांवरून तो निग्रो कोणत्या जमातीचा आहे हें ओळखतां येतें.

निरनिराळ्या ठिकाणचे निग्रो त्या त्या ठिकाणच्या परिस्थिती-प्रमाणें उद्योगधंदे करितात. कांहीं निग्रो डोकीइतके उंच गवत उगवत असलेल्या सपाट मैदानांत राहातात. गवताची विपुलता असल्यानें हे लोक शेळ्या, गाई, गाढवें, घोडीं व उंट पाळतात. या भागांत सिंह वगैरे क्रूर रानटी पशु असल्यामुळें निग्रो लोक आपल्या घराभोंवतीं कुंपण करून, त्याच्या आंत आपलीं पाळींव जनावरें ठेवितात. संवयीमुळें एथील लोकांना सिंहाची भीति वाटत नाहीं. निग्रोचें एखादे पोर सुद्धां गांठ पडली तर सिंहाशीं सामना करतें.

गवत कापून काढून जमिनीची मशागत करून शेती करणें सोपें आहे. यामुळें गवती मैदानांतल्या या निग्रोंचा दुसरा धंदा म्हणजे शेती होय. या भागांत तांदूळ, गहूं, मका, तंबाखू, कापूस, भाजीपाला व फळफळावळ चांगलीं पिकतात. शेतांवर पुरुषांपेक्षां स्त्रियाच जास्त राबतात. कोंकणांतल्याप्रमाणें हे लोक आधीं जमीन भाजून काढतात; नंतर कुदळीनें खणून काढतात.

निग्रो लोक तांदुळाचा भात करून किंवा भाकरी करूनही खातात. ते गहूं मका यांच्या भाकरी करितात. निग्रोंना मकेच्या पिठाची खीर फार आवडते. हे लोक खिरीचें भांडें मध्यें घेऊन बसतात व एकजण चमचानें खिरीचा भुरका मारून चमचा शेजारच्यास देतो व पाळींपाळींनें असे भुरके मारीत ते खीर संपवितात. नंतर ताजें दूध पितात. कधींकधीं हे लोक बकरींचें व गाईचें मांस खातात.

कपाशी चांगली गुडघाभर झाली म्हणजे बायका व मुलें कापूस वेंचतात व बायका कापसाचे पंचेवजा कापड विणतात. निग्रो बाया नेहमीं गुलामासारख्या राबत असतात. कष्टाचीं सर्व कामें त्यांनाच करावीं लागतात. त्या शेती करितात व त्याच नद्यांत नावा वल्हवितात. डोकीवर ओझीं घेऊन दूरच्या बाजारच्या गांवीं माल विकण्यास जाण्याचें काम त्यांच्याकडेच असतें.

निग्रो लोक पुष्कळ बायका करितात. जितक्या जास्त बायका तितकी श्रीमंतीही जास्त अशी त्यांची समजूत असते. शिवाय तितके मजूर जास्त.

शेतीखेरीज इतर उद्योगही हे लोक करितात. ते लोखंड शुद्ध करितात व त्याच्या तरवारी, कात्र्या, भाले, खंजीर, चाकू, आंगठ्या, हार, गोठ वगैरे वस्तु तयार करितात. ते पाळलेल्या जनावरांच्या चामडयाचे खोगीर, लगाम व पिशव्या करितात व मातीचीं सुबक

मडक्ीं बनवितात. तसेंच नानाप्रकारच्या टोपल्या करण्यांतही हे लोक फार हुषार आहेत. हस्तिदंताचें कोरीव कामही ते सुबक करितात.

कांगो, नायगर वगैरे नद्यांच्या कांठीं राहाणारे निग्रो नावा तयार करण्यांत फार कुशल आहेत. कांहीं निग्रो तर नेहमीं नावांतच घरें करून राहातात. नदी ओलांडून जाण्यासाठीं हे लोक बांबू व वेली यांचे मोठ्या कुशलतेनें पूल करितात. नदीकांठचे निग्रो विशेषतः माशांवर वर आपली उपजीविका करितात व थोडीबहुत शेतीही करितात.

जंगलाच्या आसपास असलेले निग्रो लोक रानटी हत्तींची शिकार करितात व हत्तीचे दांत गोऱ्या व्यापाऱ्यांना नेऊन विकतात. क्रू नांवाचे निग्रो आपल्या इकडच्या घाटी लोकांप्रमाणें सशक्त व हाडां-पेरांनीं मजबूत असतात. हे आगबोटीवर खलाशांचीं व धक्यावर हमालांचीं कामें करितात. हे क्रू लोक रंगानें काळे असले तरी नाकां-डोळ्यांनीं इतर निग्रोंपेक्षां पुष्कळ बरे दिसतात व मोडकें तोडकें इंग्रजीही बोलतात.

नद्यांच्या रहदारीपासून दूर असलेले कांहीं निग्रो जाती अगदी रानटी आहेत. हे निग्रो माणसें मारून त्यांचें मांस खातात. शत्रूचें मांस खाणें त्यांना भूषणावह वाटतें. लढणाऱ्या शत्रूला ते मोठ्या दिमाखानें म्हणतात, "थांब, बचंजी, तूं उद्यां माझ्या पोटांत अस-शील." या लोकांच्या बाजारांत माणसांचें मांस विकत मिळतें. नरमांस खाण्यास मिळावें म्हणून हे लोक मुद्दाम दुसऱ्या जातींच्या लोकांवर हल्ला करून, त्यांना कैद करून आणितात. गुलामांना ते चांगलें खाऊंपिऊं घालून पोसतात व मग त्यांचें मांस खातात.

इकडे गुलामगिरीची चाल फार जुनी आहे. परजातीच्या माण-साला पकडून त्याला आपला गुलाम बनवून राबविण्याची निग्रोंची

वहिवाट आहे. फार वर्षांपूर्वीं उत्तर आफ्रिकेंतील अरब व्यापारी निग्रोंना जबरदस्तीनें पकडून किंवा विकत घेऊन त्यांना गुलाम करून कैरो, दमास्कस, बगदाद, बसरा वगैरे शहरीं विकीत असत. प्रत्येक तुर्क किंवा अरब घरांत ऐपतीप्रमाणें निग्रो गुलाम असत. राजे-लोकांच्या जनानखान्यांवर हेच नोकर असत.

युरोपियन लोकांनीं जेव्हां अमेरिका खंडाचा शोध केला, तेव्हां तिकडे शेतांवर राबण्यास त्यांना मजूर हवे होते. म्हणून त्यांनीं अरब व्यापाऱ्यांचें अनुकरण करून, लाखों निग्रोंना पकडून गुलाम करून अमेरिकेंत नेलें व त्यांच्यांकडून आपली कपाशीची शेती नांवारुपास आणविली. आज अमेरिकेंत निग्रो गुलामांचे लाखों वंशज राहात आहेत. त्यांच्या बुकर टी. वाशिंग्टन या पुढाऱ्याचें नांव प्रसिद्ध आहे.

तथापि हे रानटी निग्रोही आतां सुधारत चालले आहेत. नरमांस खाण्याचें पुष्कळ निग्रोंनीं सोडून दिलें आहे व गुलामगिरीची चालही आतां बंद होत चालली आहे.

निग्रोंचीं घरें मातीचीं व त्यांचीं छपरें गवताचीं असतात. छप-राचा भाग दरवाजाच्या पुढें आणून बाहेरचा व्हरांडा बनवितात. या उघड्या जागीं निग्रो लोक दिवसां झोपतात किंवा गप्पा मारीत बस-तात. बहुतकरून त्यांच्या गांवांभोवतीं मातीचीं गांवकुसें असतात. कांहीं ठिकाणीं जवळचे नातलग एकमेकांशेजारीं घरें बांधितात व त्या सर्वांच्या भोंवतीं एक मोठा मातीचा तट बांधितात. एका गांवांत अशा अनेक पेठा असतात. हे लोक धान्याच्या पिशव्या उंचावर टांगून ठेवतात. कारण वाळवी लागण्याची भीति फार. यांच्या घरांत अर्धचंद्राकार असा एक लाकडाचा तुकडा असतो. ही त्यांची उशी. या उशीवर मान ठेऊन डोकें तसेंच लोंबकळत

ठेऊन ते निजतात. तेलमाती चोपडून ऐटीनें बांधिलेले केस विसकटूं नयेत म्हणून ही यातायात. अशाच प्रकारची गमतीची उशी जपानमध्यें आपणांस पाहाण्यास मिळेल.

निग्रोंच्या जमाती नेहमीं एकमेकींशीं भांडत व लढत असतात. त्यांच्या गांवाभोंवतीं खुजेलोकांच्या प्रमाणें खंदक, व विषानें माखलेल्या काठ्या असावयाच्या. गांवकुसूंही भक्कम असतें. प्रत्येक जातीची फौजही नेहमीं तयार असते. दाहोमे या ठिकाणच्या राजाजवळ तर पूर्वीं बायकांची पलटण होती. लहानपणींच त्यांना हत्यारें वापरण्यास शिकवीत व त्यांना लग्न करण्याची परवानगी नसे. त्यांचा सारा जन्म लढण्यांतच जाई.

निग्रो लोकांचा जादूटोणा व चेटूक यांवर व भुतांखेतांवर फार विश्वास असतो. झाडेंझुडपें, गुहा वगैरे ठिकाणीं ते भुतें आहेत असें मानतात. त्यांच्यांत चेटक्यांचें फार माहात्म्य. चेटके सांगतील तें काम हे लोक डोळे मिटून करितात. प्रत्येक निग्रोजवळ जनावराचा मंतरलेला दांत किंवा पक्ष्याचें पीस अगर नख अथवा अशीच कांहीं वस्तु असते. या मंतरलेल्या वस्तु जवळ असल्या म्हणजे आपल्याला दुखणें येणार नाहीं किंवा लढाईंत आपला पराभव होणार नाहीं असें त्यांना वाटतें. दुखणें आलें किंवा कांहीं वाईट झालें तर शत्रूजवळची मंतरलेली वस्तु अधिक प्रभावशाली असली पाहिजे असें ते समजतात. ते दगडांच्या ओबडधोबड अक्राळविक्राळ मूर्तींची पूजा करितात. या देवतांविषयीं त्यांना प्रेम वाटत नसून भीति वाटत असते. तिनें आपलें वाईट करूं नये किंवा शत्रूचें वाईट करावें म्हणूनच ते तिला भजत असतात. देवता म्हणजे मनुष्याचें वाईट करूं शकणारी शक्ति ही त्यांची समजूत.

मनुष्य मेल्यावर सुद्धां कोठेंतरी जिवंत राहातो व त्याला इह-

लोकच्या सर्व वस्तु लागतात अशी यांची समजूत आहे. म्हणून त प्रेताबरोबर खाण्यापिण्याच्या व आवडीच्या वस्तु पुरतात. पूर्वी तर कोणी मनुष्य मेला कीं त्याच्या प्रेताबरोबर त्याच्या बायका व गुलाम यांना ते जिवंत पुरीत असत.

आतां या कल्पना व चाली जात चालल्या आहेत. ख्रिश्चन मिशनरी लोकांनीं धाडसानें मध्य आफ्रिकेंतील या प्रदेशांत प्रवेश करून ठिकठिकाणीं शाळा घातल्या आहेत व त्यामुळें रानटी निग्रोंच्या राहाणींत व आचारविचारांत पुष्कळ फरक पडत चालला आहे.

निग्रोंना तांब्याच्या व चांदीच्या नाण्यांची माहिती नाहीं. ते देवघेवीसाठीं अनेक वस्तूंचा नाण्यांप्रमाणें उपयोग करितात. कवड्या व शिंपा हीं सार्वत्रिक नाणीं आहेत. याशिवाय सुया, टांचण्या, तारांचे तुकडे, रंगीबेरंगी कापड हीं कांहीं ठिकाणचीं नाणीं आहेत. कांहीं ठिकाणीं हातरुमालांचें महत्त्व फार. एक हातरुमाल देऊन कितीतरी वस्तु विकत मिळतात. कोठें निळ्या कांचेच्या मण्यांची तर कोठें लाल मण्यांची किंमत जास्त. बऱ्याच ठिकाणीं पितळेच्या तुकड्यांचा किंवा मिठाच्या खड्यांचा नाण्यासारखा उपयोग करितात. कांहीं मिठाचे खडे देऊन एक गुलाम खरेदी करितां येतो. तुम्ही एकाद्या निग्रो दुकानदाराला शेळीची किंमत काय म्हणून विचारलें, तर तो कदाचित् 'मिठाचे अमुक खडे किंवा कांचेचे इतके मणी अगर ५।६ हात लांब कापड' अशा प्रकारचें उत्तर देईल.

---

## प्रकरण ८ वें

# कुरणांतले किरगिज

आतांपर्यंत आपण बदाउन, इजिप्शियन, निग्रो व खुजे या आफ्रिकेंतील लोकांची माहिती मिळविली. या प्रकरणांत मध्य आशियांतील किरगिज नांवाच्या लोकांची भेट घेऊं.

किरगीज लोकांचा देश म्हणजे एक फार मोठें सपाट मैदान आहे. या मैदानांत झाडें नाहींत व साधारण उंच अशीं झुडपेंही नाहींत. जिकडे बघावें तिकडे गुडघाभर उंचीचें गवत वाढलेलें. अशा प्रदेशांत राहाणारे लोक काय करीत असतील बरें? मैदानांत रानटी जनावरें नाहींत तेव्हां ते शिकारी होणार नाहींत. पाऊस अपुरा असल्यानें ते शेतकीही करूं शकणार नाहींत. अर्थात् गवत विपुल असल्यामुळें ते गुरें पाळून आपली उपजीविका करीत असतील. होय, हेंच खरें.

किरगिज लोक काळेही नाहींत व गोरेही नाहींत. त्यांचा रंग तांब्यासारखा आहे. त्यांचे डोळे बारीक व तिरपे असून गालांचीं हाडें वर आलेलीं असतात. या लोकांची संख्या सुमारें तीस लाख आहे.

यांच्यापाशीं बकऱ्या, मेंढ्या, उंट, गाढवें व घोडे यांचे मोठमोठे कळप असतात. इतक्या जनावरांनिशीं ते जर एकाच ठिकाणीं घर करून राहिले, तर त्या ठिकाणचें गवत केव्हांच संपून जाईल. गुरांना व मग अर्थात् त्यांना यामुळें उपाशी राहाण्याची पाळी येईल. यासाठीं किरगिज लोक बदाउनांप्रमाणें नेहमीं फिरते राहातात व बदाउनांप्रमाणें तंबूतच राहातात. बरें, या लोकांनीं तंबू कशाचे करावे? एस्किमो जवळच्या समुद्रांतील सील माशाच्या कातडीचे तंबू करितात, बदाऊन जवळच्या उंटांच्या कातडीचे करतात. किरगिजही अर्थात् पाळलेल्या जनावरांच्या कातडीचेच तंबू करणार.

किरगिजांचे तंबू चांगले ऐसपैस असतात. आधीं कनाती लावून मग ते छत बसवितात. लाकडांच्या लांबकाठयांचा ते छताला आधार देतात. कनाती मागें पुढें ओढतां येण्यासारख्या असतात. यामुळें तंबू हवा तितका लहानमोठा करितां येतो.

तंबूंत लोंकरीचे छानदार गालीचे व जाजमें अंथरलेलीं असतात. निग्रोंच्या घरांत असतात तशीं मडकीं एथें सांपडणार नाहींत हें उघडच आहे. त्यांची भांडींकुंडीं लांकडांचीं किंवा चामड्यांचीं असतात. फुटायतुटायची भीति नाहीं, कांहीं नाहीं. शिवाय हीं भांडीं तयार करावयाला जवळच्या कळपांत साधनेंही नेहमीं तयार.

एका कुरणांतून दुसऱ्या कुरणांत जातांना आधीं घोडयांना नेतात. कोंवळेंकोंवळें चांगल्या प्रतीचें गवत खाण्याचा पहिला मान घोड्यांचा ! त्यांच्यानंतर गाई येतात. गाई व घोडे यांना आवडत नसलेलें व म्हणून शिल्लक राहिलेलें बारीक गवत शेळया मेंढ्यांना मिळतें. घोडयाला इतका मान देण्याचें कारण तो किरगिजांच्या फार उपयोगीं पडतो. तो असतो म्हणूनच किरगिजांना शेंकडों गुरांची राखण करितां येते.

किरगिज टोळया करून फिरतात. ते गवताचीं कुरणें आपसांत वांटून घेतात. एका टोळीच्या कुरणांत दुसऱ्या टोळीनें येऊं नये असा निर्बंध असतो. आली तर भांडण जुंपतें व मारामारी सुरू होते. या कुरणांच्या देशांत पाण्याचें दुर्भिक्ष असतें. पाण्याचे झरे असतात अशा ठिकाणींच किरगिज मुक्काम करितात. ते साधारणपणें तीनचार आठवडयांत आठदहा मैल चालतात. त्यांची चाल इतकी सावकाश असण्याचें कारण बरोबरीच्या शेळ्यामेंढया. त्या सावकाश चरत चरत चालत असतात. उन्हाळ्यांत जेव्हां मैदान फार तापतें व पाणीही मिळेनासें होतें तेव्हां किरगिज त्यांच्या देशाला लागून असलेल्या

डोंगरांवर वस्ती करितात व पावसाळा सुरू झाला म्हणजे परत आपल्या मैदानांत येतात.

कधीं कधीं कळपांत फार गुरें जमतात. मग किरगिजांचें त्यांच्या वांटयाच्या कुरणांत भागत नाहीं. त्यांच्या मालकीच्या कुरणांतील गवत संपून जातें. अशा वेळीं ते दुसऱ्या टोळीच्या कुरणांत जबरदस्तीनें घुसतात. दुसऱ्या टोळीच्या कुरणांतील गवताची व पाण्याची चोरी करण्यांत त्यांस कांहीं वाटत नाहीं. उलट अभिमान वाटतो. 'किरगिज' या शब्दाचा अर्थच मुळीं चोर असा आहे. दुसऱ्या टोळीची चोरी करण्यांत किरगिजांना अभिमान वाटत असला, तरी ते आपल्या टोळींतील माणसांची चोरी कधींही करावयाचे नाहींत. आपल्या भाईबंदाची चोरी केली तर किरगिजाला तात्काळ देहान्त शिक्षा मिळते !

किरगिज थोडाबहुत व्यापारही करितात. दरवर्षीं ते आपल्या शेजारच्या देशांत जातात व तेथील व्यापाऱ्यांना आपले घोडे व गुरें विकून त्यांच्या मोबदला धान्य, कपडे वगैरे घेतात.

किरगिजांचें मुख्य खाणें त्यांच्या पाळीव जनावरांचें मांस होय. त्यांना बकरीची सागुती विशेष आवडते. सणासुदीला ते घोडयांचें मांस खातात. सबंध दिवसभर त्यांना पिण्याला पाणी मिळालें नाहीं तरी त्यांचें चालतें. तसेंच अन्नावांचून ते कित्येक दिवस राहूं शकतात. मात्र या अशा लंघनानंतर मांस दृष्टीस पडलें म्हणजे ते इतकें खातात कीं मग त्यांना चालतां येत नाहीं ! ते भाकरी खात नाहींत. डाळीचें गरगट करून तें पितात. चहा पिण्याची त्यांना फार आवड. ते परदेशांतील व्यापाऱ्यांपासून गुरें देऊन चहाच्या विटा घेतात. चीन, तार्तरी वगैरे देशांमध्यें विटांच्या आकाराच्या चहाच्या मोठ्या वड्या करून त्या वडया विकतात. त्यांना ' विटांचा चहा '

असें म्हणतात. किरगिजांचें पेय म्हणजे दूध. दुधापासून ते लोणी व 'कूमीस' नांवाचें एक पेय तयार करितात. चामडयाच्या पिशव्यांत १०।१५ दिवस दूध ठेवून त्या पिशव्या ते वारंवार हालवतात. कांहीं वेळानें दूध नासतें व त्याला ताकासारखी चव लागते. हें किरगिजांचें कूमीस. कूमीस थोडें अधिक प्याल्यास माणसाला नश येतो.

किरगिज लोक 'कफ्तान' नांवाचा पोकळ झगा अंगांत घाल-तात. हा झगा जनावरांच्या केसांचा किंवा कापडाचा केलेला असतो. झग्याखालीं पिवळया किंवा लाल रंगाच्या चामडयाच्या विजारी असतात. ते गुडघ्याइतके उंच बूट घालतात व विजारीचीं टोंकें बुटाला बांधून टाकतात. झग्याखालीं चामडयाचींच कुडतीं असतात. डोक्याला मेंढराच्या चामडयाची टोपी घालतात. झग्यावर चामडयाचा कमरपट्टा असतो. फार मोठ्या कळपांचे मालक आपल्या श्रीमंतीला शोभेल असे मखमलीचे झगे घाल-तात, कमरपट्टे, आणि घोडयांचे खोगीर व लगाम यांना चांदीसोनें लावितात व त्यांवर हिरे जडवितात. बायका पुरुषांसारखाच पोशाक करितात. मात्र मेंढरांच्या केसांच्या टोपीऐवजीं त्या डोकीला पांढरें कापड गुंडाळतात.


कफ्तान व कातडयाची टोपी घातलेला किरगिज.

पुरुषांना घोडयांवर बसून आपल्या कळपांची राखणी करावयाची असते, किंवा मारामारी अगर चोरी करावयाची असते, म्हणून त्यांना इतर कामें करावयास फुरसत मिळत नाहीं. घरचीं सर्व कामें स्त्रियाच करितात. त्याच मुक्काम हलवितांना तंबू व त्यांतील सामान

बांधून उंटांवर लादतात. त्या नवीन ठिकाणीं तंबू ठोकून सामानाची मांडणी करितात. त्यांनाच दूध काढावें लागतें. हें काम फार त्रासाचें आहे. कारण गाई, बकऱ्या, मेंढ्या आणि घोडया इतक्यांचें दूध काढावयाचें. घोडयांचें दूध तर दिवसांतून तीन वेळां काढावें लागतें.

किरगिज बायांना नटण्याची फार हौस आहे. त्या आपलीं तोंडें रंगवितात व पावडरही लावितात. केंसांत घोडयांच्या केसांचें गंगावन घालतात. दागिनेही पुष्कळच घालतात.

किरगिज मुलीचें लग्न वयाच्या पंधराव्या वर्षापूर्वींच होतें. नवऱ्या मुलाला नवरीच्या बापाला हुंडा द्यावा लागतो. हुंडा म्हणजे शेळ्या, उंट वगैरे जनावरें! सुंदर मुलीला सहज पन्नास उंट किंवा शंभर शेळ्या इतका हुंडा मिळतो. कुरूप मुलीचा सौदा एकदोन उंटावरच पटवावा लागतो.

किरगिजांच्या कुटुंबांत पुष्कळ माणसें असतात. मुलें, मुली, सुना, नौकरचाकर वगैरेंनीं घर भरलेलें असतें. घरांत जितकीं जास्त माणसें तितकीं गुरें राखावयास व दूध काढावयास जास्त मदत. ज्या कारणासाठीं निग्रो अनेक बायका करितो, त्याच कारणासाठीं किरगिज पुष्कळ माणसें घरांत नांदणारी कुटुंबपद्धति पसंत करितो.

तुम्हांस वाटत असेल गरीब बापडा किरगिज जन्मभर वणवण करीत भटकत असतो; तेव्हां त्याला अशा भटकण्याचा कंटाळा येत असेल. छे, बिलकूल नाहीं. उमद्या घोडयावर बसून मोकळ्या हवेंत फिरण्याची किरगिजाला मौज वाटते; उघडयावर आकाशांतील तारे पाहात पाहात झोपीं जाणें त्याला आवडतें. घरें करून एकाच जागीं राहाणाऱ्या तुमच्या माझ्यासारख्या माणसांची त्याला कींव वाटते. आपल्याला असें एकाच ठिकाणीं राहाण्याचा कंटाळा कसा

येत नाहीं, याचें त्याला नवल वाटतें. त्याला आपल्या घोडे, उंट, शेळ्या, गाई यांच्या कळपाचा मोठा अभिमान वाटतो. असे कळप दुर्दैवानें ज्याला लाभले नाहींत अशा तुमच्या माझ्यासारख्या माणसांच्या गरिबीबद्दल त्याला वाईट वाटतें. मग बोला, वणवण करीत भटकणाऱ्या किरगिजांबद्दल तुम्हांला आतां दया येते कां ?

---

## प्रकरण ९ वें.

## रेशमाच्या देशांतले चिनी लोक

आतांपर्यंत आपण अडाणी लोकांमध्यें फिरलों. कोणी भयंकर थंडीमुळें, तर कोणी भयंकर उष्णतेमुळें, कोणी वाळवंटामुळें तर कोणी निबिड अरण्यामुळें रानटी स्थितीमध्यें राहिले आहेत व तिच्यांतच समाधान मानीत आहेत. प्रतिकूल परिस्थितीला ते चिकाटीनें टक्कर देत आहेत. याबद्दल त्यांचें आपण कौतुक करणें योग्य आहे. परंतु त्यांचें कौतुक करितांना ते सुधारणेच्या अगदीं खालच्या पायरीवर उभे आहेत व पशूप्रमाणें खाणेंपिणें व झोंपणें हीच त्यांच्या आयुष्याची इतिकर्तव्यता आहे हें आपण विसरून चालावयाचें नाहीं.

आतां देवाच्या दयेनें भौगोलिक परिस्थिति अनुकूल असल्यामुळें ज्या लोकांना सुखासमाधानानें जगांत राहातां येतें आणि विद्या व कला प्राप्त करून घेतां येतात अशा कांहीं सुधारलेल्या लोकांकडे आपण वळूं.

आरंभीं आपला उत्तरेकडील शेजारी व आपल्याइतकाच जुन्या संस्कृतीचा जो चीन देश त्याच्याकडे मोर्चा वळवूं. चीनचा व

आपला ऋणानुबंध फार जुना आहे. तेथें जो बौद्ध धर्म प्रचलित आहे, तो आपण चीनला दिला. प्राचीन काळापासून विद्वान चिनी प्रवासी स्वधर्माच्या जन्मभूमींतील पवित्र स्थळांच्या दर्शनास व आपल्या धर्मग्रंथांचा अभ्यास करण्यास हिंदुस्थानांत येत असत. एथील विश्वविद्यालयांत त्या वेळीं दहा दहा हजार विद्यार्थी असत ! याशिवाय हिंदुस्थानांतील विद्वान् पंडितांना चीनच्या राजदरबारांत फार मान मिळत असे.

आपल्याप्रमाणेंच चीनचाही भूतकाल फार उज्ज्वल होता. चीननें छापण्याच्या कलेचा शोध केला. युरोपांतील लोक वल्कलें नेसून रानांत भटकत फिरत होते. त्या वेळीं चिनी लोकांनीं बहुमोल अशीं पुस्तकें लिहिलीं व छापलीं. चीननेंच कागद कसे तयार करावेत तें जगाला शिकविलें. होकायंत्राचा शोध चीनमध्येंच झाला. चीननेंच प्रथम रेशमी वस्त्रें विणलीं व अनेक शतकेंपर्यंत सर्व जगाला तीं एकट्यानें पुरविलीं. हा असा वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध देश आपण आतां पाहाणार आहोंत.

उत्तरेस हिमालयाची दुर्लंघ्य तटबंदी व इतर बाजूंनीं समुद्राचा वळसा, या भौगोलिक परिस्थितीमुळें हिंदुस्थानाला स्वस्थपणें आपल्या संस्कृतीची जोपासना आणि संवर्धन हीं करितां आलीं. चीनची चतुःसीमा अशीच त्याला अनुकूल झाली. दक्षिणेस अजस्र हिमालयासारखा रखवालदार; पूर्वेस तीन साडेतीन हजार मैल पॅसीफिक महासागराचा खडा पहारा; उत्तरेस वैराण व अत्यंत थंड अशा सैबेरियाचें कुंपण; व पश्चिमेस उंच उंच डोंगरांचा आणि निर्जल वाळवंटाचा आसरा. यामुळें विस्तीर्ण असूनही चीन देश परवां परवांपर्यंत अगदीं पेटीसारखा बंद होता व त्यामुळें त्याला आपली संस्कृति निर्भेळ ठेवितां आली. या सुरक्षित स्थितीचा दुसरा

असा परिणाम झाला कीं, आपली संस्कृति काय ती श्रेष्ठ आणि परकी संस्कृति व कल्पना हीन अशी चीनची अहंमन्य बुद्धि बनली व त्यामुळें अलीकडच्या तरुण बलिष्ठ राष्ट्रांनीं थपडा मारून जागे करीपर्यंत वृद्ध चीन अफूच्या गुंगींत भूतकाळचीं स्वप्नें पाहाण्यांतच दंग झाला होता. चिनांत पितृपूजेचें बंड असल्यामुळेंही कदाचित् भविष्यकाळाला न न्याहाळतां भूतकाळावरच चीनची दृष्टि खिळली असेल.

चीन देश साधारणपणें एक मोठें मैदान आहे. अधूनमधून डोंगरांच्या रांगा आडव्या पसरल्या आहेत. त्यांमध्यें मोठमोठ्या नद्या उगम पावल्या आहेत व त्यांमधून ठिकठिकाणीं कालवे काढिले आहेत. 'युन हो' (म्हणजे मोठा कालवा) या नांवाचा एक कालवा तर बाराशें मैल लांबीचा आहे. तो इसवी सनाच्या पांचव्या शतकांत बांधिला गेला असावा. यांगत्सेक्यांग ही चीनची मुख्य नदी. ही चीनच्या मैदानावर तीन हजार मैल वाहून मग समुद्राला मिळते. हिचे व दुसऱ्या मोठ्या नद्यांचे अनेक फाटे आहेत व अनेक नद्या यांना येऊन मिळतात. सारांश चीन हा नद्यांचा व कालव्यांचा देश आहे असें म्हटलें तरी चालेल. चीनचीं प्रसिद्ध शहरें नद्यांच्या कांठींच वसलेलीं आहेत. नद्या हाच चीनमध्यें पूर्वींपासून वाहतुकीचा राजमार्ग आहे.

चीनच्या पश्चिमेस असलेल्या डोंगरांवर एक प्रकारच्या पिंवळसर मातीचे थरावर थर सांचलेले आहेत. डोंगरांतून निघणाऱ्या नद्या हीं पिवळी माती आपल्याबरोबर मैदानावर आणितात व त्या आणि त्यांचे अनेक फाटे ह्यांच्या योगानें हा पिवळसर गाळ चीनच्या मैदानांवर पसरला जातो. या गाळामुळें तेथील जमीन फार सुपीक बनली आहे. कारण या गाळांत चुनखडी व कुजका नासका पाचोळा ह्या उत्तम खतांचा अंश असतो. यांगत्सेक्यांग व होयांगहो ह्या

नद्यांत तर हा गाळ इतका असतो कीं त्यांचें पाणी रबडीसारखें घट्ट असतें. होआंगहो म्हणजे पिवळी नदी हें नांव पडावयाला हा गाळच कारणीभूत झाला. पॅसीफिक महासागरास मिळतांना या नद्यांमध्यें इतका गाळ असतो कीं त्याचें सुंदर निळसर पाणी तीस-चाळीस मैलांपर्यंत पिवळें होऊन जातें. देशास समृद्धि देणाऱ्या या गाळामुळेंच चीनमध्यें पिवळ्या रंगास महत्त्व आलें असावें. चीनच्या एका बादशहाची 'होआंग-टी' म्हणजे पिवळ्या गाळाचा स्वामी अशी पदवी होती. चीनच्या निशाणाचा रंग पिवळाच आहे. चिनी लोक सुंदर वस्तूंला आवडीनें पिवळा रंग देतात. नद्यांच्या प्रवाहाबरोबर महासागराकडे धाव घेणारा गाळ चिनी शेतकरी अनेक उपायांनीं अडवून आपल्या शेतीच्या उपयोगाला आणितात. ईजिप्तच्या फेल्ला-प्रमाणें ते बारीक विणलेल्या टोपल्यांत नदींतील गाळाचें पाणी भरून घेऊन आपल्या लहान लहान काल्व्यांत रिचवितात व त्यांतून तें शेतांत नेतात. ते ओढ्यांतील गाळ खोदून शेतांत नेतात. ईजिप्त-प्रमाणेंच चीनचें शेतकरी नद्यांत व काल्व्यांत नानाप्रकारचे रहाट लावून गाळाचें पाणी उपसतात. हे रहाट चालविण्याच्या कामीं हजारों शेतकरी व त्यांचे रेडे गुंतलेले असतात. एक रहाट असा गमतीचा आहे कीं, त्याला एकावर एक अशीं चाकें असतात. शेतकरी एका चाकावर उभा राहिला कीं तें खालीं जातें व दुसरें वर येतें. मग तो त्या



चीनमधील रहाट

दुसऱ्या चाकावर पाय देतो व तें खालीं गेल्यावर तिसऱ्यावर पाय देतो. असें रहाटगाडगें तो सारखें आपल्या पायांनीं फिरवीत असतो. चिनी शेतकरी किती कष्टाळू व चतुर असतो याची तुम्हांला यावरून कल्पना येईल.

खतांचा उपयोग करण्यांत चिनी शेतकऱ्यांचा कोणी हात धरणार नाहीं. तो खताला उपयोगीं पडेल अशी कोणतीच वस्तु वाया जाऊं देत नाहीं. बटाट्यांचीं टरफलें तो जपून ठेवील, डोक्याचे कापलेले केस फेकून देणार नाहीं; फार काय उकीरडे शोधून त्यांत जें मिळेल त्याचा तो खताकडे उपयोग करितो.

चीनमध्यें गुरें फार कमी. बैल व गाई नाहींच म्हणाना. याला कारण तेथें चरण्यासाठीं कुरणेंच नाहींत हें होय. नाहीं म्हणावयाला म्हशी व रेडे आहेत. नांगरणें, पेरणें, मळणी करणें, घाणा किंवा मोट चालविणें या सर्व कामांकडे रेड्यांचा उपयोग होतो. उत्तर चीनमध्यें नांगराला घोडे, उंट व गाढवें जुंपतात. कांहीं ठिकाणीं तर तेही मिळण्याची मारामार. कोठेंकोठें नांगराला एका बाजूला धट्टाकट्टा माणूस व दुसऱ्या बाजूला एकादें गाढव जुंपलेलें आढळतें. एके ठिकाणीं तर एका शेतकऱ्यानें आपले दोन मुलगे व एक मुलगी नांगराला जुंपलेलीं एका प्रवाशाला आढळलीं ! तिघें बहीणभावंडें कुंथून कुंथून नांगर ओढीत होतीं, व त्यांच्या आंगांतून घामाच्या धारा चालल्या होत्या. गुरेंच नाहींत, तर शेतकऱ्यानें तरी बिचाऱ्यानें काय करावें ?

शेतकऱ्यांचीं औतेंही अजून जुनींपुराणींच आहेत. लोखंडाचे नांगर व इतर उपयुक्त नवीन प्रकारचीं वाफेनें किंवा तेलानें चालणारीं शेतीचीं यंत्रें अद्यापि चिनांत फारशीं नाहींत. आपल्याप्रमाणेंच बापाची शेतजमीन सर्व भावांना मिळत असल्यामुळें चीनमध्येंही

शेतांचे लहानलहान तुकडे पडले आहेत व यंत्रांचा उपयोग करणें अशक्य झालें आहे.

अशा कठीण परिस्थितींतही चिनी शेतकरी गाळाच्या व इतर खतांच्या साहाय्यानें आपल्या सुपीक जमिनींत एका वर्षांत तीन पिकें काढतो. तीनचार हजार मैलांचा समुद्रकिनारा असल्यामुळें त्याच्या निरनिराळ्या भागांवरील हवामान वेगळें असतें व पिकेंही वेगळीं असतात. दक्षिणभाग उष्ण कटिबंधांत असून तेथें कपाशी, तंबाखू, तांदूळ हीं पिकें निघतात. उत्तरेस गहूं, मका व द्विदल धान्यें होतात. यांगत्सेक्यांगच्या खोऱ्यांत लाखों तुतीच्या झाडांची लागवड करितात. या झाडांचीं पानें रेशमाच्या किड्यांचें खाद्य होय. रेशमाचे किडे बाळगून रेशीम पैदा करणें हा चीनचा एक प्रमुख धंदा आहे. अफूची लागवडही चीनमध्यें मोठ्या प्रमाणांत होत असे.

चहा हें चीनचें एक मुख्य पीक आहे. दरवर्षीं लाखों पौंड चहा चिनांतून परदेशीं जात असतो. खुद्द चीनमध्यें याशिवाय चहाचा कितीतरी खप आहे. यांगत्सेक्यांगच्या दक्षिणेस चहाचे मळे आहेत. चिनी लोक वर्षांतून तीनदां चहाचीं पानें खुडतात. वसंतऋतूंत पहिलीं पानें खुडतात. तीं फार कोंवळीं असतात व त्यांची किंमतही फार येते. चहाचीं पानें खुडल्यानंतर उन्हांत वाळवितात. मग मंदाग्नीवर त्यांना आंच लावितात व परत वाळवून सुकवितात. असें केलें नाहीं तर हिरवीं रसदार पानें कुजून बिघडतील. चिनी शेतकरी पानें सुकल्यावर तीं मोठमोठ्या पेट्यांत बंद करून नद्यांवरील नावांतून समुद्रकिनाऱ्यावरील बंदरांवर पाठवितात.

किरगिज लोकांविषयीं माहिती सांगतांना चहाच्या विटांचा उल्लेख केला होता. या विटा चीनमध्येंच कारखान्यांत तयार करितात. आधीं चहाच्या पानांचें दळून बारीक पीठ करितात. नंतर वाफ देऊन

तें पीठ ओलसर करितात व विटांच्या आकारांच्या सांच्यांत तें घालून वरून फार जोरानें दाबितात. म्हणजे चहाची वीट तयार होते. उंटावरून या विटा विक्रीसाठीं पश्चिमेकडील वाळवंटांत रवाना होतात. तिबेटमध्यें तर या विटांना इतकें महत्त्व आहे कीं, त्यांचा नाण्यांप्रमाणें तिकडे उपयोग होतो.

चीनचें दुसरें एक मोठें उत्पन्न म्हणजे कळकीचें. तिकडे बांबूच्या चाळीसपन्नास जाती आहेत. चाळीसपासून ऐंशी फुटांपर्यंत तेथें बांबू वाढतो. कोंकणांतील नारळीच्या झाडांप्रमाणें बांबू चीनच्या फार उपयोगी पडतो. चिनी शेतकऱ्यांच्या घरांचीं छपरें बांबूचीं असतात. कांहीं घरांच्या भिंतीही बांबूच्या असतात. मोऱ्यांतील नळ बांबूचेंच. घरांतील खुर्च्या, टेबलें वगैरे सामान बांबूचेंच. चिनी शेतकरी बादल्या, हंडे, घागरी यांच्याप्रमाणें ज्या टोपल्यांचा उपयोग करितो, त्या बांबूच्यांच असतात. घरांतील वाट्या, कप, पिकदाण्या, तस्तें बांबूचीं. झोपावयाच्या चटया, छत्र्यांचे सांगाडे, कंदील, पंखे बांबूचेच. बांबूच्याच पावसांत व उन्हांत घालावयाच्या टोप्या व बांबूचेच पावसाळ्यांतले पाणकोट. रात्रीं डोक्याखालीं घ्यावयाच्या उशा बांबूच्या, फण्या बांबूच्या; हातांतील काठ्या, फूटपट्ट्या त्याच्याच. बांबूचें पीठ करून तें चांगलें उकडून त्याचेच कागद करतात. लेखणी--दौत बांबूचीच. गरीब लोक बांबूचे कोंवळे कोंब उकडून खातात. बांबूच्या कोवळ्या कोंबाचा चिनांतील अनेक औषधांत उपयोग करितात. सारांश, चीनमध्यें बांबूचा काय उपयोग करितात, हें सांगण्यापेक्षां काय उपयोग करीत नाहींत हें सांगणें सोपें आहे. ती एक चीनची कामधेनूच आहे म्हणाना.

चीनमध्यें वाहतुकीचीं साधनें अनेक आहेत. अलीकडे आगगाड्या झाल्या आहेत. परंतु त्या पूर्वी नद्या व कालव्यांतून नावा व

होड्यांतून प्रवास करण्याची व मालाची नेआण करण्याची पद्धत होती व अजूनही आहे.

चीनमध्यें नद्या व त्यांचे कालवे ह्यांचें जाळें सर्वत्र पसरलें आहे. कांहीं कांहीं भागांत तर लहान लहान पाट घरोंघर नेले आहेत म्हटलें तरी चालेल. या सर्व नद्यांवर व कालव्यांवर लहानमोठ्या नावांची व होड्यांची एकच दाटी झालेली असते. यांगत्सेक्यांग नदीमध्यें तर महासागरांतील मोठमोठ्या आगबोटी मुखापासून अलीकडे थेट एक हजार मैलांपर्यंत आंत जातात. इतर नद्यांवर असंख्य आकारांचीं व प्रकारांचीं तारवें, नावा, होड्या वगैरे माणसें व माल यांची रात्रंदिवस नेआण करीत असतात. असें म्हणतात कीं, चीनमध्यें जितक्या नावा आहेत तितक्या जगांतील इतर सर्व देशांत मिळून नाहींत.

चीनमधील सर्व शहरें नद्यांच्या कांठींच वसलीं आहेत. प्रत्येक शहराजवळ इतक्या नावा उभ्या असतात कीं, दुरून डोलकाठ्यांचें जणूं काय रानच उभें आहे असा भास होतो. देशाच्या निरनिराळ्या भागांत नावांचे निरनिराळे प्रकार आढळतात. मात्र सर्व नावांवर दोन डोळे रंगिवलेले असतात! डोळ्यांखेरीज नावांना दिसावयाचें कसें? व त्यांनीं चालावें तरी कसें? चिनी लोकांच्या या वेडगळ समजुतीचें नवल वाटतें. चीनमध्यें प्रथम जेव्हां आगगाडी सुरू झाली, तेव्हां आगगाडीच्या एंजिनावर डोळे काढण्यासाठीं चिनी लोक हट्ट धरून बसले होते, असें म्हणतात!

नदीमध्यें नावेंत बसून जातांना वाटेंत आपल्याला भिकाऱ्यांच्या अनेक होडया आढळतात. चीनमध्यें नद्या हा एक राजमार्ग असल्यानें त्यावर भिकारी भीक मागण्यास येणारच! हे भिकारी आपल्या होडयांतून भीक मागत हिंडत असतात.

चीनमध्यें लाखों माणसें नद्यांवरच नावांत घरें करून आपल्या मुलांबाळांसह राहातात. नुसत्या पर्ल नांवाच्या एका नदीवरच तीस लाख माणसें राहातात ! मुलें नावांवरच खेळत असतात. खेळतांना तीं नदींत पडलींच, तर बुडूं नयेत म्हणून त्यांच्या पाठीला लहानशीं पिंपें बांधिलेलीं असतात. मुलें नदींत पडलींच तर तीं ओरडतात व मग कोणीतरी येऊन त्यांना वर काढतो.

आतां आपण चीनची राजधानी जी पेकीन तेथें जाऊं व शहरांतील लोक कसे राहातात तें पाहूं. पेकीन शहराभोंवतीं मोठा तट आहे. हा तट पायथ्याला साठ फूट रुंद असून याच्यावरून चार बैलगाडया एका वेळीं सहज जाऊ शकतात. इतकी त्याची वर रुंदी आहे. चार मजली घराइतका हा उंच आहे. तटाला अधूनमधून मोठमोठे बुरूज आहेत. व त्यांच्या खालीं एकंदर सोळा वेशी आहेत. चीनमध्यें अशी मजबूत तटबंदी केलेली जवळ जवळ हजार शहरें आहेत.

चला आपण एका वेशींतून पेकीन शहरांत शिरूं. हीं घरें पाहा कशीं विचित्र आहेत ? सर्व घरें एक मजली. दोनमजली घरें दिसतच नाहींत. तीं भुरकट रंगाच्या विटांचीं बांधलीं आहेत. वर घातलेलीं कौलें काळ्या रंगाचीं आहेत. रस्त्यामध्यें काय ही गर्दी ! ते पहा भयंकर दिसणारे तार्तार लोक केसाळ व दोन वशिंड असलेल्या उंटांवर बसून पाठीवर चहाच्या विटा बांधून लगबगीनें उत्तरेकडे मांगोलियाला चालले आहेत. ते तिकडे व्यापारी गाढवांवर बसून आपापल्या दुकानीं जात आहेत. रंगीबेरंगी रेशमी कपडे घातलेले बडे लोक खेचरांच्या गाडयांत बसून चालले आहेत; कोणी घोडयावरून चालले आहेत. त्या बाया पाहा नोकरांच्या पाठीवर लहान मुलांप्रमाणे बसून कोठें तरी जात आहेत. त्या पायानें कां


चीनमधील पाय बांधण्याची चाल.

चालत नाहींत बरें ? त्यांनीं जन्मापासून दाबून ओढून, खोड्यांत घालून आपले पाय इतके लहान केले आहेत कीं, त्यांना नीट चालवत नाहीं. कांहींना तर बिलकूल चालतां येत नाहीं. त्या दुसऱ्या बायां पाहा. काठी टेकीत कशातरी वेड्यावाकड्या चालल्या आहेत. वयाच्या तिसऱ्या वर्षीच मुलींच्या पायांचीं चार बोटें टांचेकडे आणून आवळ बांधतात व स्नानाखेरीज इतर वेळीं पट्ट्या सोडीत नाहींत. मरेपर्यंत ह्या पट्ट्या सुटत नाहींत. आरंभीं त्या बायांना मनस्वी दुःख होतें. पण फॅशनसाठीं सर्व दुःख त्या निमुटपणें सहन करितात. त्यांचे पाय साधारणपणें मुठीएवढे असतात. तो पाहा कोणी श्रीमंत मनुष्य पालखींत बसून येत आहे. पालखीचे दांडे खांद्यावर घेऊन त्याचे नौकर भराभर चालले आहेत. त्याच्या हातांचीं नखें पाहिलीं


हाताचीं लांब नखें !

का ? अरे बापरे ! हीं नखें का नखेश्वर ? चीनमध्यें नखें वाढविणें ही एक बडे लोकांत फॅशनच आहे. त्यांचीं एकापासून सहा इंचांपर्यंत नखें वाढलेलीं असतात. कांहीं बाया तर नखें मोडलीं जाऊं नयेत म्हणून त्यांना चांदीचीं टोपणें करितात. गरीब लोक अर्थात् अशीं नखें वाढवीत नाहींत. कारण त्यांना पोटासाठीं काम करावयाचें असतें.

ओहो! अन् या ढकलगाडया किती? एथेंच काय, जेथें जाल तेथें चीनमध्यें ढकलगाडया दिसावयाच्याच. या गाडयांना मधोमध चाक असतें व त्यांच्या दोन्ही बाजूंस मनुष्याला बसावयाला किंवा माल ठेवावयाला जागा असते. मागून गाडीवाला ती पुढें ढकलतो. ती पाहा मोटारगाडी पों पों करीत आली व ढकलगाडया, खेचरांच्या गाडया आणि उंट यांच्यांपुढें निघून गेली! जग हें असें आहे.

रस्त्यानें कितीतरी प्रकारचे लोक दृष्टीस पडतात. मेंढरांच्या सब्रंध कातडयाचे झगे व टोप्या घातलेले तार्तर पाहा. तो तिबेटमधला पिवळा झगा घातलेला व डोकें मुंडावलेला भिक्षु पाहा. त्या बायांच्या रेशमी विजारी व लाल किंवा पिवळ्या रेशमाच्या सपाता पाहा. रस्त्यावर ठिकठिकाणीं विजेचे दिवे आहेत. एथेंच पूर्वीं कागदांचे रंगीबेरंगी दिवे टांगलेले असत.

चला आतां आपण बाजारांत जाऊं. एथें प्रत्येक प्रकारच्या वस्तूंचे वेगवेगळे बाजार आहेत. पुस्तकांचा बाजार, टोप्यांचा बाजार, जोडयांचा बाजार, चिनीमातीच्या भांडयांचा बाजार, कोळशाचा व लाकडांचा बाजार, कुलुपांचा बाजार असे अनेक बाजार आहेत. तो पाहा एक गमतीचा बाजार. एथें फक्त प्रेतें पुरण्याच्या पेट्या विकत मिळतात. चीनमध्यें मरावयाच्या आधीं पुष्कळ वर्षें अगोदरच माणसें आपलें प्रेत पुरावयाच्या पेट्या विकत घेऊन ठेवितात व मोठ्या कौतुकानें त्या मित्रमंडळींना दाखवितात. मुलें आईबापांना प्रेमानें त्यांना पुरावयाच्या पेट्या नजर करितात!

तो पलीकडचा बाजार पाखरांचा. चिनी लोकांना कबुतरें व इतर लहान पक्षी पाळण्याचा फार नाद. रस्त्यानें जाणाऱ्या माणसांच्या हातांतील काठीवर एकादा पक्षी असावयाचाच! त्याचा एक पाय दोरीनें काठीला बांधितात. तो पक्षी थोडासा वर उडून परत काठीवर येऊन बसतो.

तें ' मटन-मार्केट ' पाहावयाचें आहे काय ? तेथें उंट, डुकरें, शेळ्या, कोंबडया, बदकें वगैरेंचें उत्तम मांस मिळतें. कांहीं बकऱ्यांच्या शेपट्या इतक्या जड आहेत कीं, त्या त्यांना उचलवत नाहींत. या शेपट्यांचें मांस फार नामी असतें असें म्हणतात. तो मासळीचा बाजार. यांत सुमारें एक हजार जातींचे मासे विकत मिळतात.

चला आतां दुसरीकडे जाऊं. अरे वा ! परत हा तट कसला ? तट तर शहराभोंवतीं असतो. मग हा तट एथें कसा ? अहो, पेकिन हें शहर एकांतएक अशीं तीन शहरें मिळून झालेलें आहे व प्रत्येकाभोंवतीं असा तट आहे. आपण बाजार पाहिला तें चिनी शहर. या तटाच्या आंत तार्तार शहर आहे. तार्तार जातीच्या लोकांनीं उत्तरेकडून स्वारी करून पुष्कळ वर्षांपूर्वीं पेकिन काबीज केलें व ते या भागांत घरें करून राहिले. पुष्कळ वर्षें चिनावर तार्तार बादशहाचें राज्य होतें. या तार्तार शहराच्या आंत तिसऱ्या तटबंदींत दिसतें तें ' बादशाही शहर ' ! या शहरांत अनेक राजवाड्यांमध्यें चिनी बादशहा आपल्या हजारों नोकरचाकरांसह राहात असत. बादशहांच्याविषयीं लोकांची फार पूज्यबुद्धि असे. त्यांना ते ' स्वर्गसुत ' म्हणजे देवाचे पुत्र म्हणत. बादशहाच्या समोर नेहमीं गुडघे टेकून उभे राहण्याची चाल होती. बादशहा लहान मुलगा असला तर त्याचा शिक्षक गुडघे टेकून त्याला शिकवी.

आज ही सर्व स्थिति बदलली आहे. आज चीन खडबडून जागा झाला असून त्यानें बादशहांना सिंहासनावरून खालीं उतरवून प्रजासत्ताक राज्य स्थापन केलें आहे. पूर्वीं ज्या बादशाही नगरांत जाण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती तेथेंच हल्लीं सरकारी कचेऱ्या आहेत. चला आपण बादशाही नगरांत जाऊं. तें पहा मध्यें कसें सरोवर आहे व त्याच्या दोन्ही बाजूस राजवाडे आहेत. राजवाड्यांचीं सोनेरी कौलें सूर्यप्रकाशांत कशीं चमकतात. या राजवाड्यांत

निरनिराळ्या खात्यांच्या कचेऱ्या आहेत. तो पहा कोणी तरी इंग्रजी पोशाक केलेला बडा चिनी अधिकारी मोटारींतून उतरला. चीनमधील हजारों लोक अमेरिकेंतून शिकून आलेले आहेत व ते मोठमोठ्या अधिकारावर आहेत.

आपण चीनची राजधानी पाहिली. पेकिन शहराभोंवतीचा तट पाहून आपल्याला चीनच्या लोकांच्या कर्तबगारीचें आश्चर्य वाटलें. परंतु यापेक्षांहि आश्चर्यजनक असा एक तट चिनांत आहे. तो केवळ एका शहराभोंवतीचा नसून चीनची सबंध उत्तर हद्द त्यानें व्यापिली आहे. फार वर्षांपूर्वीं रानटी व क्रूर तार्तार लोक उत्तरेकडून चीनवर स्वाऱ्या करीत असत. त्यांच्यापासून देशाचें संरक्षण होण्यासाठीं समुद्रापाशीं सुरवात करून थेट पश्चिमेकडे वाळवंटापर्यंत चिनी लोकांनीं पंधराशें मैल लांबीची भिंत बांधली. ही भिंत



चीनमधील प्रचंड भिंत

तीस फूट उंच असून पंचवीस फूट रुंद आहे. भिंतीच्या बाजू मजबूत मोठमोठ्या विटांच्या असून मध्यें माती व दगड यांचा रांधा ओतलेला आहे. पंधराशें मैल लांबीची ही मजबूत भिंत सपाट प्रदे-

शावरच बांधलेली नसून डोंगरांच्या उंच उंच रांगांवरून सुद्धां ती नेली आहे. कांहीं ठिकाणीं तर ती डोंगरांच्या उंच अरुंद सुळक्यावरून गेली आहे. एक सुळका तर ५००० फूट उंच आहे. इतक्या अवघड उंच जागीं दगड, विटा वगैरे सामान कसें आणलें असेल व बांधकाम कसें केलें असेल कोण जाणें. कोणी म्हणतात, शेळ्यांच्या गळ्यांत विटा बांधून त्या वर आणल्या होत्या. इजिप्तमधील मनोऱ्यासारखेंच हें एक अवाढव्य व आश्चर्यकारक प्रकरण आहे. असें सांगतात कीं, ही भिंत बांधण्यास लाखों माणसें लागलीं होतीं, व ती बांधली जात असतां तिचा व मजुरांचा तार्तारांच्या हल्ल्यांपासून बचाव करण्यासाठीं तीस लाख शिपाई लागले. हें अजस्र काम अवघ्या दहा वर्षांत संपलें. ही भिंत चांगली रुंद असल्यानें तिच्यावरून मोठी मोटारगाडी सहज जाईल. भिंतीवर ठिकठिकाणीं दोन किंवा तीनमजली बुरूज आहेत व त्यांच्यावर टेहळण्यासाठीं व बंदुका मारण्यासाठीं भोकें आहेत.

आपण चीनची एक मोठी कर्तबगारी पाहिली. आतां नाना प्रकारच्या उद्योगधंद्यांत व कलाकौशल्यांत दिसून येणारी त्यांची कर्तबगारी पाहूं. चिनी लोक फार उद्योगी आहेत. सूर्योदयापासून रात्रीपर्यंत त्यांचें काम चाललें असतें. प्रत्येक घर म्हणजे एक कारखानाच असतो असें म्हटलें तरी चालेल. आपापल्या घरीं हे लोक कापड विणणें, चटया, छत्र्या, पंखे करणें, कागद बनवणें, खुर्च्याटेबलें, मातीचीं भांडीं तयार करणें, तांब्यापितळेचीं भांडीं घडणें वगैरे अनेक उद्योग दिवसभर कोणत्याही आधुनिक यंत्राच्या मदतीवांचून करीत असतात. एवढी मोठी लोकसंख्या असतांही चीनला परदेशांतून एकही वस्तु विकत घेण्याची गरज नाहीं. यावरून ते लोक किती उद्योगी आहेत हें दिसून येईल.

जुन्या घरगुती धंद्याशिवाय अलीकडे चीनमध्यें सुताच्या व रेशमाच्या कापडाच्या मोठमोठ्या गिरण्या चालू आहेत. त्याप्रमाणें लोखंडाचेही कारखाने निघाले आहेत. यांगत्सेक्यांगच्या तीरावर हन्यांग येथें लोखंडाचा व पोलादाचा फार मोठा कारखाना असून त्यांत पंचवीस हजार माणसें खपतात. या कारखान्यांतून चीनमधल्या आगगाड्याकरितां पोलादी रूळ पुरविले जातात. कोळसा व लोखंड हेंच आजकाल सुधारलेल्या देशांतील संपत्तीचें मुख्य साधन आहे. या साधनाच्या जीवावरच अमेरिका, इंग्लंड वगैरे राष्ट्रें इतकीं संपन्न बनलीं. चीनमध्यें कोळशाच्या व लोखंडाच्या मुबलक खाणी असल्यानें मागेंपुढें हा देश संपन्न व बलिष्ठ होईल यांत शंका नाहीं.

चीनची विशेष प्रसिद्धि तेथील रेशमी वस्त्रें व चिनी मातीचीं भांडीं या दोन उद्योगांविषयीं आहे. परवांपर्यंत सर्व जगाला चीनच रेशमी वस्त्रें पुरवीत होतें. संस्कृत भाषेंत रेशमी वस्त्राला 'चीनांशुक' म्हणजे "चीनमधलें वस्त्र" असें नांव आहे, इतकेंच नव्हे तर 'चीन' या शब्दाचाच 'रेशमी वस्त्र' असा संस्कृतमध्यें कधीं कधीं अर्थ होतो.

रेशीम कापसासारखें झाडापासून पैदा होत नाहीं. तें एकप्रकारच्या बारीक किड्यापासून मिळतें. तो प्रकार असा:—रेशमाच्या किड्यांचीं बारीक मोहरीच्या आकाराचीं राखी रंगाचीं अंडीं असतात. हीं अंडीं आरंभीं एका थंड खोलींत ठेवतात, व तीं फुटून किडा बाहेर पडण्याची वेळ झाली म्हणजे त्यांना बरीच उष्णता असलेल्या खोलींत चटईवर मांडतात. या खोलीचें उष्णतामान एका ठराविक प्रमाणांत असावें लागतें. तें समजण्यासाठीं चिनी लोक थर्मामिटरचा उपयोग करीत नाहींत. एकजण कपडे काढून नागवा होऊन खोलींत जातो व उष्णतामान किती आहे हें शरिराला भासणाऱ्या उष्णतेवरून ठरवितो. उष्णता कमी असल्यास विस्तव

करून ती वाढवितात. प्रत्येक अंड्यांतून केसाइतका एक एक लहान किडा बाहेर पडतो. त्याला सपाटून भूक लागलेली असते. तो तुतीच्या झाडाचीं कोंवळीं पानें खातो. भराभर वाढत जाऊन तो बत्तीस दिवसांनीं करंगळीएवढा मोठा व दोन इंच लांब होतो. एवढ्या वेळांत तो चार पांच वेळां झोप काढतो, व त्या वेळीं आपल्या अंगावरची कांत टाकतो. पूर्ण वाढ झाल्यावर हा किडा खाणें बंद करितो, व तोंडाचा भाग वर करून गरगर फिरूं लागतो. या वेळीं त्याच्या तोंडांतील बारीक छिद्रांतून चिकट असा एक पदार्थ निघतो व तो हवेनें घट्ट बनतो. हेंच आपलें रेशीम. किडा गरगर फिरत रेशमाच्या या अत्यंत बारीक तंतूनीं आपलें अंग आच्छादून घेतो. तो तंतूच्या या स्वतः तयार केलेल्या मऊ घरामध्यें झोपीं जातो व तीन आठवड्यांच्या कुंभकर्णी झोपेनंतर पतंगाच्या रूपानें बाहेर पडतो. या पतंगांच्या माद्याच चारपांचशें अंडीं घालतात, व मरून जातात. मग अंड्यांतून किडे निघतात, तंतूचें घर करितात व झोपतात. असें हें रहाटगाडगें चाललें असतें.

चिनी लोक तंतूचें घर किंवा कोश गरम पाण्यांत बुडवून धागे वेगळे करितात व अनेक धागे एकत्र करून रेशमाचा एक दोरा तयार करितात! या दोऱ्याचेंच वस्त्र होतें. चीनमध्यें रेशमाच्या किड्यांना खाण्यासाठीं म्हणून हजारों तुतीच्या झाडांची लागवड करितात. प्रत्यक्ष चीनच्या महाराण्या इतर बायांना धडा घालून देण्यासाठीं स्वतः रेशमाचे किडे पाळीत असत व मोठ्या हौसेनें त्यांना तुतीचीं पानें खाऊं घालीत. पूर्वीं हातमागावरच कापड तयार होई. हल्लीं रेशमाच्या कापडाच्या गिरण्या सुरू झाल्या असून त्यांत यंत्राच्या साहाय्यानें कापड तयार होतें.

चीनचा दुसरा प्रसिद्ध धंदा चिनी मातीच्या भांड्यांचा. चीनला इंग्रजींत 'चायना' म्हणतात. चीनचीं मातीचीं भांडीं युरोपमध्यें इतकीं

प्रसिद्ध आहेत कीं, त्या भांड्यांनासुद्धां 'चायना'च म्हणतात. विलायतेंत अनेक ठिकाणीं मातीचीं सुंदर नक्षीदार भांडीं तयार होतात. तथापि त्यांना चायनाच म्हणतात. भांडीं करण्याची माती फार बारीक व पांढऱ्या रंगाची असते. प्रथम मातींतून वाळू व खडे काढून टाकतात. नंतर तिच्यांत पाणी घालून माणसें व रेडे चिखल चांगला तुडवून अगदीं मऊ करितात. मग कुंभार चाकावर त्या चिखलाचीं नानाप्रकारचीं भांडीं बनवितो. हीं भांडीं उन्हांत सुकवून लाकडाच्या भट्टींत घालतात व तीन दिवसपर्यंत भट्टी धगधगत ठेवतात व मग विझवितात. भट्टी विझविल्यावर भांडीं एकदम वारा लागून फुटूं नयेत म्हणून भट्टींत तशीच चोवीस तास ठेवितात. हीं खरपूस भाजलेलीं भांडीं चितान्याच्या हातीं जातात. एका भांड्यावर चित्रें काढण्यास दहाबारा चितारी लागतात. एकजण झाडें काढतो, दुसरा पक्षी काढतो, तिसरा फुलें काढतो. प्रत्येकजण वेगवेगळीं चित्रें काढतो. चित्रें काढून झाल्यावर परत हीं भांडीं कोळशाच्या भट्टींत घालून भाजतात. या भांड्याचा रंग व झिलई फार नामी असते. जुन्या भांड्यांना युरोपमध्यें फार किंमत येते. एक प्याला किंवा चंबू सहज आठ दहा हजार रुपयाला जातो.

चिनी लोक साधारण ठेंगण्या बांध्याचे व पिवळसर रंगाचे असतात. त्यांच्या अंगावर फारसे केस येत नाहींत. त्यांच्या मिशा उंदराच्या शेपटीसारख्या असतात. आपल्या इकडच्या मद्रासी लोकाप्रमाणें ते शेंडीची वेणी पाठीवर सोडतात. या लोकांचीं गालाचीं हाडें वर आलेलीं असतात, आणि डोळे बारीक व बदामाच्या आकृतीसारखें तिरकस असतात.

चिनी लोकांचें मुख्य खाद्य भात होय. तथापि वाटेल त्या प्राण्याचें मांस खाण्याबद्दल या लोकांची प्रसिद्धि आहे. शेळ्या, मेंढ्या, कोंबड्या, उंट वगैरे ते खातातच, पण उंदरांमांजरांचाही

फन्ना उडवितात. आपल्या घरांत फार उंदीर झाले असल्यास सांपळ्याऐवजीं एक दोन चिनी माणसें घरांत सोडलीं कीं काम होईल. चीनमध्यें खेड्यांतील बाजारांत बांबूला टांगून मेलेले उंदीर व मांजरें विकावयाला ठेवतात. काळ्या कुत्र्याच्या मांसाला तिकडे गिऱ्हाइकें फार. तिकडच्या खाणावळींत गिऱ्हाइकांची खात्री पटावी म्हणून या कुत्र्याचें मांस शिजवितांना मुद्दाम काळ्या केसांचा झुपका असलेला वरच्या कातडीचा लहानसा भाग त्या मांसावर राखून ठेवतात. डुकराच्या मांसावर तर या लोकांच्या फार उड्या ! दक्षिण चीनमध्यें डुकरांच्या एका जातीला रताळ्यांवर पोसतात. या एकादशी करणाऱ्या डुकरांच्या गोड गोड मांसाला किंमतही भारी पडते. चीनच्या नद्यांत शेंकडों जातीचे मासे सांपडतात. तेही या लोकांच्या पोटांत जातात.

चिनी लोक जेवण्यापूर्वीं एका ओल्या रुमालानें पाळीपाळीनें तोंड व हात पुसतात. जेवण्यासाठीं लहान लहान चिनी मातीचीं भांडीं असतात. चिनी लोक जेवण्याच्यापूर्वीं व नंतर दोनदां चहा पितात. त्यांना जेवण गरमागरम लागतें. ते चहा व पाणीही गरमच पितात. ताटांत भात घेतल्यावर ते त्यांत गरम पाणी घालतात. कांहीं ठिकाणीं गरम पाणी विकणारे रस्त्यानें फिरत असतात. कोठें कोठें त्यांचीं दुकानें असतात. हे लोक अन्न बिलकूल वायां जाऊं देत नाहींत. खरकटें अन्न, चहाचा चोथा हीं सुद्धां वायां जात नाहींत. भाजीचें पाणी डुकरांसाठीं राखून ठेवितात. आपल्या कोंकणांत गोवेंप्रांतीं भाताच्या पेजेचें पाणी व तांदूळ धुतलेलें पाणी याच कामीं लावतात.

गरीब लोक सुताचें आंखूड कुडतें व निळ्या रंगाची पोकळ विजार घालतात. रेशमाची पैदास तिकडे फार होत असल्यानें मध्यम स्थितींतील माणसेंही रेशमी कपडे वापरतात. पुरुषांच्या



एक चिनी कुटुंब

कपड्यावर सुंदर कशिदाकाम केलेलें असतें. तें काळ्या सॅटीनच्या टोप्या वापरतात. बडे लोक आपल्या टोपींत पिसें खोवतात व गळ्यांत मण्याच्या माळा घालतात. पुरुषांचे मोजे गुडघ्यापर्यंत असतात पण स्त्रियांचें आंखूड असतात. चिनी बाया तोंडाला रंग लावतात व पुरुषाप्रमाणेंच पोकळ पण भडक रंगाच्या रेशमाच्या विजारी घालतात; त्या गुडघ्यापर्यंत हिरव्या, जांभळ्या किंवा शेंदरी रंगाच्या रेशमाचे कोट घालतात व पायांत रेशमाच्या लहान सपाता घालतात. समारंभाचे वेळीं पुरुष पायघोळ झगे घालतात. त्यांचे जोडे कापडाचे असतात व त्यावर ते पांढरें पॉलिश चढवितात. मुलांचे कपडे मोठ्या माणसांसारखेच असतात. अलीकडे इंग्रजी तऱ्हेचा पोषाख घालण्याची चाल पडत चालली आहे.

हे लोक बोलण्याचालण्यांत फार नम्र आहेत. बोलतांना स्वतःकडे कमीपणा घ्यावयाचा व ज्याच्याशीं बोलावयाचें त्याला मोठेपणा द्यावयाचा हा त्यांचा शिष्टाचार आहे.

उदाहरणार्थ, एकजण-- हा आपला राजवाडा उत्तम आहे. दुसरा-- माझें झोपडें पडकें आहे. एकजण-- आपले चिरंजीव फार गुणवान् आहे. दुसरा-- माझें मरतुकडें कारटें कुचकामाचें

आहे. इत्यादि. आपल्याकडे उत्तर हिंदुस्थानांत थोडाबहुत असाच प्रघात आढळतो.

चिनी *लोकांना पतंग उडविण्याचा फार नाद आहे. मोठालीं माणसेंही पतंग उडवितात. पतंगाचे अनेक प्रकारचे आकार असतात. या लोकांना कोंबड्यांची झुंज लावण्याची फार आवड असते. यांचा दुसरा करमणुकींचा प्रकार म्हणजे रातकिड्यांची झुंज. ते रस्त्यांत बसून भांड्यांत या किड्यांना घालून झुंजवितात. चांगली झुंज खेळणाऱ्या रातकिड्याला चीनमध्यें पुष्कळ किंमत येते.

चीनमध्यें दिवसा नाटकें होतात. लोकांना तिकिटांबरोबर कलिंगडीं पुरविलीं जातात. मग ही शोकी मंडळी कलिंगडीं खात खात नाटक पाहातात. आपल्याइकडे सुद्धां कांहीं सिनेमांच्या थिएटरांत तिकिटाबरोबर सिगारेट दिल्याचीं उदाहरणें आहेत.

चिनी लोक पाळणा वापरीत नाहींत. मुलें आयांच्या किंवा नोकरांच्या पाठकुळीला असतात. मुलें चालू लागल्यावर त्यांना कापडाचे जोडे घालतात. जोड्यांच्यावर मांजराचें तोंड काढलेलें असतें. हेतु हा कीं, मुलानें मांजराप्रमाणें न पडतां चालावें.

चिनी चित्रलिपी

चिनी लिपी विचित्र आहे. आपल्याकडे कांहीं ठराविक मूळाक्षरें आहेत. या अक्षरांचे आपण शब्द बनवून लिहितों. आपल्या भाषेंतील असंख्य शब्द लिहिण्यास आपल्याला थोडीशीं मूळाक्षरें पुरीं होतात व म्हणून आपल्या लहान मुलांना सुद्धां वर्षभरांत थोडेंबहुत लिहितां व वाचतां येतें. चीनमध्यें अशीं मोजकीं मूळाक्षरें नाहींत. तेथें चित्रलिपी आहे; म्हणजे प्रत्येक

शब्दाची वेगळी खूण आहे. जसें एका माणसाचें चित्र दुसऱ्या माणसासारखें नसतें, तसेंच चिनी लिपींत एका शब्दाची खूण दुसऱ्या शब्दाच्या खुणेसारखी नसते. यामुळें चिनी भाषेंतील सर्व शब्द लिहितां व वाचतां येणें जवळ जवळ अशक्य आहे. चिनी भाषेंत चाळीस हजार शब्द आहेत. व अर्थात् तितक्याच त्यांच्या खुणा आहेत. परंतु तिकडे शिकलेल्या माणसाला सुमारें हजारापर्यंत शब्द लिहितां येतात. आपण लिहितांना वर सुरवात करितों व खालपर्यंत लिहितों. चिनी लोक सुरवात खालीं करितात. आपल्या पुस्तकाचें शेवटचें पान तें चिनी लोकांचें पहिलें पान. सारेंच उरफाटें आपण त्यांचें सारें उरफाटें म्हणतों. चिनी लोक आपलेंच सारें उरफाटें म्हणत असतील.



शाळेंतला पोषाख घातलेलीं चिनी मुलें

चीनमधील जुन्या शाळांमध्यें मुलें शिरा ताणून मोठमोठ्यानें घोकंपट्टी करीत. मुलगा थांबला कीं, शिक्षकानें छडी मारलीच. निबंधलेखन व चिनी जुनीं पुस्तकें पाठ करणें हाच पूर्वींचा अभ्यास असे. आतां चीनचें शिक्षण फार सुधारलें आहे. इतिहास, भूगोल, सृष्टिज्ञान वगैरे सर्व विषय आतां शिकवितात व शाळांतून ड्रिल व खेळ घेतले जातात. शाळेंत येणाऱ्या सर्व मुलांचे कपडे एकसारखे लष्करी प्रकारचे असतात व सर्व शाळांत अलीकडे लष्करी कवायत शिकवितात. चिनांत हायस्कुलें, कॉलेजें व युनिव्हर्सिट्या जागजागीं झाल्या आहेत व हजारों चिनी तरुण अमेरिकेंतील व युरोपांतील निरनिराळ्या शिक्षणसंस्थांत शिकत असतात.

पूर्वीं मुली शाळेंत जात नसत. आतां मुलींच्या शाळा स्थापन झाल्या असून त्यांना गाणें, शिवणकाम, ड्राइंग, रोग्याची शुश्रूषा व गृहव्यवस्था हें उपयुक्त विषय शिकविले जातात. शाळेंत जाणाऱ्या मुली आपलीं तोंडें रंगवीत नाहींत, पाय बांधीत नाहींत, किंवा रंगीबेरंगी विजारी व दागिने घालीत नाहींत. इतकेंच नव्हे तर या तरुण मुली अगदीं इंग्रजी तऱ्हेचा पोषाख करितात. पुष्कळ चिनी मुली अमेरिकेंत शिकावयास जातात.

चीनमध्यें लष्करी शिक्षणाच्या शाळा सुरू झाल्या आहेत व त्यांत बंदुक मारणें वगैरे सर्व प्रकारचें लष्करी शिक्षण युरोपियन किंवा अमेरिकन तज्ज्ञांच्या देखरेखीखालीं दिलें जातें.

चीनचा भविष्यकाळ त्याच्या भूतकाळापेक्षां भव्य आहे. चीनचें आधुनिक पद्धतीचें सैन्य पुढेंमागें जगाला भारी होईल. चीनच्या लोखंडाच्या व कोळशाच्या खाणीभोंवतीं पुढेंमागें गिरण्या व कारखान्याचें जाळें पसरेल व इतर देशांना चीनशीं व्यापारांत सामना करण्यास जड जाईल.

---

## प्रकरण ९ वें

# उंच पठारावरचे तिबेटी लोक.

तिबेट हा एक चीनचाच दक्षिणेकडील भाग आहे. परंतु चीन व तिबेटमध्यें कांहींच साम्य नाहीं. चीन सपाट मैदान आहे, तर तिबेट हें समुद्रसपाटीपासून दोन तीन मैल उंच असलेलें पठार आहे. दक्षिणेस हिमालय व उत्तरेस चीनमधील उंच पर्वत यांच्या दरम्यान हें विस्तीर्ण पठार आहे. जगांत लोकवस्ती असलेले इतकें

उंच दुसरें पठार नसल्यानें तिबेटला " जगाचें [ छप्पर ] शिखर " असें म्हणतात.

तिबेटचें पठार खडकाळ व रुक्ष असून त्याचा बराच मोठा भाग सहारा वाळवंटासारखा नापीक आहे. पठाराचा कांहीं भाग डोंगराळ असून त्यांतील खोऱ्यांत थोडीबहुत शेती होते. समुद्र-सपाटीपासून उंची पुष्कळ असल्यानें हा देश थंड आहे. परंतु बंगालच्या उपसागरांतून उत्तरेकडे वाहणाऱ्या आर्द्र मान्सून वाऱ्यांना हिमालय अडवून त्यांच्यांतील सर्व आर्द्रता व पाऊस हिंदुस्थानासाठीं खालीं खेचून घेत असल्यानें हिमालय ओलांडून तिबेटांत येतांना हे वारे कोरडे ठणठणीत असतात; व यामुळें तिबेटचीं पर्वतशिखरें बहुतेक बर्फाच्छादित असूनही हा देश सहारा वाळवंटासारखा अगदीं कोरडा आहे. उन्हाळ्यांत मैदानें व दऱ्या फार तापतात, व हिवाळ्यांत हवा इतकी कोरडी होते कीं, झाडाचीं पानें सुकून त्यांचा भुगा होतो व लाकडाला भेगा पडतात. अन्न न नासण्यासाठीं तेथें मिठाच्या उपयोगाची जरूर पडत नाहीं. मांस घराबाहेर ठेवलें कीं, तें सुकून जातें व मग नासत नाहीं. या देशांत चीनप्रमाणेंच मंगोलियन वंशांतले ताम्रवर्णाचें, गालाचीं हाडें वर असलेले साठ लाख लोक राहतात. तिबेटी लोकांना दाढीमिशा फारशा नसतात; जे थोडेबहुत केस तोंडावर उगवतात ते काढून टाकण्यासाठीं हे लोक हातांत नेहमीं चिमटे ठेवितात.

तिबेटी लोकांचा मुख्य धंदा गुरें पाळणें व शेती करणें हा होय. डोंगरांच्या खोऱ्यांत जमीन साधारण बरी असते. तिच्यांत हे लोक शेती करितात. त्यांच्या देशांत सोनें, मीठ आणि टांकणखाराच्या खाणी आहेत. ते या खाणी खोदतात. शिवाय तिबेटांत बहुमोल असे वैदूर्य सांपडतात.

तिबेटी लोक बकऱ्या, मेंढया, गाढवें व याक नांवाचीं जनावरें पाळतात. याक दिसावयास गाईसारखें असून त्याचें शेपूट घोड्यासारखें असतें, व म्हशीसारखे त्याच्या अंगावर केस असतात. तें मजबूत असून वाटेल तितक्या उंचीवर न घसरतां चढून जातें. म्हणून हिमालयाच्या भागांत प्रवास करितांना ओझें वाहण्यास याकांचाच उपयोग करतात. यांशिवाय तिबेटांत जंगलीं गाढवें, बकरें व हरणें आढळतात. कस्तूरीमृगही इकडे सांपडतात. हे लोक गुरें, लोकर, सोनें, टांकणखार विकतात व चहाच्या विटा आणि कापड चिनांतून खरेदी करतात.



याक

तिबेटी लोक गुढघ्यापर्यंत लांब असे मेंढराच्या लोकरीचे झगे घालतात व कमरेला लोकरीचाच पट्टा बांधतात. हिवाळ्यांत बकऱ्यांच्या कातडयांचे कपडे घालतात व त्या कातडयांची केसांची बाजू आंत करितात. त्यांना लाल, जांभळा, निळा वगैरे भडक रंग आवडतात. पुरुष व स्त्रिया लाल किंवा पिवळ्या रंगाच्या चामडयाचे गुढग्यापर्यंतचे जोडे घालतात. कांहीं लोक कापडाच्या टोप्या घालतात. यांना कोकरांच्या चामडयाची किनार असते. कांहीं लोक इंग्रजी टोपीसारखी एक प्रकारची टोपी घालतात. हिला गळ्याखालून घ्यायचे बंद असतात.

तिबेटी लोक दागिन्याचे फार शोकी. पुरुषांच्या डाव्या कानांत

मोत्याच्या व वैदूर्याच्या भिकबाळ्या लटकाविलेल्या असतात व स्त्रियांच्या गळ्यांत सोनें, चांदी व तांबें यांचे हार असतात. यांच्या कानांतील भिकबाळ्या इतक्या मोठ्या व जड असतात कीं, कानाचें ओझें हलकें होण्यासाठीं भिकबाळीला दोरी बांधून ती वर केसांत खोचतात. तिबेटी स्त्रियांच्या केसांत सोन्याचांदीचे व हिऱ्याचे अनेक दागिने असतात.

कांहीं तिबेटी लोक याकचे केस विणून बनविलेल्या तंबूंत राहातात; कांहीं जणांचीं घरें दगडाचीं व लाकडाचीं असतात. घरें दोनमजली असल्यास खालच्या मजल्याचा उपयोग गोठ्याप्रमाणें गुरें बांधण्याकडे करितात. त्यांच्या घरांना खिडक्या नसतात.


तिबेटांतील स्त्रीपुरुष

तिबेटी लोक गहूं, जव, घेवडयाच्या शेंगा व वाटाणे एकत्र कुटून त्याच्या भाकरी करून खातात. ते कच्चें मांस आवडीनें खातात व शिजविलेलें मांसही अर्धकच्चें ठेवितात. ते डुकरें, याक व उंटांचें मांस खातात. थंड प्रदेशांतील इतर लोकांप्रमाणें ते चरबीही फार खातात. त्यांचें आवडीचें पक्वान्न म्हणजे विटेचा चहा व लोणी यांच्यांत पाणी घालून केलेलें पेय. यांत ते जवाचें पीठ कालवून रवीनें खूप घुसळतात व मग झालेल्या घट्ट गोळ्याचे लाडू

करून खातात. तिबेटी स्त्रीपुरुषें तंबाखू खातात व पुरुष तो ओढतात. स्त्रिया व भिक्षु लोक तपकीर ओढतात.

तिबेटी लोक बौद्ध धर्माचे आहेत. त्यांच्या देशांत बौद्ध धर्माच्या उपाध्यायवर्गाचें फार बंड आहे. त्यांना तिकडे 'लामा' असें म्हणतात. तिबेटांत हजारों लामा आहेत व तेथील राजासुद्धां एक लामाच असतो. हे लामा बुद्धाची प्रार्थना करण्यांत काल कंठीत असतात. तोंडानें प्रार्थनेचें मंत्र सारखे म्हटल्यानें तोंड दुखावयाला लागावयाचें म्हणून लामांनीं प्रार्थनेच्या लहान मोठ्या पितळेच्या व कथलाच्या गोल चकऱ्या तयार केल्या आहेत. एका कागदावर प्रार्थनेचे मंत्र लिहून त्याची गुंडाळी या चकरीच्या आंत घालतात, व हातानें ती चकरी गरगर फिरवूं लागतात. जितक्या वेळां चक्री फिरेल तितक्या वेळां आंतील सर्व मंत्रांच्या फेऱ्या होतात व तितके मंत्र म्हटल्याचें पुण्य लामाच्या पदरांत बिनबोभाट पडतें. मोठमोठ्या लामांची प्रार्थनाचक्रेंही मोठीं असतात. कांहीं प्रार्थना-चक्रें म्हणजे पवनचक्क्या असतात व कांहीं चक्रें ओढयाच्या वाहत्या पाण्यानें फिरतात. या पवनचक्क्या किंवा पाणचक्क्यांवर अनेक मंत्र लिहिलेले असतात. आणि वायु व जल हीं दोन पंचमहाभूतांतील भूतें प्रार्थनाचक्रें फिरवून लामांच्या प्रार्थनेचें काम करितात. हातपाय न हलवितां घरबसल्या पुण्य!


प्रार्थना यंत्र

तिबेटी लोकांत एका स्त्रीनें अनेक नवरे करण्याची चाल आहे. एक स्त्री दोघा तिघा भावांशीं लग्न करते, इतकेंच नव्हे तर एक-दोन शेजारीही नवरे करते! या कुटुंबसंस्थेंत स्त्री हीच कुटुंबांतील मुख्य मालकीण, 'कारभारीण' असते. ती शेतांत काम करते,

विणते, स्वयंपाक करते आणि दुकानावर तीच बसते. अनेक नवरे असल्याबद्दल तिबेटी स्त्रीला कृतकृत्यता वाटते व परदेशांतील एकुलता एकच नवरा असणाऱ्या स्त्रियांची तिला दया येते.

ल्हासा नांवाचें शहर तिबेटची राजधानी आहे. ल्हासा शहराबाहेर पोताल नांवाच्या विस्तृत राजवाडयांत तिबेटचा राजा जो मुख्य लामा तो राहतो. पोताल राजवाडा उंच टेकडीवर असून त्याच्यांत शेंकडों खोल्या आहेत. या राजवाडयांत पांचशें लामा व शेंकडों नोकर चाकर राहतात.

तिबेटी लोक चिनी लोकांप्रमाणेंच परकीयांचा तिरस्कार करितात, व त्यांच्या देशांत कोणाही परकीयाला येण्याची बंदी आहे. तथापि हिंदुस्तान सरकारनें खटपट करून तिबेटशीं व्यापारविषयीं तह केला आहे व हल्लीं या सरकारच्या आधारावरच तिबेट चीनपासून स्वतंत्र बनला आहे.

---

प्रकरण १० वें

## धरणीकंप व ज्वालामुखी पर्वतांच्या प्रदेशांतील जपानी लोक.

आपण आतां चीनप्रमाणेंच भात व मासे खाणारा चीनचा पूर्वेकडील शेजारी जो जपान देश त्याकडे वळूं. जपानी लोक चिन्याप्रमाणेंच ठेंगणे, पिवळ्या रंगाचे, बारीक तिरकस डोळ्यांचे आहेत व त्यांचींही गालांचीं हाडें वर आलेलीं असतात. जपान देश लहानच म्हणजे साधारणपणें आपल्या मद्रास इलाख्याइतका आहे. साठसत्तर वर्षांपूर्वीं जपान हें एक अज्ञात मागासलेलें असें बेट होतें. परक्या

लोकांना तेथें जाण्यास मज्जाव होता व एतद्देशीय लोकांनाही दुसऱ्या देशांत जाण्याची व त्यांच्याशीं व्यापार करण्याची परवानगी नसे.

त्या वेळीं जपानचा बादशहा नामधारी असून त्याच्या प्रधानाच्या —याला शोगून म्हणत-- हातीं सर्व सत्ता होती. प्रत्येक प्रांतावर दायमिओ नांवांचे लहान मोठे सरदार होते व त्यांच्या हाताखालीं सामुराई नांवाच्या पिढीजाद लष्करी पेशाच्या शिलेदारांचीं पथकें असून ते आपापल्यापरी स्वतंत्रपणें वागत असत, व एकमेकांशीं लढाया करीत. देशांत वतनदार दायमिओ व शिलेदार सामुराई यांनाच महत्त्व होतें. यांच्याखेरीज इतरांना तलवार वापरण्याचा हक्क नसे. दायमिओ पालखींतून चालला असतां रस्त्यांतील माणसांनीं जमिनीवर सपशेल आडवें पडून त्यांना साष्टांग नमस्कार घातला नाहीं अगर रस्त्याच्या बाजूस ते उभे राहिले नाहींत तर त्या दायमिओच्या सामुराईंनीं अशा अपराध्यांना तरवारीनें तेथेंच ठार करावें अशा चाल होती.

१८६८ मध्यें या मागासलेल्या व आपसांतील यादवीनें त्रस्त झालेल्या देशाच्या किनाऱ्यावर कमाँडर पेरी नांवाचा अमेरिकन नाविक अंमलदार कांहीं लढाऊ जहाजें घेऊन आला व आपल्या तोफांचा धाक दाखवून त्यानें जपानला परराष्ट्रांशीं व्यापार करण्यास भाग पाडलें. या राष्ट्रीय अपमानानें जपान जागा झाला व आपापसांतील भांडणें बाजूला सारून, शोगूनची जुलमी सत्ता झुगारून देऊन आपल्या बादशहाच्या एकछत्री अंमलाखालीं सर्व लोक एक झाले. या अभिनव क्रांतीच्या प्रसंगीं वतनदार दायमिओ व सामुराई यांनीं आपल्या आवडत्या मायभूमीसाठीं केलेल्या स्वार्थत्यागाला जगाच्या इतिहासांत तुळा नाहीं. दायमिओंनीं आपलीं वतनें-जहागिऱ्यांवर-आपखुशीनें पाणी सोडलें व ते पगारी नोकर बनले. वीस लाख सामुराईंनीं आपल्या प्राणांपेक्षां प्रिय व अनेक पिढ्यांपासून पवित्र

भावानें जतन केलेल्या तरवारींचा त्याग केला व इतर लोकांप्रमाणें ते लहानसान नोकऱ्या करून पोट भरूं लागले. काय हा स्वार्थत्याग!

अवघ्या चाळीस वर्षांत जपाननें आपला 'न भूतो न भविष्यति' असा अभ्युदय केला. त्यानें मोठें आरमार उभारलें, फौजा ठेवल्या, प्रचंड कारखाने काढले व जगाशीं अवाढव्य व्यापार सुरू केला. १८७२ त जपानी बादशहानें जाहीरनामा काढला: "यापुढें शिक्षण हें प्रत्येकाच्या आटोक्यांत येईल. **कोणत्याही जपानी खेड्यामध्यें एकही अशिक्षित कुटुंब आढळणार नाहीं, व कोणत्याही कुटुंबांत एकही अशिक्षित माणूस राहणार नाहीं."** किती उच्च ध्येय! या ध्येयाप्रमाणें पाण्यासारखा पैसा खर्च करून जपाननें शिक्षणामध्यें इतकी मजल मारली कीं, १९१० मध्यें जपानमध्यें शाळेंत जाणाऱ्या मुलांचें प्रमाण शेंकडा नव्याण्णव व मुलींचें शेंकडा ९७$\frac{1}{4}$ असें होतें. १९०४ सालीं चिमुकल्या जपाननें आपल्या नव्या आरमाराच्या जोरावर रशियासारख्या बलाढ्य देशाला रणांगणांत जेर केलें. आज जपान हें जगांतील पांच बलाढ्य राष्ट्रांपैकीं एक राष्ट्र असून त्याच्याशीं युरोपियन राष्ट्रें मोठ्या अगत्यानें दोस्तीचे तह करीत आहेत.

अशा या बलाढ्य सुधारलेल्या राष्ट्राची आपण आतां भेट घेऊं या.

जपान देश अनेक बेटें मिळून झालेला आहे. त्याचा सापासारखा आकार आहे. हीं बेटें डोंगराळ असून त्यांवरील सपाट प्रदेश समुद्रकिनाऱ्यालगतच आहे. यामुळें या भागांतच वस्ती जास्त आहे. या समुद्रकिनाऱ्यावर ठिकठिकाणीं अनेक सोईस्कर बंदरें आहेत. परदेशीं माल पाठविण्यास किंवा परदेशांहून माल आणण्यास बंदरें हींच महत्त्वाचीं केंद्रें असल्यानें बंदरावर किंवा त्यांच्या आसपासच मोठमोठ्या कारखान्यांचीं व गिरण्यांचीं शहरें स्थापन झालीं आहेत.

जपानच्या डोंगराळ भागांतून अनेक नद्या वेगानें खालीं वाहात येतात. या नद्यांचे ठिकठिकाणीं धबधबे आहेत. जपानांत सरोवरेंही अनेक आहेत. सारांश, जपानला पाण्याची कांहीं कमतरता नाहीं.

जपान हें शीत कटिबंधांत असल्यानें त्याची हवा थंड असते, व तें बेट असल्यानें तिच्यांत नेहमीं आर्द्रता असते. यामुळें जपानांत बारा महिने डोंगर, मैदानें, दऱ्या, खोरीं वगैरे सर्व प्रदेश हिरव्यागार गवतानें आच्छादलेला असतो व सर्वत्र फुलझाडें फुललेलीं असतात. जपानी लोक फुलांचे फार शोकी आहेत. त्यांना चेरी, प्लम्, व क्रिसॅन्थिमम् हीं फुलझाडें फार आवडतात. जपानांत या झाडांच्या अनेक बागा आहेत. या फुलांच्या मोसमांत जपानी लोक आनंदानें उत्सव करितात. कमलोत्सव, चेरी-उत्सव, क्रिसॅन्थिमम्-उत्सव असे त्यांच्यांत महत्त्वाचे फुलांचे सण आहेत. जपानी देवळाच्या आवारांत सुंदर असा फुलबाग असावयाचाच. या फुलांना वास येत नाहीं, परंतु त्यांचे रंग फार सुंदर असतात. उन्हाळ्यांत चेरी झाडांना फुलें आलीं म्हणजे त्यांची शोभा पाहाण्यास सारें गांव लोटतें. मुलांबाळांसह जपानी लोक बाग पाहाण्यास जातात व तासनतास फुलझाडांच्या सुंदर रंगाकडे बघत बसतात व तेथेंच फराळ करितात. या फुलबागांतून म्हातारे कोतारे, तरुण व मुलें आनंदानें बेहोष होऊन फिरतात, फुलांवर कविता रचितात, व त्या फुलझाडांनाच अडकवून घरीं जातात. बहर आलेल्या एकाद्या फुलबागेची शोभा पाहण्यास गरीब जपानी माणूस शंभर मैलांचा प्रवास सहज करितो. शाळांतील शिक्षक मुलांना घेऊन कमलांच्या सरोवराकडे सूर्योदयापूर्वीं नेतात व कमलें कशीं विकसतात ती गंमत त्यांना दाखवितात. काय हें फुलांवरचें प्रेम!

जपानी मुलींना लहानपणींच फुलांचे गुच्छ कसे तयार करावे, कोणत्या रंगाचें फूल कोणत्या रंगाच्या फुलापाशीं गुंफावें, कोणत्या रंगाच्या खोलीमध्यें कोणत्या रंगांच्या फुलांचा गुच्छ शोभतो वगैरे 'पुष्प-

शास्त्रां'चें शिक्षण मिळतें. साधारण जपानी मनुष्यसुद्धां पुष्पगुच्छांची रचना व त्यांच्या रंगांची जुळवाजुळव यांतील मर्म कलावंत चितार्‍या-इतकें जाणतो.

आतां मी तुम्हांला सुंदर फुलांपासून उग्र अशा ज्वालामुखी पर्वतांकडे नेतों. जपान जसा सुकुमार फुलांचा, तसाच भयंकर ज्वालामुखींचा देश आहे. सध्यां जपानांत पन्नास ज्वालामुखी पर्वत धुमसत आहेत व दुसरे अनेक पर्वत विझालेले आहेत; पण ते केव्हां पेट घेतील याचा कांहीं नेम नाहीं. जपानचा सर्वांत उंच पर्वत फुझियामा हा ज्वालामुखीच आहे. परंतु हल्लीं तो धुमसत नाहीं. याच्या वरचा भाग शंकूच्या आकाराचा असून तो बर्फाच्छादित असतो. जपानी लोक फुझियामाला फार पवित्र मानतात व त्याचें आदरानें दर्शन घेतात. घरोघर फुझियामाचें चित्र असतें.



फूजियामा

जपानांत हजाराच्यावर ऊन पाण्याचे झरे आहेत. जमिनीच्या पोटीं इतकी उष्णता असल्यावर देशांत भूकंप व्हावेत हें साहजिकच

आहे. तेथें वारंवार लहानमोठे भूकंप होतात. त्याची राजधानी जें टोकियो शहर त्याला दिवसांतून निदान एक तरी भूकंपाचा धक्का बसतो असें म्हणतात. मोठा धक्का बसला म्हणजे घरें पडतात, व मनुष्यहानि होते. १८७१ सालीं झालेल्या भूकंपांत दहा हजार माणसें दगावलीं, वीस हजार जखमी झालीं व एक लक्ष तीस हजार घरें धुळीस मिळालीं.

भूकंपाच्या धक्कयानें केव्हां मृत्यु येईल याचा भरवंसा नसल्यानें जपानी माणूस मरण्यास तयार असतो. त्याला मृत्यूची भीति वाटत नाहीं. ही त्याची वृत्ति लढाईच्या प्रसंगीं राष्ट्राच्या कामीं पडते. सेनापतीनें हल्ला करण्यास हुकूम दिला कीं, जपानी शिपाई तक्रार न करितां बेगुमानपणें उडत्या तोफांच्या तोंडावर आदळून पडतात व खुशाल मरतात.

धरणीकंपाचा परिणाम जपानी घरांवरही झाला आहे. जेथें वारंवार धरणीकंप व्हावयाचे तेथें दगड-विटा-लाकडांचीं व अनेक मजल्यांचीं घरें बांधून कसें चालणार? कारण डोक्यावरील दगड व तुळया अंगावर पडून घरांतील माणसें मरावयाचीं. शिवाय एक घर पडलें तर लगेच दुसऱ्या दिवशीं दुसरें घर बांधतां आलें पाहिजे. असें 'विंचवाचें पाठीवरील बिऱ्हाड' जपानला हवें. यासाठीं जपानी घरें एकमजलीच असतात. घराच्या छपरावर काळीं कौलें असतात किंवा चिनी लोकांप्रमाणें बांबूचें छप्पर असतें. छपराला आधार लहान लहान लाकडी खांबांचा असतो. जपानी घराला मातीच्या, दगडाच्या किंवा विटांच्या भिंती नसतात. त्यांना दारें, खिडक्या किंवा खोल्याही नसतात. घरांचा चौथरा जमिनीपासून एक फुटावर असतो. या चौथऱ्यावर चौकटींत बसविलेल्या व मागें पुढें सरकवितां येणाऱ्या जाड कागदाच्या व लाकडांच्या पातळ फळ्यांच्या भिंती असतात. दिवसा कागदाच्या

व रात्रीं लाकडाच्या भिंतींचा उपयोग करितात. दिवसां बहुतेक सर्व भिंती एकांत एक घड्या करून ठेवितात. यामुळें दिवसां जपानी घर म्हणजे एक लांबच लांब दालन दिसतें. फक्त स्नानगृह, स्वयंपाकगृह इत्यादि खोल्यांच्या कागदी भिंती उभ्या असतात. त्याला रस्त्याच्या कडेला आडोशालाही कोणत्याही प्रकारची भिंत नसते. कारण जपानी लोकांना मोकळी हवा व उजेड फार आवडतो. थंडी पडली असेल तेव्हां फार तर ते समोरची कागदी भिंत सरकवून तिचा आडोसा करितात. रस्त्यानें जाणाऱ्याला जपानी घरांत चाललेला व्यवहार दिसत असतो. रात्र झाली कीं, भराभर लाकडी भिंती चौकटींतून मागें पुढें सरकवून जपानी घराच्या पांच मिनिटांत लहानमोठ्या खोल्या तयार होतात.

गरीब असो किंवा श्रीमंत असो, जपानी माणसाचें घर याच प्रकारचें असतें. श्रीमंतांच्या घरांच्या खांबांवर व तक्तपोशांवर सोनेरी काम केलेलें असतें, व जमीन तुळतुळीत लाकडाची केलेली असते. पण त्यांच्याही घराला दिवसां कागदी व रात्रीं लाकडी भिंती असावयाच्या. गरीब लोक वाटेल तेव्हां आपलें घर व त्यांतील सर्व सामान डोक्यावर घेऊन दुसऱ्या आळींत जाऊन तेथें बिऱ्हाड थाटतात. इतकें जपानी घर सुटसुटीत असतें. जपानी घरें बांधण्याची रीतही आपल्यापेक्षां उलटी आहे. आपण आधीं चौथरा बांधतों. जपानीलोक आधीं खांबाच्या आधारावर छप्पर बांधतात व मग लाकडी भिंती तयार करतात. जपानी घरांत इंग्रज लोकाप्रमाणें खुर्च्या टेबलें नसतात किंवा आपल्याप्रमाणें जाजमें, सतरंज्या अंथरलेल्या नसतात. त्याऐवजीं जाड जाड मऊ व पांढऱ्या स्वच्छ गवती चटया अंथरलेल्या असतात. आपल्याला लवकरच जपानी लोकांकडे पाहुणचाराला जावयाचें आहे; त्या वेळीं त्यांचीं घरें, त्यांतील सामानसुमान आपल्या दृष्टीस पडेलच. तेव्हां सध्यां इतकेंच पुरें. धरणी-

कंपाच्या भीतीनें यंदापासून जमीनीच्यावर घरें बांधण्याऐवजीं जमि-नींतच खोल घरें बांधण्याचा प्रयत्न चालू आहे.

जपानी लोकांचा पोशाक गमतीचा असतो. पुरुष व स्त्रिया दोघेही किमोनो नांवाचे पायघोळ झगे घालतात. या झग्यांना आपल्या कोटाप्रमाणें बटणें नसतात. झगे ऐसपैस असून त्यांची एक बाजू दुसऱ्या बाजूवर येते. किमोनोच्या बाह्या फार पोकळ असतात; व त्यांच्या आंतल्या बाजूला कोपरांजवळ शिवून खिसे तयार केलेले असतात. या किमोनोवरून जपानी लोक कमरेभोंवतीं रेशमी कमर-बंद [शेलाच म्हणाना] गुंडाळतात. याला ओबी म्हणतात. या शेल्याचेंच जपानी पोशाकांत महत्त्व असतें. हे उंची रेशमाचे असून त्यांना किंमतही फार पडते. पुरुषांच्या व स्त्रियांच्या पोशाकांत फरक इतकाच कीं, पुरुषांचा शेला अगदीं आंखूड – कमर पट्टयाइतका – असतो. परंतु स्त्रियांचे शेले पुष्कळ रुंद व लांबलचक असतात. जपानी बाया अंगाभोंवतीं त्यांचे अनेक वळसे घेऊन मग पाठीमागें ऐटींत गांठ मारितात. मुलांचाही पोशाक हाच. फक्त त्यांचे किमोनो भडक रंगांचे असतात, व त्यांच्या आईबापांचे किमोनो काळ्या, निळ्या किंवा भुरकट रंगांचे असतात.

जपानी लोक पायांत लाकडाच्या खडावा किंवा गवताच्या सपाता घालतात. गवती सपातांचा उपयोग उन्हाळ्यांत होतो. पावसाळ्यांत खडावांना खालीं तीन इंची ठोकळे लावतात. जणूं काय पावसाळ्यांत सर्व जपानी राष्ट्र तीन इंच उंच होतें. तिकडील जमीन सर्द अस-ल्यानें जपानी लोकांना लाकडी खडावा घालणेंच बरें पडतें. हॉलंड देशांत सुद्धां याच कारणासाठीं लाकडी जोडे घालतात. जपानी लोकांचे पायमोजे गमतीचे असतात. त्यांच्यांत चार बोटांचें घर-वेगळें व आंगठ्याचें घर वेगळें अशी रचना असते. पावसाळ्यांत सर्व

जण जाडी कागदांच्या छत्र्या वापरतात. या छत्र्यांवर सुंदर चित्रें व वेलबुट्टी काढलेली असते.

अलीकडे युरोपियन बायाही जपानी छत्र्या वापरूं लागल्या आहेत. अर्थात् हा पोशाक शहरांतल्या लोकांचा आहे. खेडेगांवांतील लोकांची माहिती पुढें येईलच.

हा जपानचा राष्ट्रीय--स्वदेशी--पोशाक, परंतु जपानमध्यें आपल्याप्रमाणेंच इंग्रजी फॅशनचें बंड आहे. सर्व बाबतींत इंग्रजांचें अनुकरण करण्याकडे जपानची प्रवृत्ति आहे. त्यामुळें तिकडील शहरांतले शिकलेसवरलेले व सुखवस्तु लोक इंग्रजी तऱ्हेचे कपडे घालतात, पुष्कळ जपानी बायाही मडमांसारखा पोशाक करितात. जपानचे बादशहा व राणी घराबाहेर इंग्रजी पोशाकांतच असतात. घरांत मात्र राणी बहुधा किमोनो गुंडाळते व त्यावरून शेला लपेटते. शाळेंतील मुली इंग्रजी मुलींसारखे कपडे घालतात.

आतां जपानी लोक काय खातात, कसें खातात, घरांतील त्यांचे रितीरिवाज कसे असतात याची माहिती आपण मिळविली पाहिजे. त्यासाठीं अर्थात् एकाद्या जपानी मित्राच्या घरीं आपल्याला एक दिवस राहाण्यासाठीं गेले पाहिजे. चला तर.

चला, आपल्याला शहरांतल्या एका मित्रास भेटावयास जावयाचें आहे. कशात बसून जावें? घोड्याचा टांगा किंवा बग्गी? छे: ती जपानांत मिळावयाची नाहीं. आपल्याला येथें रिक्षांतूनच बसून गेलें पाहिजे. ही एक दोनचाकी गाडी आहे व हिला माणसेंच ओढतात. आपल्याकडेही मद्रासला रिक्षांचा उपयोग करितात. हे पहा रस्त्याच्या बाजूला किती रिक्षा उभे आहेत. हे आले रिक्षावाले धावत. सारेजण आपल्याला आपलाच रिक्षा ठरविण्याचा आग्रह करीत आहेत. कोणी आपल्या पोटऱ्या दाखवून 'मी कसा बळकट

आहे. धावत धावत तुम्हांला घेऊन जाईन' असें म्हणत आहे. ठरवा कांहीं रिक्षे. रिक्षांत एक, फार तर दोन स्वाऱ्या बसतात. हो. रिक्षावाल्यांचा पोशाक पाहिलात का? निळ्या रंगाच्या गुडघ्यापर्यंतच्या सुट्या विजारी, पोकळ सदरे व डोकीवर पालथ्या घमेल्याच्या आकाराच्या गवती टोप्या. त्यांच्या पायांत गवताच्या वहाणा आहेत. त्यांनीं बिचाऱ्यांनीं उंची किमोनो व शेले कोठून आणावे?

त्यांना सबंध दिवसाचें फार तर २–२॥ रुपये भाडें मिळावयाचें. बसा, एकएकजण रिक्षांत. कसे रिक्षावाले पळतात पहा! ते तासाला सात आठ मैल सहज रिक्षा घेऊन पळतात. चढ असला म्हणजे पाठीमागून एकजण ढकलीत असतो. गरीब बिचारे! त्यांना किती घाम आला! आपण त्या विजेच्या ट्रॅममधून गेलों असतों तर बरें होतें. जपानला सर्व शहरांत विजेच्या ट्रॅमगाडया, विजेच्या आगगाडया [ आतां त्यांना 'आग'गाडया कसें म्हणावें? 'वीज'गाडयाच म्हणूं. ] व मोटारी आहेत.

असो. आपण आपल्या मित्रांच्या घराजवळ तर आलों. उतरा खालीं. बघा येथून घराचा अर्धा भाग सर्व रस्त्यावरून दिसत आहे. घरांत कोणी दिसत नाहीं वाटतें. टाळी वाजवा बरें! जपानांत कोणाला हांक मारावयाची असल्यास अशी चाल आहे. ती बघा, १७।१८ वर्षांची मुलगी आली. ही मोलकरीण बरें कां! अरे बापरे! ही काय करीत आहे? ती गुडघे टेकून जमिनीवर बसली. तिनें दोन्ही हात जमिनीला टेकविले व डोकें जमिनीला लावलें. हा जपानी नमस्कार बरें कां?

चला तिच्याबरोबर आंत. बूट, जोडे बाहेरच ठेवा. बसा या चटईवर. चटई किती मऊ व जाड आहे, जवळजवळ या पुस्तकाच्या तिप्पट! हें काय आणलें या मोलकरणीनें? धगधगीत निखारे! हे

कशाला? चिरूटाची नळी पेटवायला. जपानांत सर्व स्त्री-पुरुष विडया ओढतात व कोणी घरांत आलें कीं आधीं विडी पेटवायाला त्याला निखारा देणें हा त्यांचा शिष्टाचार आहे.

ही मोलकरीण किती विनयी व चतुर आहे! होय, तिला मोलकरीण म्हणणेंच चूक आहे. जपानांत कोणाच्या घरीं नोकरी करणें कमीपणाचें समजत नाहींत. नोकरी करणाऱ्या मुली चांगल्या कुलांतील असतात. नोकरीस लागण्यापूर्वीं त्या जपानी शिष्टाचाराचें शिक्षण घेतात; कारण तेथें शिष्टाचारांना फार महत्त्व दिलें जातें. तें पुढें आपल्याला दिसेलच. मोलकरणी आपल्या मालकिणीशीं व पाहुण्यांशीं हलक्या आवाजांत अदबीनें बोलतात व गुडघे टेकून त्यांना नमस्कार करितात. परंतु बोलण्याचालण्यांत, थट्टा-मस्करींत त्या घरच्या माणसांप्रमाणें बरोबरीच्या नात्यानें वागतात. शिवाय मालक किंवा मालकीण मोलकरणींना नोकरांप्रमाणें हांक मारतात, परंतु तिऱ्हाइतांनीं त्यांना अदबीनें बरोबरीच्या नात्यानें वागवावें, त्यांना 'सान' (कुमारिकाबाई) म्हणून संबोधावें असा जपानी रिवाज आहे.

मालकमालकीण घरीं नसतात, तेव्हां या मोलकरणींना घरधनिणीप्रमाणें पाहुण्याचें आगतस्वागत करावें लागतें. ती त्यांना कुशल प्रश्न विचारील, त्यांच्याशीं बोलत बसेल, त्यांना फराळाचें आणून देईल, सर्व कांहीं व्यवस्थित रितीनें करील. एकदां एक इंग्रज बाई तर सपशेल फसली. मोलकरणीनें तिच्याशीं इतक्या संभावितपणें वर्तन केलें व संभाषणांत हुषारी दाखविली कीं, त्या बाईला वाटलें कीं, ही मालकीणच आहे. असो. ही पहा घरांतील मंडळी आली. झाले त्यांचे मघासारखे नमस्कार सुरू. उठतांना ते जोरानें आंत श्वास घेतात. हा एक नमस्कारांतीलच भाग आहे. चला, आपण पण श्वास आंत ओढूं. चांगला आवाज निघाला पाहिजे बरें कां? खालीं पायाला कांटा मोडल्यावर आवाज निघतो तसा. ती पहा मोलकरीण तबकामध्यें चिनी-

मातीची चहादाणी व चिनीमातीच्याच लहान लहान कपबशा घेऊन आली. तबक खालीं ठेऊन तिनें आधीं आपल्याला नमस्कार केला व मग एकेकास चहा भरून दिला. जपानी लोक चहांत साखर व दूध घालीत नाहींत. तुम्ही केव्हांही जपानी गृहस्थास भेटावयास जा, चहा पुढें यावयाचाच. तोही एक कप नाहीं. पांच लहान लहान कप. ना साखर ना दूध. खाशी शिक्षा! दुकानांत कांहीं विकत घेण्यास गेलांत तरी तेथेंही चहा आहेच. जास्ती वेळ थांबलांत तर चहाचे दोन चार हप्ते व्हावयाचे. प्रत्येक जपानी देवळाच्या आवारांत चहाचें दुकान असावयाचेंच. देवळांतच नाहीं, पण सर्वत्र तुम्हांला चहाचीं दुकानें आढळतील. या चहाच्या दुकानांतच मित्र-मंडळींना मेजवानी देण्याचा जपानी लोकांचा रिवाज आहे. या प्रसंगीं नाचगाणेंही होतें.

असो. हें चहा पुराण पुरें. हीं पहा घरांतील मुलें आपल्याला भेटण्यास आलीं. या मुलींच्या पाठकुळीला काय आहे? त्यांचीं लहान लहान भावंडें. जपानांत लहान मुलांना पाळण्यांत निजवीत नाहींत. तीं दिवसां आपल्या वडील बहिणींच्या पाठीला कपड्यांत बांधलेलीं असतात. हें ओझें घेऊन जपानी मुली खुशाल रस्त्यावर खेळतात, बागडतात. बहीण रस्त्यावर उड्या मारून कांहीं खेळत असतांना तीं मुलेंही पाठीशीं खुशाल निजतात. खालीं वर धक्के बसतात, त्याचें त्यांना भान नसतें. लहान मुली पाठीशीं मोठमोठ्या बाहुल्या बांधतात. पुढें कराव्या लागणाऱ्या कामाची रंगीत तालीमच ती.

आंत आल्याबरोबर सर्व मुलांमुलींनीं किती गंभीरपणें गुडघे टेकून डोकें लवून आपल्याला नमस्कार केला. जपानांत शिष्टाचारांचें फार प्रस्थ आहे, हें मीं पूर्वींच सांगितलें. हा अनुभव आपल्याला पदोंपदीं येतो. अगदीं लहानपणापासून जपानी मुलांना

बारीकसारीक रीतभात शिकविली जाते. नमस्कारांचेंच घ्या. मोठ्या माणसांना, बरोबरीच्यांना व कमी दर्जाच्या माणसांना करावयाचे नमस्कार वेगवेगळे. शिवाय, प्रत्येक दर्जाच्या माणसानें करावयाचे नमस्कार वेगळे. नमस्कारावरून जपानी मनुष्य किंवा त्यांचीं मुलें समजांतील कोणत्या दर्जाचीं आहेत तें ओळखतां येतें असें म्हणतात. लहानपणींच खोलींत कसें यावयाचें, चहाचे तबक किंवा भांडीं कशीं व किती उंचीवर हातांत धरावयाचीं, तीं जमिनीवर कशीं ठेवावयाचीं, कोणत्या प्रकारच्या माणसांस चहा आधीं द्यावयाचा व तो कसा हें सर्व शास्त्र जपानी मुलें लहानपणींच शिकतात. एकदां एक परका गृहस्थ एका जपानी दुकानांत शिरला. त्याबरोबर दुकानदार व त्याचीं बायकामुलें या सर्वांनीं त्याला नमस्कार केलाच. पण बहिणीच्या पाठीशीं झोपलेल्या दोन वर्षांच्या मुलास त्यांनीं मुद्दाम उठविलें. जागें झाल्याबरोबर न रडतां न भितां तें मूल शांतपणें खालीं उतरलें व गंभीरपणानें त्यानें लवून त्या परक्या गृहस्थाला नमस्कार केला. पाठीशीं बांधल्याबरोबर परत तें मूल झोपीं गेलें हें सांगणें नकोच.

चहाच्या नंतर स्नान. जपानी लोक चिनी लोकांप्रमाणें घामट नाहींत. ते दिवसांतून दोनदां स्नान करितात. जपानी मजूर रात्रीं कामावरून घरीं आल्यावर आधीं स्वच्छ स्नान करील, मग इतर गोष्टी. जपानांत प्रत्येक शहरांत अनेक सार्वजनिक स्नानगृहें असतात व त्यांत रोज हजारों माणसें स्नानें करितात. सर्वांच्याच घरीं स्नानगृह नसतें. टोकियो राजधानींत हजारावर सार्वजनिक स्नानगृहें आहेत. असो. चला, ती मोलकरीण स्नानगृहाची वाट आपल्याला दाखवीत आहे. चारी बाजूला लाकडी भिंत असलेली ही एक लहान खोली आहे. तें पहा मोलकरणीनें एक भिंत मागें ओढून आंत जाण्यास दार केलें.

जपानी लोकांची स्नान करण्याची रीत कांहींअंशीं इंग्रज लोकांसारखी आहे. एक मोठ्या लाकडी लांबच लांब टिपांत गरम पाणी असतें, व त्यांत जपानी लोक बसतात व आपलें अंग चोळतात. नंतर टिपांतून बाहेर येऊन मग अंगाला साबू लावतात, व गारपाण्याची एक घागर डोक्यावरून ओततात कीं झालें स्नान. घरांतील सर्व माणसें त्याच टिपांत बसून स्नान करितात. घरच्या मंडळींचीं स्नानें आटोपलीं म्हणजे नोकरचाकर त्याच पाण्यांत स्नान करितात. जपानी लोकांना स्नानाला फार गरम पाणी लागतें. अगदीं कढत तापलेल्या पाण्यांत ते खुशाल बसतात. सांभाळा, आपल्याला या घरांत स्नान करणें म्हणजे एक शिक्षाच आहे. किती हें ऊन पाणी ? करितां काय ? करा झालें स्नान.

स्नानगृहांतील पाणी मोरींतून घरामागील बागेला जातें. जपानी लोक बागेचे फार शोकी. त्यांच्या घराला लहान का होईना बाग असावयाचाच. लहान मुलांसाठीं कृत्रिम असे अगदीं लहान लहान बाग तयार करण्यांत तर त्यांचें चातुर्य दिसून येतें. अगदीं लहान झाडें, लहानशी कृत्रिम नदी, तिच्यावर लहानसा पूल, लहानशा बसावयाच्या खुर्च्या अशी या चिमुकल्या बागेंत मोठी गंमत असते.

स्नानानंतर जेवण. चला, बसा चटईवर. ते पहा पाट आले. या पाटांवर जेवण्याचीं भांडीं ठेवितात. जपानी लोक आपल्यासारखे ताटांत जेवत नाहींत. प्रत्येक पदार्थ लहान मोठ्या चिनी मातीच्या वाडग्यांत असतो; व हे वाडगे प्रत्येकासमोर पाटावर मांडून ठेवितात. थंडी पडली असल्यास शेगडी जवळ घेण्याची चाल आहे. हिला हिबाची म्हणतात. बसा जेवायला. जपानी लोकांचें मुख्य खाणें म्हणजे भात व मासे. डोंगराळ मुलूख, विपुल पाणी व सर्द हवा असल्यानें तेथें भातशेतीच विशेष असते. भोंवताली समुद्र असल्यानें वाटेल तितके मासे मिळतात. जपानी लोक बौद्धधर्माचे



"जपानी लोकांचें जेवण"

असल्यानें वास्तविक त्यांनीं हिंसा करूं नये. पण मासे खाल्यावांचून कसें भागतें. त्यांची चटक लागलेली; तेव्हां त्यांनीं माशांचें नांव 'पाणभाजी' ( पाण्यांतील भाजी ) असें ठेविलें व याप्रमाणें मनाची समजूत ( फसवणूक म्हणा हवें तर ) करून घेऊन ते खुशाल मासे खाऊं लागले. जपानी लोक माशांचे अनेक खाण्याचे पदार्थ तयार करितात. ते कांहीं मासे तर कच्चेच तुकडे करून त्यांवर सॉय नांवाचें पातळ आंबट पेय ओतून खातात. याशिवाय त्यांच्या जेवणांत घेवड्याच्या शेंगाची पातळ भाजी, नाना प्रकारचीं लोणचीं व मुरंबे, गोड पोळी वगैरे पदार्थही असतात. माशाप्रमाणें समुद्रांतले बारीक गवत कच्चे किंवा उकडून मीठ मसाला लावून खाणें जपान्यांना फार आवडतें. याशिवाय जमिनीवर उगवणाऱ्या सर्व पालेभाज्या, गाजरें, बटाटे, कांदे वगैरे ते खातात. ते शेवटीं भात घेतात. भाताचा आग्रह फार. ते वारंवार भात वाढतात. भाता नंतर चहा पितात, कीं जेवण संपलें. कधीं कधीं ते भातांत चहा ओतून तो खातात.

जपान्यांचा खाण्याचा एक आवडता पदार्थ म्हणजे मुळा. हा मुळा चांगला दोन हात लांब व मनगटाएवढा जाड असतो. ते मुळा कच्चा खातातच; पण विशेषतः त्याला वाळवून तीन तीन महिने खारवून व्हिनेगरमध्यें ठेवून मग तो खातात. यावेळीं मुळ्याची इतकी दुर्गंधी सुटली असते कीं, आपल्याला तेथें बसवणार नाहीं. पण जपानी लोक तो मिटक्या मारीत खातात. जपानांत फारशीं गुरें नाहींत. त्यामुळें ते बहुधा सागुती खात नाहींत व लोणी, दूध वगैरे पदार्थही खात नाहींत. त्यांच्या चहांत दूध नसण्याचें कदाचित् हें एक कारण असावें.

जपानी लोक भात आपल्याप्रमाणें हातानें खात नाहींत. ते दोन लांब पेन्सिली इतक्या जाड्या काड्या हातांत धरून त्या काड्यांनीं भात घेऊन खातात. आपल्याला संवय नसल्यानें या काड्यांनीं खातां येत नाहीं. वेळ फार लागतो, व अंगावर भात सांडतो. शिवाय, एक एक शित खात बसण्याचा कंटाळा येतो. परंतु जपानी लोक या काड्यांनीं भराभर खातात.

आतां रात्रीं झोपण्याची कशी व्यवस्था असते तें पाहूं. निजण्याची वेळ झाली म्हणजे भराभर लाकडी भिंती ओढून खोल्या तयार करण्यांत येतात. भिंतीला चित्रविचित्र कागदी कंदील टांगतात. हा दिवा रात्रभर जळतो. जपानी लोक गाद्या, पलंगपोस व उशा वापरीत नाहींत. चटईवर ते एकावर एक अशा दोन तीन रजया अंथरतात कीं झाला तयार बिछाना. यावर पलंगपोस नसतो. पण उशाला? ती तर गंमत आहे. जपानी उशा म्हणजे लाकडाचे विटेसारखे ठोकळे.


जपानी उशी

ठोकळ्यावर कागदांची एक घडी ठेवितात. या ठोकळ्यावर डोकें ठेवावयाचें नसतें; नुसती मान ठेवायाची व डोक्याला लोंबकळूं द्यावयाचें. आहे कीं नाहीं ही स्नानाच्या पाण्यासारखी दुसरी शिक्षा? जपानी बायांची केशरचना फार भानगडीची असते. उशीवर डोकें ठेविल्यास केस विसकटतील म्हणून हे अजब ठोकळे कदाचित् प्रचारांत आले असतील. असो. ठोकळे चालत नसतील तर घ्या हात उशाशीं व जा झोपीं पाहूं.

## जपानी मुलें, त्यांचें शिक्षण व खेळ.

आपल्याप्रमाणेंच जपानांतही मुलींपेक्षां मुलांचें महत्त्व जास्ती मानतात. पुत्रजन्माचा जपान्यांना जसा आनंद होतो तसा मुलीच्या जन्माचा होत नाहीं. मूल एक महिन्याचें झालें म्हणजे त्याला क्वान्नन नांवाच्या देवीच्या पायांवर घालावयाला नेतात. देवीच्या देवळांत देवीचा घोडा व कोंबडा असतो. या देवीपुत्रांना तांदुळ वहावे लागतात. तिसऱ्या व पांचव्या वाढदिवशीं परत मुलांना देवदर्शनास नेतात. तिसऱ्या वर्षापर्यंत मुलींच्या टाळू भोंवतालचे केस काढतात व मग पुढें वाढूं देतात. मुलगा पांचव्या वर्षापासून पुरुषाप्रमाणें व मुलगी सातव्या वर्षापासून स्त्रीप्रमाणें पोशाक करूं लागतात. मुली लग्न होईपर्यंत उंची रेशमाचे व भडक रंगाचे किमोनो व ओबी वापरतात. या किमोनोवर नानाप्रकारचीं फुलें काढलेलीं असतात. लग्न झाल्यावर मुलीनें भडक रंगाचे कपडे वापरणें वाईट समजतात. जपानी मुलींचें लग्न १६।१७ व्या वर्षी होतें. लग्न झाल्यावर तिला सासूच्या हाताखालीं वागावें लागतें.

जपानी मुलांना शिष्टाचारांप्रमाणें आज्ञाधारकपणाचें बाळकडू दिलें जातें. आईबापांची व बादशहाची आज्ञा पाळणें हें जगांतील मुख्य कर्तव्य आहे असें जपानी मुलांना अनेक गोष्टींच्या रूपानें व

नीतिबोध करून शिकविलें जातें. जपानी मुलांची लहानपणापासून आपल्या बादशहावर निस्सीम भक्ति असते व त्याच्यासाठीं तो नेहमीं मरावयला तयार असतो. प्रत्येक जपानी घरांत एक खोली किंवा खोलीचा एक भाग बादशहाच्या उपयोगासाठीं देवघराप्रमाणें राखून ठेविलेला असतो. या खोलीला तोकोनोमा म्हणतात. या तोकोनोमांत जपानी मुलें रोज सकाळीं ताज्या फुलांचे गुच्छ ठेवितात. तोकोनोमाचा उद्देश हा कीं, बादशहाला कधीं गरज लागली तर झोपायला खोली तयार असावी. बादशहाला अर्थात् कधीं या तोकोनोमांची गरज लागत नाहीं; पण या चालीवरून जपान्यांची राजभक्ति दिसून येते. जपानी मुलींच्या अत्यंत सुंदर बाहुल्या त्यांच्या राजाराणीच्या असतात. या बाहुल्यांना त्या फार आदरानें वापरतात.

जपानांत मुलांच्या शिक्षणाची सोय फार नामी आहे. तेथें (१) बालोद्यान पद्धतीच्या शाळा (२) प्राथमिक शाळा (३) दुय्यम प्रतीच्या शाळा (४) धंदे शिक्षणाच्या शाळा व (५) विश्वविद्यालयें अशा मुख्यत्वें करून पांच प्रकारच्या शिक्षणसंस्था असतात. बालोद्यान शाळांत वयाच्या तीन वर्षांपासून सहा वर्षांपर्यंत मुलें शिकतात. या शाळांत मुलें फक्त गमतीचे खेळ खेळतात व व्यायाम करितात प्राथमिक चार इयत्ता शिकविणाऱ्या शाळा व वरिष्ठ प्राथमिक शाळा या प्राथमिक शाळांत ६ पासून १२ व्या वर्षापर्यंत मुलें असतात. मुलाच्या वयाच्या दहाव्या वर्षापर्यंत वर्षांतून बत्तीस आठवडे त्यानें शाळेंत हजर राहिलेंच पाहिजे अशी तिकडे सक्ति आहे. चार इयत्तांच्या शाळांत लेखन, वाचन, अंकगणित, व्याकरण, नीतिशिक्षण हातकाम, चित्रकला, कवाईत, मुलींना शिवणकाम व गायन, हे विषय शिकवितात. वरिष्ठ दर्जाच्या प्राथमिक शाळांत याशिवाय इतिहासभूगोल, इंग्रजी, पदार्थ-विज्ञानशास्त्र, शेतकी व व्यापार हे विषय अधिक शिकवितात.

दुय्यम शिक्षणाचेही (अ) मध्यम प्रतीच्या शाळा व (ब) उच्च प्रतीच्या शाळा असे दोन प्रकार असतात. मध्यम प्रतीच्या शाळांत इंग्रजी, फ्रेंच, जर्मन व चिनी या भाषा, आणि रसायनशास्त्र, सृष्टिशास्त्र, शेतकी वगैरे विषय असतात. या शाळांतून मुलें कॉलेजांत अगर धंदे शिक्षणांच्या संस्थांत जातात. उच्च प्रतीच्या शाळांत दोनच वर्ग असून सतरावें वर्ष पुरें झालेल्या विद्यार्थ्याला दाखल करितात. मध्यम प्रतीच्या शाळांतील विषयांशिवाय या शाळांत यंत्रशास्त्र, भूगर्भशास्त्र, खनिजशास्त्र, भूमिति व तत्त्वज्ञान हे विषय असतात. यांपैकीं कांहीं शाळांत कायदा, वैद्यक व धंदे यांच्या शिक्षणाची सोय असते.

वैद्यक, कायदा, धंदेशिक्षण, वाङ्मय, शास्त्रीय विषय यांची अनेक कॉलेजें जपानांत आहेत व त्यांचा तीनपासून पांच वर्षांचा अभ्यासक्रम असतो. याशिवाय निरनिराळ्या धंद्याचें सप्रयोग व संपूर्ण असें तात्त्विक शिक्षण देणाऱ्या तेथें उच्च संस्था आहेत. टोकियो येथील व्यापारी शिक्षणाची संस्था जगांत उत्तम गणिली जात आहे असें म्हणतात.

जपानच्या शिक्षणक्रमांतील महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्राथमिक शाळांपासून कॉलेजांतील उच्च शिक्षण घेईपर्यंत व्यायाम व लष्करी कवाईत यांची सक्ति ही होय. मुलें दर तासानंतर १५ मिनिटें व्यायाम करितात. सर्व विद्यार्थ्यांचा एकाच तऱ्हेचा लष्करी पोशाक असतो व त्यांना लष्करी खात्यांतील अंमलदारांकडून कवाईतीचें शिक्षण मिळतें. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे जपानांत धार्मिक शिक्षणाऐवजीं नीतिशिक्षण देतात. कॉलेजांतील शिस्त विलक्षण कडक असते.

जपानांत मुलांप्रमाणें मुलींच्याही प्राथमिक व दुय्यम प्रकारच्या शिक्षणसंस्था आहेत. प्रत्येक जिल्ह्याला एक तरी मुलींचें हायस्कूल

असलेंच पाहिजे असा तेथें कायदा आहे. मुलींच्या हायस्कुलांत जपानी भाषा, इंग्रजी भाषा, इतिहास, भूगोल, बीजगणीत, शास्त्रियविषय, शिवणकाम, गृहव्यवस्था, लेखन, चित्रकला, गायनवादन, कवाईत, हातकाम, चिनी वाङ्मय व शिक्षणशास्त्र हे विषय शिकवितात. याशिवाय सुईणपणा, रोग्यांची शुश्रूषा, स्वयंपाक, शिवणकाम, रेशमाचें विणकाम, रंग देणें, गायनवादन, वैद्यक वगैरे विषयांच्या वेगवेगळया शाळा आहेत. जपानांतील स्त्रीशिक्षणाची विशेष महत्वाची संस्था म्हणजे १९०१ सालीं टोकिओ येथें निघालेलें स्त्रियांचें विश्वविद्यालय होय. याचे चार वेगळाले भाग असून अभ्यासक्रम तीन वर्षांचा आहे. विश्वविद्यालयांतील विद्यार्थिनींना वसतिगृहांतच राहावें लागतें, व स्वयंपाक व इतर व्यवस्था त्यांनाच आळीपाळीनें पाहावी लागते. मुलींना पुरुषी शिक्षण न देतां त्यांना त्यांच्या योग्य शिक्षण देऊन सुपत्न्या व सुमाता बनविणें, त्यांच्यांत स्वदेशाभिमानाची ज्योत प्रज्वलित करणें हें या विश्वविद्यालयाचें ध्येय आहे. या महिला विश्वविद्यालयाच्या धर्तीवरच पुण्यास कर्मवीर कर्वे यांनीं स्त्रियांचें विश्वविद्यालय काढलें आहे.

जपानी लहान मुलें हातांत वही व सोरोबान नांवाची अंक मोजण्याची अनेक रंगाची गोट्यांची चौकट घेऊन शाळेंत जातात. शिक्षकास तीं अगदीं लवून नमस्कार करितात व त्याच्या सन्मानार्थ श्वास आंत ओढून घेतात. जपानी प्राथमिक शाळांत टाक किंवा लेखणी वापरीत नाहींत. मुलें ब्रश शाईत बुडवून त्यानें वहींत अक्षरें काढतात. जपानी लिपींत ४७ मूळाक्षरें आहेत. याशिवाय सबंध वाक्य किंवा सबंध शब्द दर्शविणारीं शेंकडों चिन्हें असतात. जपानी मुलांना नीट वाचतां येण्यापूर्वीं शेंकडों चिन्हें ओळखण्यास शिकावें लागतें. जपानी पुस्तकें चिनी पुस्तकांप्रमाणेंच शेवटच्या पानापासून सुरू होतात व पानावरील ओळीवर सुरू होऊन खालीं संपतात.

## जपानी खेळ

जपानी मुलांचे खेळ अनेक आहेत. आपल्या मुलांप्रमाणेंच ते भोवरे खेळण्यांत व लढविण्यांत पटाईत असतात. त्यांना फुलपाखरांना पकडणें फार आवडतें. काजव्यांना पकडण्याचा खेळ तर त्यांच्या फार आवडीचा. मुलांबरोबर मोठीं माणसें सुद्धां हातांत पंखे घेऊन रात्रीं काजवे पकडण्यांत गुंतलेले आढळतात. जपानी मुलें पांच सहा झुरळें पकडतात व त्यांना कागदाच्या लहान गाड्यांत तांदूळ भरून त्या गाड्या ओढावयास लावतात. हा एक त्या मुलांचा आवडता खेळ आहे.

परंतु जपानांत मुलांच्या खेळांचे व सणाचे असे दोन दिवस. एक सण मुलांचा व दुसरा मुलींचा. मुलांच्या सणाला पतंगाचा किंवा कार्प नांवाच्या माशाचा सण असें नांव आहे. हा मे महिन्याच्या ५ व्या तारखेला असतो. ज्या घरीं देवानें मुलगे दिले आहेत व विशेषतः ज्या घरीं त्या वर्षीं मुलगा जन्मला आहे त्या घरांत हा सण आनंदानें साजरा करितात. घराबाहेर कार्प नांवाच्या माशाच्या आकाराचा पतंग बांबूला दोरीनें बांधून ठेवितात. आपल्याकडील घरोघर दिसणाऱ्या गुढ्यातोरणांसारखाच हा एक प्रकार. पतंगास व या सणास कार्प माशाचें नांव देण्याचें कारण त्या माशांत समुद्रांतील प्रवाहाच्या उलट पोहण्याची व धबधब्यांतून उडी मारून पुढें जाण्याची शक्ति असते. आपल्या मुलग्यांनीं मोठेपणीं कार्पप्रमाणें प्रतिकूल परिस्थितीशीं धैर्यानें टक्कर द्यावी अशी जपान्यांची इच्छा असते.

या दिवशीं म्हातारीं माणसें, तरुण, पुरुष, लहान मुलें सर्वजण पतंग उडवितात. आपल्या गुजराथमध्येंहि संक्रांतीच्या दिवशीं सर्व प्रकारचीं माणसें पतंग उडवितात. गरुड, राक्षस, लहान मूल, फुल-

पांखरूं वगैरे अनेक प्रकारचे आकार पतंगांना दिलेले असतात. या दिवशीं जपानांतील दुकानें नानाप्रकारच्या मुलांच्या खेळण्यांनीं गच्च भरलेलीं असतात. पतंगाच्या सणाच्या दिवशींच मुलें लुटुपुटूची लढाई करितात. कारण, जपानीं युद्ध देवता हकीमा हिचा हा पवित्र दिवस आहे. मुलें दोन टोळ्या करितात व हातांत बांबूच्या तलवारी व डोक्यावर मडकीं घेऊन लढाई करितात. जी टोळी प्रतिस्पर्ध्यांचीं जास्ती मडकीं फोडील ती विजयी ठरते.

मुलींच्या सणाला बाहुल्यांचा सण म्हणतात. हा मार्च महिन्याच्या ३ ऱ्या तारखेस येतो व तो तीन दिवस असतो. या दिवशींही दुकानें बाहुल्या, चूलबोळकीं वगैरेंनीं भरलेलीं दिसतात. ज्या घरीं त्या वर्षी मुलगी जन्मली असेल तेथें या सणाचें विशेष महत्त्व. या सणाच्या दिवशीं मुली सुंदर पोशाक करितात, व घरांत जपून ठेविलेल्या बाहुल्या बाहेर काढून त्यांना व्यवस्थितपणें मांडून ठेवितात. या बाहुल्या फार जुन्या असतात. कांहींतर शेंकडों वर्षांपूर्वींच्या असतात. त्या त्या वेळचे राजे, राण्या, सरदार, सेनापति, शिपाई वगैरेंचीं हीं लाकडाचीं किंवा मातीचीं हुबेहूब चित्रें असतात. चित्रांचे कपडे, हत्यारें हीं अगदीं त्या वेळचींच. इतकेंच नव्हे तर त्यावेळीं प्रचलित असलेलीं भांडीकुंडी, घरांतील सामान वगैरे वस्तूंचेही लाकडी नमुने असतात. हीं लाकडी चित्रें घरांत फार जपून ठेवितात, व फक्त बाहुल्यांच्या सणाच्या दिवशीं बाहेर काढतात. मुलींना नेहमीं खेळण्यासाठीं वेगळ्या बाहुल्या असतात. मुली लग्न झाल्यावर आपल्या बाहुल्या सासरीं घेऊन जातात.

सणाच्या दिवशीं मुली एकत्र जमतात व भातकुली खेळतात. राजा-राणीच्या बाहुल्यांना त्या उच्चस्थानीं मांडतात व त्यांना लवून नमस्कार करितात. खाण्यास केलेल्यांतील उत्तम पदार्थ राजाराणींना अर्पण करितात.

## जपानांतील खेडीं, शेती व उद्योगधंदे

जपानचा फक्त एक षष्ठांश भाग शेतीच्या लायक आहे व त्यांतही बराचसा डोंगराळ आहे. परंतु उत्तम प्रकारें शेती करून एवढयाशा भागांतून सर्व देशास पुरेल इतकें पीक जपानी शेतकरी काढतो. शेतें मोठीं नसतात. साधारणपणें एका शेतकऱ्याच्या वांट्याला दोन एकर जमीन येते. जमिनीची टंचाई असल्यानें जपानी शेतकरी शेतांना कुंपण सुद्धां घालीत नाहींत. कांहीं शेतें खोऱ्यांत किंवा मैदानांत असतात. परंतु जपानची बरीचशी भात-शेती डोंगरावर होते. तेथें कोंकणांतल्याप्रमाणें डोंगराचे लहान लहान भाग खणून सपाट करून एकावर एक अशीं पायरी-पायरीनें शेतें तयार करितात. हें काम फार मेहनतीचें आहे. पाटाच्या पाण्याचें तत्त्व या लोकांना चांगलें कळलें आहे. ते डोंगरावरून वाहणाऱ्या अनेक नद्यांचे पाट पायरीपायरीनें सर्व शेतांतून नेतात.

जपानचें मुख्य पीक भाताचें. भात काढल्यावर नंतर सातू व गहूं यांची लागवड होते. कागद ज्या झाडांपासून करितात त्या झाडांचीही लागवड जपानांत पुष्कळ करितात. हे लोक कागदाचे अनेक उपयोग करितात. त्यांच्या घरांच्या भिंती कागदाच्या, छत्र्या, प्याले, कंदील, हातरुमाल कागदाचे, जोडे व टोप्यासुद्धां कागदाच्या. जपानी कागदाचे निरनिराळे साठ प्रकार आहेत. कांहीं कागद इतके भक्कम असतात कीं, कितीही जोरानें त्यांना ओढलें तरी ते फाटावयाचे नाहींत. कागदाप्रमाणें बांबूचेही जपानी लोक चिनी लोकांप्रमाणें अनेक उपयोग करितात. घराच्या चौकटी, छप्पर, ताटें, पेट्या, टेबलें, खुर्च्या, चिरुटाची नळी, पंखे वगैरे बांबूच्या अनेक वस्तु बनवितात. जपानी लोक कोवळे बांबू हौसेनें खातात.

जपानी शेतकऱ्यांच्या अंगावर फारसे कपडे नसतात. गवताची घमेलेवजा टोपी व कमरेला बेतापुरता कपडा. बाया निळ्या रंगाचे सुती लेहंगे नेसतात व डोक्यावर टोपी घालतात. मुलें बहुधा नागवींच राहातात. खेडेगांवांत अद्यापि जुन्या चालीरिती आहेत. विधवा बायांचे डोक्यावरचे केस काढतात. पुरुषही डोकीचे केस काढून लहानशी शेंडी ठेवितात व ती नारदाच्या शेंडीसारखी उभी करितात. तरुण स्त्रिया आपल्याकडील खेड्यांतील स्त्रियांप्रमाणें दाशिना लावून दांत काळे करितात. अर्थात् या चाली आतां जात चालल्या आहेत.

चीनप्रमाणें जपानांतही चहाची लागवड सर्वत्र होते. 'रत्नखचित दंवबिंदु' या नांवानें ओळखली जाणारी चहाची एक जात आहे. हा चहा १५।२० रुपयांना एक पौंड इतका महाग विकतात. चहाच्या झाडाचीं पानें वर्षांतून दोनतीन वेळां खुडतात. हें काम जपानांत मुलीच करितात. जपानांतही रेशमाच्या किड्यांची पैदास मोठ्या प्रमाणांत करितात. जपान रेशमी कापड व रेशीम यांची निर्यात फार मोठ्या प्रमाणावर करतें.

जपान शेतीपेक्षां कारखाने, गिरण्या, उद्योग धंदे यांत फार पुढें गेला आहे. जपानची जुनी राजधानी जी क्यायटो व ओसाका शहर यांच्या दरम्यानचा प्रदेश निरनिराळ्या कारखान्यांनीं गजबजून गेलेला आहे. क्यायटोची रेशमी कापड तयार करण्याविषयीं फार प्रसिद्धि आहे. पूर्वीं ओबडधोबड मागांवर अत्युकृष्ट वस्त्रें तयार करीत. हल्लीं क्यायटो एथें विजेच्या शक्तीच्या जोरावर चालणाऱ्या गिरण्यांत भराभर रेशमी वस्त्रें निघतात. ओसाका व कोबेमध्यें सुताच्या व कापडाच्या अनेक गिरण्या आहेत व या गिरण्यांत हजारों मजूर काम करीत असतात. यांत अल्पवयी मुलें व स्त्रियांचा भरणा पुष्कळ असतो. पुरुषांपेक्षां स्त्रीमजुरांची संख्या जपानांत

दुप्पट आहे असें म्हणतात. सुधारलेल्या सर्व देशांत लहान मुलांना गिरण्यांत कामावर ठेवण्याची कायद्यानें बंदी केलेली असते. कारण, त्यांची प्रकृति बिघडते व शिक्षणाचेंही नुकसान होतें. त्याचप्रमाणें अवघड व धोक्याच्या कामावर स्त्रियांना नेमूं नये असाही निर्बंध आहे. जपानांत अद्यापि या बाबतींत विशेष सुधारणा झाली नाहीं. स्त्रिया व मुलें यांना कमी मजुरी द्यावी लागते म्हणून त्यांना कामावर ठेवण्यांत जपानचा फार फायदा होतो. त्याचप्रमाणें जपानांत कामाचे तास जास्ती व मजुरीचे दर कमी असतात. या सर्व गोष्टींचा परिणाम असा झाला आहे कीं, जपानला आपल्या कारखान्यांत इतर देशांच्या मानानें थोड्या खर्चांत जास्त माल तयार करतां येतो. तो इतका कीं, परदेशांत आपला माल आपल्याच आगबोटींतून सवलतीनें पोहोचवून तेथील जकात भरूनसुद्धां इतर देशांच्या मालापेक्षां जपानला आपला माल स्वस्त विकतां येतो व त्यावर पुष्कळ नफा मिळवितां येतो. यामुळें अलीकडे इतर राष्ट्रांची जपानच्या पाठीमागें, मुलांची मजुरीची पद्धत बंद करा, दर वाढवा, कामाचे तास कमी करा अशी कुरकुर चालली आहे, व जपानलाही त्यांचें म्हणणें ऐकणें भाग पडत आहे.

कोबे, नागासाकी व वाकामात्सू या शहरीं लोखंडाचे व पोलादाचे मोठमोठे कारखाने आहेत, व यांत महासागरांत चालणाऱ्या प्रचंड पोलादी आगबोटी व लष्करी जहाजें तयार होतात. सध्यां इंग्लंड व अमेरिका या देशांच्या खालोखाल जपानचेंच आरमार मोठें आहे व त्यामुळें जगाला जपानचा धाक वाटतो. या आरमारांतील जहाजें जपानी कारखान्यांतच तयार झालीं आहेत.

याखेरीज अनेक प्रकारचे कारखाने जपानांत आहेत. तथापि अद्यापि हिंदुस्थानप्रमाणें जपानचे घरगुती बैठे धंदे कारखान्यांमुळें बुडाले नाहींत. ही एक ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

जपानांत अनेक खेडेगांवांत चिनी मातीची भांडीं तयार करण्याचा घरगुती धंदा जोमांत चालू आहे. त्याचप्रमाणें आपण बाजारांत मुलांसाठीं ज्या जपानी बाहुल्या व खेळणीं विकत घेतों, तीं जपानांतील बाया व विशेषतः मुली आपापल्या घरीं बसून तयार करीत असतात. या शिवाय छत्र्या, पंखे, चित्रविचित्र कागदी कंदील वगैरे वस्तु जपानी घरांतच पैदा होतात. जपानांत घरोघर रेशमी किडे पाळतात व रेशीम काढतात. सारांश घरगुती धंदे व कारखान्यांतील धंदे या दोन्हींचीही जपानांत भरभराट असून लोक रात्रंदिवस उद्योगांत चूर असतात. यांतच जपानच्या सुस्थितीचें बीज आहे.

चला, आतां जपान सोडण्याची वेळ झाली. येथें आपले दिवस मोठ्या आनंदांत गेले. जपानी लोकांची आनंदी शांतवृत्ति, उद्योगशीलता, नम्रता आणि शिष्टाचार याचें आपल्याला कौतुक वाटलें. त्यांची राजभक्ति व देशभक्ति पाहून आपल्याला आनंद वाटला व आपला मागासलेला देश जगांत पुढें आणण्यासाठीं त्यांनीं चिकाटीनें केलेला उद्योग, त्यांच्या सरदार शिलेदारांचा अपूर्व स्वार्थत्याग पाहून शरमेनें आपली मान खालीं गेली. जपानपासून आपल्याला पुष्कळ शिकावयाचें आहे. चला, खालीं गुडघे टेका, हात जमिनीला लावा, मान खालीं लववा आणि जपानला बोला, "सीयोनारा" (नमस्कार).

---

## प्रकरण ११ वें

## डोंगराळ प्रदेशांतील स्वीस लोक.

मागील कांहीं प्रकरणांत आपण उष्णकटिबंधांतील व त्याच्या जवळपास असणाऱ्या देशांतील लोकांची माहिती मिळविली. आतां आपण सुधारणेच्या व संपन्नतेच्या बाबतींत जगांत पुढें गेलेल्या

युरोप खंडांतील कांहीं ठळक देशांची सफर करूं. युरोप खंड शीत-कटिबंधांत असल्यामुळें तेथें हवा नेहमीं थंड असते व त्यामुळें तेथील माणसांना पुष्कळ काम करण्यास हौस वाटते व तें करतांही येतें. अगदीं उत्तरेकडचा थोडासा भाग सोडून दिला, तर एस्किमोंच्या देशासारखी कांहीं काम करूं न देणारी अशी भयंकर थंडी युरोप खंडांत नाहीं. आतां केवळ हवेमुळें युरोपियन लोक उद्योगी व हुशार बनले आहेत असें मात्र कोणी समजूं नये. हवा हें एक कारण आहे व तें महत्त्वाचें कारण आहे, एवढें मात्र लक्षांत ठेवावें. नाहींतर आपल्या हिंदुस्थान देशाची हवा उष्ण, तेव्हां आपल्याला निरुद्योगी व आळशी राहाण्याचा हक्क आहे, अशी कांहीं वाचक मनाची समजूत करून घेतील. असो.

थंड हवेनें युरोपियन लोकांना उद्योगी बनविलें असलें तरी उलट आपल्या बुद्धिचातुर्यानें त्यांनीं आपल्या देशांचें मूळ स्वरूप बदलून आपल्या सुखसोईप्रमाणें त्यांना वेगळें स्वरूप प्राप्त करून दिलें आहे, व याप्रमाणें निसर्गावर—भूगोलावर—जय मिळविला आहे. जेथें त्यांना शेती करतां येत होती तेथें त्यांनीं ती उत्तम प्रकारें केली आहे. जेथें निसर्ग शेती करूं देईना तेथें त्यांनीं गुरेंढोरें राखण्याचे व दूधदुभत्याचे धंदे किंवा मोठमोठ्या गिरण्या व कारखाने काढून अनेक उद्योग चालविले आहेत.

प्रथम आपण युरोप खंडांतील स्वित्झर्लंड नांवाच्या एका लहानशा देशांत जाऊं. हा देश इतका लहान आहे कीं, आपल्या मुंबई इलाख्याच्या तीन जिल्ह्यांइतका याचा विस्तार आहे. या देशाची सृष्टिसौंदर्याविषयीं फार ख्याति आहे. या देशभर आल्प्स् नांवाच्या एका उंच पर्वताच्या बर्फाच्छादित रांगा इतस्ततः पसरल्या आहेत. यामुळें स्वित्झर्लंड देश म्हणजे अनेक उंच पर्वतशृंगें, दऱ्या व खोरीं

यांचा एक समूहच आहे असें म्हटलें तरी चालेल. आल्प्स् पर्वताचीं कांहीं शिखरें फार उंच असून बर्फानें नेहमीं आच्छादिलेलीं असतात व सूर्यप्रकाशांत तीं फार सुंदर दिसतात. तसेंच या पर्वताच्या पाठीवर लहानमोठीं अनेक कुरणें असून त्यांवर नानाप्रकारच्या रंगांचीं सहस्रावधि फुलें फुललेलीं असतात. हें दृश्यही फार रमणीय असतें. शिवाय या डोंगराळ मुलखांत लहानमोठीं हवीं तितकीं सरोवरें असून त्यांमधून सहल करण्यांत मोठी मौज वाटते.

स्वित्झर्लंडच्या या अवर्णनीय सृष्टिसौंदर्यामुळें तें युरोप व अमेरिका या दोन्ही खंडांतील लोकांचें उन्हाळ्यांत करमणूक व चैन करण्याचें आवडीचें ठिकाण झालें आहे. दोन्ही खंडांतील हजारों लोक या लहानग्या देशांतील सृष्टिसौंदर्य पाहाण्याकरितां, आल्प्स् पर्वताच्या उंच उंच शिखरांवर गमतीनें चढून जाण्याकरितां, सरोवरांवर सहली करण्याकरितां व बर्फावरील खेळ खेळण्याकरितां प्रत्येक उन्हाळ्यांत व अलीकडे हिवाळ्यांतसुद्धां तेथें जातात व चैनीकरितां पाण्यासारखा पैसा खर्च करितात.

स्वित्झर्लंडच्या लोकांना स्वीस म्हणतात. दरवर्षीं आपल्या देशांत येणाऱ्या शोकी व श्रीमंत पाहुण्यांची बरदास्त ठेवावयाची हा स्वीस लोकांचा एक मुख्य धंदा झाला आहे. त्यांनीं आल्प्स् पर्वतावर या पाहुण्यांसाठीं हवा खाण्याच्या व चैन करण्याच्या सर्व ठिकाणीं मोठमोठीं हॉटेलें बांधलीं आहेत, व त्यांत ऐषारामाच्या सर्व सोई करून ठेविल्या आहेत. 'इंतरलाकन' नांवाचें एक सुंदर मोठें गांव आहे त्यांत तर फक्त हॉटेलें व दुकानेंच आहेत. खासगी राहण्याचीं घरें नाहींत म्हटलें तरी चालेल. स्वित्झर्लंडांतील या अशा शेकडों हॉटेलांत सहस्रावधि हौशी माणसें हवा खाण्यासाठीं येऊन उतरतात व तेथें पाण्यासारखा पैसा खर्च करितात. यांत अमेरिकन पाहुण्यांचा भरणा फार. या शिवाय लहान लहान गांवांत पुष्कळच लोक

खाजगी कुटुंबांत पैसे देऊन शांतपणें राहण्यासाठीं येतात. थेट पर्वतशिखरांवरसुद्धां हीं हॉटेलें आहेत. या हॉटेलांत नाटकगृहें, सिनेमा, नर्तनगृहें, खेळण्याचीं पटांगणें अशा सर्व सोयी असतात. प्रवाशांना आल्प्सच्या उंच व अवघड शिखरांवर चढून जाण्याचा त्रास पडूं नये म्हणून ठिकठिकाणीं थेट वरपर्यंत आगगाड्या नेल्या आहेत. गोगलगाय भिंतीवर चढते तशा पर्वतावर चढणाऱ्या या आगगाड्यांना तीन रूळ असतात, व डब्यांना दोन्ही बाजूंस दोन व मध्यें एक अशा चाकांच्या तीन रांगा असतात. मधलीं चाकें व मधला रूळ यांना करवतीप्रमाणें दाते असतात. गाडी चालूं लागली म्हणजे चाकांचे दाते रुळाच्या दात्यांच्या कैचींत सांपडतात व यामुळें गाडी खालीं ढासळून पडत नाहीं.

स्वीस लोकांनीं आगगाड्याप्रमाणें पायरस्ते तयार करण्यांतही आपली हुशारी दाखविली आहे. डोंगराळ प्रदेशांतील पायरस्त्यांना चढउतार मनस्वी असावयाचे. परंतु स्वित्झर्लंडच्या रस्त्यांची चढण क्रमाक्रमानें साधली आहे. ती इतकी कीं ओझ्यानें भरलेल्या गाड्या घेऊन घोडे खुशाल या रस्त्यांनीं धावत जातात. यावरून स्वीस इंजिनियर किती चतुर आहेत याची कल्पना करतां येईल.

आल्प्स् पर्वत पोखरून पलीकडे फ्रान्स व इटली देशांत जाण्यासाठीं स्वीस इंजीनियरांनीं जे लांब लांब बोगदे तयार केले आहेत त्यांचीं वर्णनें वाचून तर या लहानशा देशांतील लोकांचें कौतुक करावेंसें वाटतें. सिम्प्लॉन नांवाचा बोगदा १२॥ मैल लांबीचा असून तो खोदण्यास ७ वर्षें लागलीं. सेंट गोथार्ड नांवाच्या दुसऱ्या एका बोगद्याची लांबी १० मैलांची आहे.

## आल्पस्च्या शिखरांवरील आरोहण

आल्प्स्च्या शिखरांवर चढून जाणें हा स्वित्झर्लंडांत येणाऱ्या

प्रवाशांचा एक मुख्य करमणुकीचा प्रकार आहे. दर वर्षीं मांट ब्लांक, मेटर हॉर्न, युंगफ्राऊ इत्यादि नामांकित गिरिशिखरांवर चढून जाणाऱ्या प्रवाशांची गर्दी असते. हीं शिखरें पुष्कळच उंच आहेत. युंगफ्राऊ (प्रमदा) १३८९० फूट उंच आहे तर मॉंट ब्लॉंक हें शिखर सर्वांत उंच आहे. याची उंची १६०२० फूट म्हणजे आपल्या महाबळेश्वराच्या तिपटीहून अधिक आहे. या शिखरांची चढणही फार अवघड व धोक्याची असते. यांच्यावर बारा महिने तेरा काळ बर्फ असतें. चढणारे अनेकवेळां मृत्युमुखीं पडतात. तथापि युरोपियन लोक साहसप्रिय असल्यानें कठीण धोक्याची गोष्ट करण्यांत त्यांना नेहमीं हौस वाटते. आपल्या हिमालयाचें अत्युच्च शिखर गौरीशंकर चढून जाण्याची त्यांची कोण धडपड! कांहीं साहसी इंग्रजांच्या टोळ्या तीनदां गौरीशंकरावर हल्ला करण्यास आल्या. एकदां त्यांच्यापैकीं दोघेजण तर गौरीशंकराच्या अगदीं जवळ येऊन पोचले असतां अपघातानें मेले. पण ते परत येतील व गौरीशंकर चढतील. अशा साहसी लोकांनाच जगांत जय मिळत असतो. असो.

साहसी युरोपियनांप्रमाणें आपणही एकादें शिखर चढून जाऊं या. आल्प्स् चढावयाला आधीं जामानिम्याची तयारी केली पाहिजे. अवघड अरुंद वाटेनें व निसरड्या बर्फातून आपल्याला मार्ग काढावा लागेल. आपले नेहमींचे कपडे, पायांतले बूट व हातांतील काठी एथें कामाला यावयाची नाहीं. आधीं डोक्याइतकी उंच व लोखंडी टोकाची शेंबी असलेली काठी मिळवा. निळया रंगाचा चष्माही घ्या. कारण उन्हांत तळपणाऱ्या बर्फाकडे पाहिले तर डोळ्यांना इजा होण्याची भीति असते. नंतर प्रत्येकाजवळ लहानशी कुऱ्हाड पाहिजे. वाटेंत आपल्याला भिंतीसारखे उभेच्याउभे बर्फाचे टेकाड आढळतील. कुऱ्हाडीनें बर्फ तोडून या टेकाडांना पायऱ्या करून

वर चढूं, तेव्हां आपल्याला पुढें जावयाला मिळेल. पायांत गरम व जाडी मोजे व त्यांवर उंच बूट पाहिजेत. बुटांना भले जाड अणकुचीदार खिळे मारले पाहिजेत. नाहींतर बर्फावरून पाय घसरावयाचा. होय, आणखी पाठीवर फराळाच्या सामानाची पडशी पाहिजेच. कारण, पर्वतावर आपले दीडदोन दिवस जातील. एका दिवसांत १०।१५ हजार फूट चढणें व उतरणें शक्य नाहीं. दुसरी एक महत्त्वाची वस्तु म्हणजे एक लांबलचक दोरखंड. याचा आणीबाणीच्या वेळीं आपणांस फार उपयोग होईल.

सर्व तयारी झाली. वाटाडयांखेरीज कसें भागणार ? आल्प्स पर्वतांतील बारीक सारीक वाटा त्यांवर जन्म घालविलेल्या वाटाड्यांखेरीज इतरांना सापडणें फार दुर्घट. स्वित्झर्लंडांत पुष्कळ लोक प्रवाशांना पर्वतशिखरांवर नेऊन पोंचविण्याचा व परत सुरक्षित खालीं उतरविण्याचा धंदा करितात. हे वाटाडे भित्र्या लटपट कापणाऱ्या प्रवाशाला सुद्धां स्वतःच्या बळानें शिखरांपर्यंत घेऊन जाऊं शकतात. वादळ आलें, धुकें दाट पसरलें, वरचा रस्ता दिसेनासा झाला, तरी हे वाटाडे धीर न सोडतां शांतपणें पुढची वाट शोधून काढतात. दोन प्रवाशांना तीन वाटाडे लागतात.

चला, झाली तयारी. लागा चढूं. आरंभींची चढण इतकी अवघड नाहीं. बर्फ तुडवीत तुडवीत वरवर चला. तो पाहा पुढचा वाटाडया बोटानें काय दाखवीत आहे. ते बारीक काळे ठिपके कसले दिसत आहेत ? अहो, त्या झोपडया आहेत. आज रात्रीं आपला मुक्काम या झोपडयांत होणार. या झोपडया मुद्दाम प्रवाशांना थांबण्यासाठीं इतक्या उंचावर बांधल्या आहेत. आलों पाहा आपण झोपडयांपाशीं. शिरा आंत. भिऊं नका. या आपल्यासाठींच आहेत. वाटाडयांनीं चूल पेटवून फराळाचें मांडलें व गरम कॉफी तयार केली

बघा. फराळ करून रात्रीचे कांहीं तास आपण झोपडींत काढूं. सकाळ-पर्यंत झोपून चालावयाचें नाहीं. रात्रीं दोन वाजतां उठून परत चढावयाला लागलें पाहिजे. वाटाडे उठवतील आपल्याला. निजा तर.

दोन वाजले. उठा. अरे वा! वाटाड्यांनीं फराळाचें तयार केलें व गरम गरम कॉफीही केली. आज आपल्याला खूप चढावयाचें आहे. चांगला फराळ करा. चला बाहेर. अहाहा! काय हा गंभीर देखावा! आकाशांत किती या चांदण्या! अरे बापरे! काय ही थंडी! गरम ओव्हरकोट नसता तर एथेंच राम म्हणण्याची पाळी येती. आतां बरोबर आणलेल्या दोराचा उपयोग होणार. ते पाहा वाटाडे सर्वांच्या पाठीला दोर बांधीत आहेत. दोन माणसांमध्यें बारा फूट अंतर ठेवलें आहे. तो पहिला वाटाड्या सर्वांच्या पुढें झाला. त्याच्या हुशारीवर आपणा सर्वांचें प्राण अवलंबून आहेत. तो जरा का चुकला कीं सारेंच संपलें! हं, जपून चला. वाट किती अरुंद आहे! या बाजूला हजारों फूट खोल दरा, या बाजूला उंचच्या उंच टेकाड. दोन तीन फुटांची वाट. पाय घसरला तर—पण चला पुढें.

अहाहा! उषःकाल झाला. सभोवतालचीं असंख्य गिरिशिखरें कोवळ्या प्रकाशांत किती सुंदर–किती गंभीर–दिसत आहेत! पण गंमत पाहात बसण्यास आपल्याला वेळ नाहीं. अझून पुष्कळ चढावयाचें आहे. अरे बापरे! हें काय विघ्न! दोन्ही बाजूंना हजारों फूट खोल दऱ्या अन् मध्यें लहान पायवाट. आतां एथें डोकें फिरलें तर—पण चला पुढें. हा बर्फाचा उभा सुळका पाहा. एथेंच वाट संपली. आतां पुढें कसें जावयाचें? तो वाटाड्या काय करीत आहे पाहा. तो कुऱ्हाडीनें सुळक्याला पायऱ्या करूं लागला. त्यानें एक भगदाड पाडलें. दुसरें पाडलें. चला जपून पुढें. दोर हातांत घट्ट



आल्प्सचें शिखर चढून जाणें.

धरा. पुढच्याचा तोल गेला व तो खालीं आला तर तो व आपण सारेजण एकदमच दरींत फेकले जाऊं. शाबास! सुळक्याच्या वर तर आलों.

ही हिमनदी बरें का? अशा एक हजार हिमनद्या आल्प्स पर्वतांत आहेत. कांहीं कांहींचा तर १०।१५ मैल लांब विस्तार आहे. हिमनदी म्हणजे बर्फाची नदी. परंतु पाण्याच्या नदीप्रमाणें बर्फाची नदी वाहात नसते. पर्वताच्या उतरणीवर बर्फ पडून पडून त्याचे मोठमोठे डोंगर तयार होतात व त्यांच्यावरही बर्फ पडतच असतें. स्वतःच्या वाढत्या वजनामुळें या बर्फाच्या डोंगरांना गति प्राप्त होते व ते हळूहळू पर्वतावरून खालीं सरकूं लागतात. हीच हिमनदी व हें फार सावकाश सरकणें हीच तिच्या प्रवाहाची गति. या हिमनद्या चोवीस तासांतून फारतर एक दोन फूट पुढें सरकतात. हिमनद्यांचा खालचा भाग घर्षणानें वितळून त्याचें पाणी होत असतें व तें हिमनद्यांच्या नाकाडां-



हिमनदी.

तून खालीं खळखळ वाहात जातें. हिमनदी खालीं सरकत जात असतां अंगाखालील प्रदेशाच्या उंचसखल पणामुळें ती दुभंग होऊन तिला मोठमोठ्या भेगा पडतात. या भेगा शेंकडों फूट खोल असतात. हिमनदीवर बर्फ पडत असल्यानें कधीं कधीं या भेगांवर बर्फाचा थर जमून त्या दिसेनाशा होतात, व हिमनदीवरून जातांना जर चुकून पाय भेगेंत गेला तर शेंकडों फूट खोल जिवंत समाधि मिळते ! याच-साठीं माहीतगार वाटाडे लागतात.

असो. आतां या समोरच्या हिमनदीवरून जपून चला. कांहीं ठिकाणीं बर्फ दगडासारखें कठीण व निसरडें आहे, तर कांहीं ठिकाणीं त्याचे वाळूसारखे ढिगारे आहेत. ही पाहा हिमनदीची भयंकर भेग ! खालीं पाहवत नाहीं इतकी खोल. हिच्यावर हा बर्फाचाच पूल आहे. तो वाटाड्या पुढें झाला. तो हळूच पुलावरून चालला. याच वेळीं आपण बांधलेल्या दोरखंडाचा खरा उपयोग

असतो. जर चुकून एकादा प्रवाशी भेगेंत पडला तर तो बांधलेल्या दोरामुळें तसाच लोंबकळत राहातो, व त्याचे मित्र आणि वाटाडे त्याला वर ओढून काढतात.

तो वाटाड्या असा सचिंत कां झाला ? वाट तर आतां चांगली आहे. काय म्हणतो तो ? वादळ येणार ? आलेंच बघा तें. धुकें पसरलें, अंधार झाला, थंड वारे जोरानें वाहूं लागले. वाऱ्याबरोबर बर्फाचे बारीक कण धुळीसारखे जिकडे तिकडे वातावरणांत पसरले. आपल्या भोवतीं विजा चमकूं लागल्या; पण तो वाटाड्या कांहीं थांबला नाहीं. अशा अंधारांत चालला पुढें. कमाल आहे त्याची. वादळ थांबलें. सूर्य दिसूं लागला. चला, थोडें फराळाचें खाऊं म्हणजे हुशारी येईल. हें काय, डोकें फिरूं लागलें. अन्न खाववत नाहीं. तुमचें बोलणेंच मला ऐकूं येत नाहीं. माझेंही बोलणें तुम्हांला ऐकूं येत नसेल ? हें काय झालें बरें ? अहो समजलें, आपण आतां १०।१२ हजार फूट उंचीवर आहों. येथें हवा फार विरळ आहे. यामुळें श्वास घेण्यास त्रास पडतो व बोलणेंही ऐकूं येत नाहीं. चला, थोडी मजल राहिली. अरे वा ! तो पुढचा वाटाड्या आनंदानें नाचूं गाऊं लागला. काय म्हणतां ? गांठलें शिखर ? भले शाबास ! काढा हातांतील निशाण. फडकवा शिखरावर. ते पाहा खोल खोल खालीं पलीकडे जमिनीवर हॉटेलांतील खिडकींतून दुर्बिणींतून आपले मित्र शिखराकडे टक लावून बसले असतील. ओहो ! त्यांनीं बंदुकीचे बार सोडले. त्यांना आपलें निशाण दिसलें खास. हं, आतां अर्धा तास विश्रांति घ्या. अंधार पडायला दोन अडीच तास आहेत. पण आतां उतरण आहे. हां हां म्हणतां आपण झोपडी गांठू, तेथें फराळावर ताव मारूं, रात्रभर सपाटून झोप काढूं व सकाळीं बाकीची उतरण उतरूं.

## बर्फावरचे खेळ.

हौशी प्रवाशी स्वित्झर्लंडांत बर्फावर अनेक खेळ खेळतात. मुख्य खेळ स्केटिंगचा. ते लोक बुटांखालीं स्केट नांवाच्या लोखंडी खडावा बांधून बर्फावर उभे राहातात व निसरडया बर्फावरून घसरत जातात. यांत तोल सांभाळण्यांतच कौशल्य असतें. मुलेंबाळेंसुद्धां बर्फावरून मोठ्या वेगानें घसरत जातात, इतकेंच नव्हे तर घसरतां घसरतां बर्फावर आकृति काढतात. कोणी इंग्रजी आठाच्या आकड्याप्रमाणें (8) फिरतात, कोणी गोल फिरतात, कोणी हातांत हात घालून भर-धाव घसरतात. स्वित्झर्लंडांतील सर्व मोठ्या हॉटेलांना लागून स्केटिं-गसाठीं बर्फाचें मैदान ( याला इंग्रजींत रिंग म्हणतात ) राखून ठेविलेलें असतें.

प्रवाशांचा विशेष आवडीचा खेळ म्हणजे टोबोगनचा. कारण स्केटिंग हिवाळ्यांत युरोपांत कोठेंही करितां येते. टोबोगन ही एक लाकडाची बिनचाकाची लहानशी घसरती गाडी असते. एस्किमों-च्या गाडीसारखाच तिचा आकार असतो. या गाडींत एक किंवा एकाहून अधिक माणसें बसतात. डोंगराच्या उतरणीवर बर्फ पडून ती पुरी निसरडी झाली म्हणजे वरून टोबोगन सुटते, व मोठ्या वेगानें टेकडीच्या तळाशीं येते. उतरण बेताची असली म्हणजे टोबो-गन हळूहळू खालीं घसरत येते, व त्यांत धोकाही नसतो. पण टोबोगनिंगचे जे खरे दर्दी आहेत, त्यांना असें हळूहळू घसरत खालीं येण्यांत मौज वाटत नाहीं. ते उंच डोंगरावर टोबोगन घेऊन जातात व तेथें तिच्यांत बसून तिला खालीं जोरानें सोडतात. उत-रण उभी असते व तिला मधून मधून वळणेंही असतात. हौशी तरुण वाऱ्याच्या वेगानें खालीं जाणारी टोबोगन सुकाणूच्या साहा-य्यानें वळणावळणानें बिनचूक वळवून फार थोड्या वेळांत खालीं आणतात. सेंट मॉरिट्झजवळ क्रेस्टा नांवाची टोबोगनिंगची प्रसिद्ध

उतरण एक हजार यार्डांची आहे. या उतरणीवर दर वर्षी हिवाळ्यांत टोबोगनिंगच्या शर्यती होतात. या वेळीं या खेळांतील उत्कृष्ट करामत दृष्टीस पडते. ही एक हजार यार्डांची उतरण अगदीं उभी आहे, व ठिकठिकाणीं तिला अगदीं नागमोडी वळणें आहेत. तरी खेळाडू एका मिनिटाच्या आंत ही भयंकर उतरण सुरक्षित उतरून खालीं येतात. शर्यतीच्या वेळीं वाऱ्याला आपल्या शरिराचा विरोध होऊन त्या मानानें गति कमी होऊं नये म्हणून खेळाडू टोबोगनमध्यें निजतात व पायानें सुकाणूं चालवून वाकड्या तिकड्या रस्त्यानें वळणावळणानें बरोबर खालीं आणितात. परंतु नेहमींच्या खेळांत कोणी टोबोगनला इतका भयंकर वेगही देत नाहींत, किंवा अशा भयंकर उतरणीवरूनही ती आणीत नाहींत. टोबोगन खेळणारे चांगल्या मोठ्या रस्त्यानें चढून डोंगरावर जातात व तेथून टोबोगन सोडतात. सर्व रस्त्यांत गुडघाभर बर्फाचा थर साचलेला असतो. अशा या रस्त्यावरून अनेक मैल टोबोगन घसरत घसरत सावकाश खालीं येते. कधीं उतरण जास्त असली तर टोबोगनचा वेग वाढतो व उतरण फार थोडी असल्यास ती हळूहळू जाते. टोबोगन खालीं जातांना कधीं डोंगरावरील सुंदर मोकळी हवा अंगाला स्पर्श करीत असते तर कधीं रस्त्याच्या दोन्ही बाजूंस असलेल्या देवदारांच्या रांगेंतून अंधुक प्रकाशामधून ती जात असते.

हिवाळ्यांतील तिसरा खेळ म्हणजे शीइंगचा (Ski-ing). शी (Ski) या लाकडाच्या ७ पासून ९ फूट लांबीच्या तळपायाइतक्या रुंदीच्या गुळगुळीत लाकडी पट्ट्या असतात. या पट्ट्या स्केटप्रमाणेंच बुटांखालीं बांधतात, व मग माणसें बर्फावरून घसरतात. चांगला तरबेज मनुष्य पायांना शी बांधून तासीं ४० मैल वेगानें बर्फावरून चालतो. ही दर्दी मंडळी घसरतांना पर्वताच्या कड्यावरून दहा दहा बारा बारा फूट खालीं उडी मारून पुढें वेगानें जाते. अलीकडे

स्वित्झर्लंडांत शी बांधून बर्फावरून चालणें सार्वत्रिक होत चाललें आहे. तेथील शाळेंत जाणारीं लहान मुलें सुद्धां पायांना शी बांधून रोज चार पांच मैल बर्फावरून चालून शाळेंत जातात.

## शेती व शेतकरी

स्वित्झर्लंड डोंगराळ असल्यानें जितकें सुंदर झालें आहे, तितकेंच शेतीच्या बाबतींत डोंगराळपणामुळें तें कमी दर्जाचें झालें आहे. जिकडे पाहाल तिकडे डोंगर, हिमनद्या, सरोवरें, दऱ्या व लहान लहान खोरीं. तेथें सपाट जमीन फारशी आढळणार नाहीं. यामुळें लागवडीच्या लायकीची जमीन तेथें फार थोडी आहे. स्वीस लोकांना त्यांच्या लहान देशांतील फक्त एक नवमांश जमीन लागवडतां आली. या लागवडीला असलेल्या जमिनीमध्यें सुद्धां धान्याची पैदास होईल अशी जमीन फार थोडी आहे. यामुळें त्यांना निर्वाहाकरितां परदेशांतून धान्य विकत आणावें लागतें.

स्वित्झर्लंड आपल्या कोंकणासारखा डोंगराळ असल्यानें तेथील शेतें कशीं असतील याची कल्पना सहज करतां येण्यासारखी आहे. जमीन सपाट नसल्यानें तेथें मोठमोठीं शेतें नाहींत. कांहीं शेतांचा आकार तर घरांतील खोलीपेक्षांही लहान असतो. कोंकणच्या शेतकऱ्याप्रमाणें स्वीस शेतकऱ्याला निसर्गानें मेहनती बनविलें आहे. डोंगराच्या पाठीवर, बाजूवर, पायथ्याला, जेथें जागा मिळेल तेथें स्वीस शेतकरी आपलें शेत तयार करतो. खोऱ्यांत सर्वांनाच शेतें कोठून मिळणार? खोऱ्यांतील जमीन मर्यादित, उलट लोकसंख्या वाढत चाललेली. यामुळें धाडशी व मेहनती स्वीस शेतकरी उंच डोंगराच्या बाजूवर जातात व तेथें कुदळीनें थोडीबहूत जमीन खणून सपाट करितात. नंतर खालीं जाऊन टोपल्या भरभरून माती घेऊन ती वर नेऊन त्या कातळावर टाकतात व अशा प्रकारें आपलें

शेत थाटतात; पावसाळ्यांत डोंगरावरून पाण्याचे लोटच्या लोट वाहात येतात; त्यांच्याबरोबर इतक्या मेहनतीनें आणलेली माती वाहून जाऊं नये म्हणून डोंगरावरील प्रत्येक शेताला तिकडचे शेतकरी भक्कम असा बांध घालतात.

आल्प्स पर्वताचे त्याच्या उंचीच्या मानानें आपल्याला तीन भाग पाडतां येतात. सर्वांत उंच भाग हा नेहमीं बर्फानें आच्छादिलेला असतो. यावर गवत किंवा धान्य कांहींही उगवत नाहीं. हिवाळ्यांत अर्थात् सर्व पर्वतावरच बर्फ पडतें व त्याचे थरावर थर जमतात. परंतु जसजसा उन्हाळा येऊं लागतो, तसतसें पर्वताच्या ालच्या भागाचें बर्फ वितळूं लागतें. असें करितां करितां पर्वताच्या एका विशिष्ट उंचीच्या खालच्या भागापर्यंत बर्फ वितळून जमीन उघडी पडते. ज्या रेषेपासून वर नेहमीं बर्फाचें राज्य असतें, तिला हिमरेषा असें म्हणतात.

हिमरेषेच्या खालील पर्वताच्या बाजूंवर कुरणें असतात. यांवर



डोंगरपठारावरील कुरण.

आखूड, कोवळें व फार रुचकर असें गवत उगवतें, व तें गुरांना अतिशय आवडतें. या गवतांत इतकें सत्त्व आहे कीं कुरणांत चरणाऱ्या गाई अगदीं घट्ट व मधुर असें दूध देतात. या कुरणांचा उपयोग अर्थात् गुरें चारण्याकडे करितात. या डोंगरपठारावरील कुरणांना आल्प असें म्हणतात, व हीं आल्प नांवाचीं कुरणें पर्वतावर आहेत म्हणून त्या पर्वताचेंही नांव आल्प्स असें पडलें.

कुरणांच्या खालोखाल जो डोंगराचा प्रदेश उरतो त्यावर देवदार वगैरे झाडांचें रान असतें. याचा उपयोग स्वीस शेतकऱ्याला घरें बांधण्यास व जळाऊ लाकडासाठीं होतो. डोंगराच्या पायथ्याशीं असलेल्या खोऱ्यांतील जमिनीमध्यें डोंगरावर स्वीस शेतकरी द्राक्षांचे मळे लावितात व फळफळावळ आणि भाजीपाला यांची लागवड करितात. डोंगरावर खणून माती व बांध घालून जीं शेतें तयार केलेलीं असतात त्यांत ओट, राय व जव हीं धान्यें काढितात. कारण त्यांना कडक थंडी मानवते.

पोटापुरती शेती करितां येत नाहीं म्हणून निराशेनें स्वीस लोक कपाळावर हात मारून अर्धपोटीं स्वस्थ राहिले नाहींत. ते आज सधन व सुखी आहेत. त्यांच्या देशांत भिकारी भीक मागतांना दिसणार नाहींत. याचें कारण त्यांची बुद्धिमत्ता व मेहनत. पर्वतावरील कुरणांत सुगंधी कोवळें गवत पाहून त्यांनीं दूधदुभत्याचा धंदा करण्याचें ठरविलें व त्यांत हे पटाईत झाले. सर्व जगभर 'स्वीस मिल्क' म्हणजे स्वीस लोकांनीं गोठविलेलें दूध याचा खप होत आहे. त्याचप्रमाणें त्यांच्या लोण्यास व चीझ नांवाच्या दुधाच्याच बनविलेल्या एका पदार्थास फार मागण्या असतात.

स्वीस गवळ्यांचीं दोन ठिकाणीं घरें असतात. एक डोंगराच्या पायथ्याशीं खालीं खोऱ्यांत असतें तें नेहमींचें राहाण्याचें व दुसरें पर्वतावर कुरणांत राहाण्यासाठीं चालचलाऊ घर असतें

त्याला ‘ शाले ’ [ Chalet ] असें म्हणतात. आपल्याकडेही खेडेगांवांत नेहमींचें घर व शेतावर हंगामांत राहाण्याकरितां बांधलेलें झोपडें अशीं शेतकऱ्यांचीं दोन घरें असतात. स्वीस गवळी आणि त्यांच्या गाई व शेळ्या हिवाळ्यांत खालीं खोऱ्यांत राहातात. पर्वतावर या वेळीं जाण्याची सोय नसते. शिवाय हिवाळ्यांत पर्वतावर बर्फाखेरीज काय आढळणार ?

हिवाळा संपला, पर्वतावरील बर्फ वितळत जाऊन हिमरेषेपर्यंतचा भाग उघडा पडला म्हणजे गुरेंढोरें घेऊन वर जाण्याचा दिवस उगवतो. हा दिवस स्वीस गवळ्यांना व त्यांच्या गुरांना सणासुदीसारखा वाटतो. गुरें तर आनंदानें नाचत असतात. कारण चार सहा महिने गोठ्यांत चार भिंतींच्या आंत त्यांना दिवस घालवावे लागतात, व उन्हाळ्यांत साठवून ठेविलेल्या घासावर दिवस काढावे लागतात. या दिवशीं लोक भल्या पहाटेस उठतात व छान छान कपडे घालून पर्वतावर जाण्यास तयार होतात. ते गुरांच्या गळ्यांत घुंगरें अडकवितात आणि त्यांच्या शिंगांमध्यें सुंदर फुलें गुंफतात. नंतर एक मोठी घंटा वाजते. त्याबरोबर भराभर गांवांतील गुरें जमतात व घंटा वाजविणाऱ्याच्या मागोमाग चालूं लागतात. एकादी गाय दुखणाईत असल्यामुळें गोठ्यांत बांधून ठेविली असली तर तिला नजरेखालीं ठेवावी लागते. कारण ती केव्हां दावें तोडून पर्वत चढून कुरणावर जाऊन आपल्या इतर बहिणींत सामील होईल याचा नेम नसतो.

सर्वच लोक कांहीं खालचें घरदार सोडून पर्वतावरील कुरणावर उन्हाळाभर राहाण्यासाठीं जात नाहींत. कांहींजण गुरें घेऊन वर जातात तर बाकीचे खोऱ्यांतच राहून भाजीपाला, फळफळावळ, राय, ओट किंवा जव यांची लागवड करितात. खोऱ्यांत मागें राहिलेल्या लोकांचा दुसरा महत्वाचा धंदा म्हणजे पुढील हिवाळ्या-

साठीं गवताची बेगमी करून ठेवावयाची. यासाठीं ते रात्रंदिवस खपत असतात. गवताची काडीही वायां जाऊं देत नाहींत. जेथें म्हणून गवत दिसेल तेथें जाऊन तें कापून आणितात. डोंगराच्या उंच सुळक्यावर जेथें शेळयाही जाण्यास धजणार नाहींत तेथें थोड्याशा गवतासाठीं जाण्यास स्वीस लोक मार्गेपुढें पाहात नाहींत.

कुरणांवरील लोकांचा उद्योग वर उन्हाळाभर चालूच असतो. कुरणें फारच उंचावर असल्यानें त्यांना रोज खालीं वर जा-ये करतां येत नाहीं. ते वरच राहातात.त्यांच्यापाशीं असलेल्या शेंकडों गाईचें दूध ते रोज काढतात व त्याचें लोणी किंवा चीझ बनवितात, व मधून मधून हें लोणी व चीझ खालीं पाठवितात. याशिवाय दूध गोठवून तें डब्यांत भरून ते खालीं पाठवीत असतात.

गाईसाठीं व शेळयांमेंढयांसाठीं वेगवेगळे कुरणाचे भाग राखून ठेविलेले असतात. गाईसाठीं विशेष अवघड नसलेला भाग असतो. अवघड चढणीच्या भागांत शेळयामेंढया चरतात. दिवसभर गुरें मन-सोक्त चरत असतात. एकेका गुराख्याच्या ताब्यांत सहज हजारावर शेळयामेंढया व गाई असतात, व त्याला दिवसभर त्यांच्यामागें भटकावें लागतें. संध्याकाळ झाली म्हणजे तो जोरानें शिंग फुंकतो. तें ऐकून लांबवर गेलेलीं व चरत चरत इतस्ततः पसरलेलीं गुरें तातडीनें धावत येतात. हें शिंग लाकडी असून चांगलें सहासात फूट लांब असतें. शिंग जोरानें फुंकलें म्हणजे त्याचा आवाज जिकडे तिकडे घुमतो व दऱ्यांतून त्याचा पडसाद ऐकूं येतो.

स्वीस शेतकऱ्यांचीं खोऱ्यांतील घरें भलीभक्कम असतात. नाजूक तकलादी घरें बांधून त्यांचें कसें चालणार? मुसळधार पाऊस पडावयाचा, डोंगरावरून बर्फाचे कडे सुटून खालीं आदळत यावयाचे. अशा स्थितींत जपानसारखीं कागदी घरें वाऱ्यावर उडून जातील. स्वीसघराचा तळमजला दगडी असतो. त्याच्या

पुढच्या भागांत धान्याचीं कोठारें व शेतीचीं आउतें असतात. मागच्या भागांत गुरें बांधतात. घराचा वरचा मजला लाकडी असतो. हें लाकूड शेजारच्या डोंगरावरील देवदार झाडांचें असतें. स्वीस लोक वरच्या मजल्यावरच राहातात. या भागांत चांगल्या पांच-सहा खोल्या असतात. मोठ्या खोलींत सर्वजण एकत्र जेवतात व तेथेंच संध्याकाळीं जमून गप्पागोष्टी करितात. एक खोली उत्तम प्रकारें शृंगारलेली असते. इच्यांत रोजचा वापर होत नाहीं. फक्त सणासुदीला किंवा पाहुणेरावळे आले म्हणजे ती वापरतात. घराचें छप्पर निमुळतें असून तेंही देवदाराच्या लाकडाचें असतें. या छपरावर, तें वादळांत उडून जाऊं नये म्हणून मोठमोठे दगड ठेविलेले असतात. घराच्या वरच्या मजल्याच्या भोंवतीं ग्यालरी असते. घरांतील खुर्च्या, टेबलें वगैरे लाकूड सामान भक्कम असतें व तें बहुधा घरींच तयार केलेलें असतें.



कुरणांतील " शाले "

कुरणांतील शाले अगदीं साधीं असतात. या झोपड्या लाकडाचे मोठमोठे ओंडे एकमेकांवर रचून तयार करितात. वरचें छप्पर बारीक

फळ्यांचें असतें, व त्यावर मोठमोठे धोंडे असतात. फळ्यांचेंच खाटलें, त्यावर उबेसाठीं पुष्कळसें वाळलेलें गवत, तें टोचूं नये म्हणून त्यावर एकादें फाटकें ब्ल्यांकेटचें रगटें. एका बाजूला चूल व जळाऊ लाकडांचा ढिगारा. दाराकडच्या बाजूला बर्फ तुडवून ओले झालेले बूट व कपडे वाळविण्यासाठीं खिळे, कांहीं वस्तु ठेवण्यासाठीं टांगलेल्या एकदोन फळया असा संसार असतो. गाईचे गोठेही असेच साधे व लाकडी असतात. गाईंना दावें बांधीत नाहींत. गुरें आंत कोंडून दार लावलें की झालें. गोठ्याच्या एका भिंतीला बाहेरच्या बाजूला फळ्या आडव्या मारून शेणासाठीं जागा करितात. सकाळीं दूध काढलें म्हणजे तें दोनतीन फूट उंचीच्या पाठीवर घेण्यासाठीं मुद्दाम चपट्या केलेल्या पिपांत भरून मोठीं मुलें व माणसें जवळच्या खेड्यांत, शहरांत अगर हॉटेलांत विकण्यास नेतात, किंवा त्यांचें लोणी व चीझ तयार करितात.

स्वीस लोक फारसें मांस खात नाहींत. रविवारीं दुपारीं कधींमधीं मांसाचे पदार्थ केले न केले. त्यांच्या खाण्यांत दूध, लोणी, चीझ, मलई व भाकर हे पदार्थ मुख्यतः येतात. मुलें सकाळीं लोण्याबरोबर भाकर खातात, व कॉफींत अगर दुधांत कालविलेलें मकेचें पीठ पिऊन शाळेंत जातात. दुपारीं भाकर, उकडलेले बटाटे, ताक, आमटी—इच्यांत कधीं मांस असतें, कधीं नसतें—हे पदार्थ असतात. रात्रीं सकाळच्याच न्याहारीसारखा जेवणाचा बेत असतो. याप्रमाणें स्वीस लोकांचें खाणें साधें व सात्त्विक असतें. मनसोक्त दूध–लोणी खाऊन व डोंगराच्या शुद्ध व मोकळ्या हवेंत मेहनत करून ते देखणे व बळकट बनतात.

स्वीस शेतकरी घरींच कापड तयार करितो. घरांतील जेवणाच्या मोठ्या खोलींत कोपऱ्यांत हातमाग असतो. यावर स्वतःच्या मेंढ्यांच्या लोकरीचे कपडे घरांतील बाया व मुलीबाळी विणतात.

घराच्या परसूंत भाज्या केलेल्या असतात. भोवतालीं फळझाडें व द्राक्षांच्या वेली सोडलेल्या असतात. यांपासून त्यांना खाण्यास ताज्या भाज्या व फळें मिळतात. द्राक्षांची अस्सल देशी दारूही घरच्या घरीं बनवितां येते. सारांश, कॉफी, मीठ, गहूं वगैरे कांहीं पदार्थ सोडून दिले तर स्वीस शेतकऱ्याला व गवळयाला घराबाहेर कांहींही विकत घ्यावयास जावें लागत नाहीं.

## इतर उद्योगधंदे

गुरें राखून दूधदुभतें विकणें हाच कांहीं स्वीस लोकांचा धंदा नाहीं. हा धंदाही फक्त उन्हाळाभर पुरतो. हिवाळ्यांत खालीं घरोघर परत आल्यावर स्वीस लोकांना व त्यांच्या स्त्रियांना भरपूर फुरसत असते. या वेळीं चावडीवर बसून आपल्या शेतकऱ्यांप्रमाणें चकाट्या पिटीत ते आळसांत दिवस घालवीत नाहींत. ते अनेक घरगुती धंदे करितात. लाकडाचें कोरीव काम करण्याबद्दल स्वीस लोकांची फार प्रसिद्धि आहे. दुपारीं घरबसल्या स्त्रीपुरुष कोरीव खुर्च्या, टेबलें, कोचें, काठ्या, व छत्र्या ठेवण्याचे खांब, खुंटाळीं वगैरे वस्तु तयार करितात. युरोप, अमेरिका व जपान यांमधून या वस्तूंना फार मागणी येते. उन्हाळ्यांत हवा खाण्यासाठीं आलेले प्रवासीही वाटेल ती किंमत देऊन या लाकडी वस्तु विकत घेतात. घरचीं कामें आटोपल्यावर विश्रांतीच्या वेळीं स्वीस स्त्रिया दुपारीं सुंदर जाळीच्या फिती ( लेसेस ) व पट्टया ( रिबन ) विणीत बसतात.

स्वीस घड्याळें तर प्रसिद्धच आहेत. त्यांचा जगभर खप आहे. जिनीव्हा सरोवराभोंवतालच्या प्रदेशांत प्रत्येक जण हातांतील लहान व भिंतीस लावावयाचीं मोठीं घड्याळें तयार करण्यांत गुंतलेला असतो. स्वीस लोकांनीं उद्योगधंदे आपसांत वाटून घेतले

आहेत कीं काय असा तिऱ्हाइतास भास होतो. दर शहराचा कांहीं एक विशिष्ट धंदा असतो. एका शहरांत लाकडाचें कोरीव काम चाललें असतें तर दुसऱ्यांत चामड्याच्या वस्तु तयार करीत असतात व तिसऱ्यांत निरनिराळ्या धातूंच्या जिनसा करितात.

स्वित्झर्लँडांत गिरण्या व नानाप्रकारचे कारखाने अनेक आहेत. आल्प्स पर्वतावरून वेगानें खालीं वाहाणाऱ्या असंख्य जलप्रवाहांच्या शक्तीचा स्वीस लोकांनीं कारखान्यांना लागणारी वीज पैदा करण्याकडे उपयोग केला आहे. या विजेच्या साहाय्यानें सुताच्या व रेशमी कापडाच्या गिरण्या; यंत्रें तयार करण्याचे कारखाने; लेसेस, कशिदाकाम हीं यंत्रांच्या सहाय्यानें तयार करण्याचे शेकडों कारखाने स्वित्झर्लँडांत चालू आहेत. या कारखान्यांत इतका विपुल माल पैदा होतो कीं, स्वित्झर्लँडाचा दर वर्षीचा निर्यात व्यापार आठ कोटी पौंडांच्या वर आहे.

इतके उद्योगधंदे आहेत तरी वाढत्या लोकसंख्येला लहानशा देशांत मिळावा तितका चरितार्थाला वाव मिळत नाहीं. म्हणून अनेक शतकांपासून हजारों स्वीस लोक परदेशांत पोट भरण्यासाठीं जातात. हे लोक शरिरानें धट्टेकट्टे व इमानी असल्यानें पूर्वी युरोपांतील राजे लोक आपलें संरक्षण करण्यासाठीं स्वीस शिलेदारांच्याच हुजुरात पागा बाळगीत व हे शिलेदार प्राण जाईपर्यंत धन्याचें रक्षण करीत. अलीकडे परदेशांतील भाडोत्री माणसें लष्करांत ठेवण्याची चाल बंद झाली आहे. त्यामुळें स्वयंपाकी, वाढपे होऊन किंवा इतर नोकऱ्या पत्करून पुष्कळ स्वीस लोक हिवाळ्याचा मोसम परदेशांत घालवितात, व उन्हाळा सुरू होतांच आपल्या मायभूमीकडे व गुराढोरांकडे परत जातात. आपल्याकडे कोंकणांतील लोक असेंच करितात. शेती थोडी व माणसें फार असल्यानें दोन लाखांवर कोंकणांतील माणसें मुंबईस येऊन गिर-

ण्यांत वगैरे मजुरी करितात. कांहींजण बारा महिने मुंबईस राहा-तात. परंतु बरेच जण शेतीच्या मोसमाला परत कोकणांत जाऊन भातशेती करितात.

## स्वातंत्र्यप्रेम

डोंगरांत घरें करून राहाणाऱ्या व डोंगरावरील मोकळी हवा खाणाऱ्या लोकांचीं मनें सुद्धां त्या हवेसारखी स्वतंत्र वृत्तीचीं — मोकळ्या बाण्याचीं — होतात. त्यांना पारतंत्र्य कसें खपणार? स्वित्झर्लंड हा देश सातआठशें वर्षांपूर्वी ऑस्ट्रिया नांवाच्या शेजाऱ्च्या बलाढ्य देशाच्या ताब्यांत होता. ऑस्ट्रिया या डोंगरांतल्या खेडवळ लोकांवर वाटेल तसा जुलूम करूं लागला. त्याला वाटलें, हे मूठभर अडाणी लोक आपलें काय करणार? परंतु या स्वतंत्र बाण्याच्या स्वीस शेतकऱ्यांनीं व गवळ्यांनीं ऑस्ट्रियाचें जूं झुगारून दिलें व स्वातंत्र्य जाहीर केलें. ऑस्ट्रियानें मोठमोठीं सैन्यें नामांकित सेनापतींच्या आधिपत्याखालीं या मूठभर लोकांना चिरडून काढण्यास पाठविलीं. पण शूर स्वीस लोकांनीं आपल्या अवघड खिंडींत त्यांना हुलकावण्या दाखवून खडे चारिले. तेव्हां-पासून आठशें वर्षें हें चिमुकलें राष्ट्र स्वतंत्र आहे, इतकेंच नव्हे तर तें लोकसत्ताक आहे. स्वित्झर्लंड हें सर्वांत जुनें लोकसत्ताक राष्ट्र आहे असें म्हणतात.

स्वित्झर्लंडाचे बावीस कँटन् म्हणजे जिल्हे आहेत. प्रत्येक कँटनमध्यें 'कॉम्यून' नांवाच्या ग्रामसंस्था असतात. देशांत एकंदर ३१६४ काम्यून असून त्यांना आपला बहुतेक सर्व कारभार पाहाण्याचा अधिकार असतो. मराठशाहींत पूर्वीं जशा ग्रामपंचायती गांवापुरता सर्व कारभार पाहात, तसाच हा प्रकार. प्रत्येक कँटन सुद्धां दुसऱ्या सर्व कँटनपासून एकप्रकारें राज्यकारभाराच्या बाबतींत बहुतेक स्वतंत्र असतें. फक्त कायदे करण्यासाठीं सर्व कँट-

नर्नी निवडून पाठविलेल्या प्रतिनिधींच्या दोन लोकसभा असतात. लहान लहान कँन्टनमध्यें तर सर्व शेतकरी व गवळी कुरणावर एकत्र बसतात, अधिकाऱ्यांची निवड करितात व आपल्या कँन्टन-पुरते कायदे करितात. मोठ्या कॅन्टनमध्यें हीं कामें लोकप्रतिनिधीं-कडे असतात. तथापि महत्त्वाच्या बाबतींत कँटनमध्यें राहाणाऱ्या प्रत्येक माणसाचें मत घेण्यांत येतें. याप्रमाणें स्वित्झर्लंडची राज्य-पद्धति पूर्णपणें स्वतंत्र बाण्याची आहे.

स्वित्झर्लंड हा भूगोलाच्या दृष्टीनें एक देश मानला तरी त्यांत राहणारे लोक एका प्रकारचे, एका धर्माचे, एक भाषा बोलणारे असे नाहींत, ही एक आश्चर्यकारक गोष्ट आहे. पश्चिमेकडील स्वीस लोकांची मातृभाषा फ्रेंच आहे तर दक्षिणेकडील लोकांची इटालियन व पूर्व आणि उत्तरेकडील लोक जर्मन बोलतात. त्याच-प्रमाणें शेंकडा ५८ लोक प्रॉटेस्टंट धर्मपंथाचे, ४० रोमन कॅथो-लिक पंथाचे व बाकीचे ज्यू आणि इतर पंथाचे आहेत. भाषा भिन्न, धर्म भिन्न असूनसुद्धां स्वीस लोकांचें एक राष्ट्र आहे, ते एकाच मायभूमीवर प्रेम करितात, तिच्याच सेवेसाठीं लढतात, तिच्याच छत्राखालीं एकत्र येऊन कायदे करितात व सुरळीतपणानें राज्य-कारभार चालवितात. अनेक धर्म, जाति व भाषा यांनीं गजबज-लेल्या हिंदुस्थानला या चिमुकल्या राष्ट्रापासून कांहींच धडा घेतां यावयाचा नाहीं काय ?

---

## प्रकरण १२ वें

## पवनचक्क्यांच्या व कालव्यांच्या देशांतील डच लोक

आतांपर्यंत आपण जे देश पाहिले, ते समुद्रसपाटीपासून थोडे-तरी उंच असे होते; निदान त्यांची उंची समुद्रसपाटीइतकी तरी

होती. आतां मी तुम्हांला ज्या एका चमत्कारिक देशांत नेणार आहें, त्याची उंची समुद्राच्या सपाटीहून कमी आहे. तो देश समुद्राच्या कांठींच आहे. तुम्ही त्या देशांत समुद्रकांठीं जमिनीवर उभे राहिलांत, व समुद्राकडे पाहिलें तर तुम्हांला असें आढळून येईल कीं, समुद्राची सपाटी तुमच्या डोक्याहून वर उंच आहे, व त्यांतील मासे तुमच्या डोक्यापेक्षांही उंचीवरून समुद्रांत पोहत आहेत. तुम्ही त्या देशांतील समुद्रकांठच्या एखाद्या घरांत बसलांत, तर समुद्रांतील जहाजें तुमच्या घराच्या दुसऱ्या मजल्यापेक्षांही उंच आहेत असें तुम्हाला दिसेल.

या चमत्कारिक देशाला 'हॉलंड' असें म्हणतात व तेथील रहिवाशांना 'डच' म्हणतात. हा देश फार लहान आहे. याची लांबी पुण्यापासून कोल्हापुरइतकी (म्हणजे १५० मैल); व रुंदी पुण्यापासून कऱ्हाडइतकी (म्हणजे १०० मैल) आहे.. वरील हकिकत वाचून तुमच्यापुढें असा प्रश्न उद्भवेल कीं, हे लोक अशा खोलगट देशांत राहातात तरी कसे ? फार काय, हा देश तरी समुद्राच्या हल्ल्यापासून सुरक्षित कसा राहिला ? कारण, पाणी केऱ्हांही खोलगट जमिनींत वाहात जाणार व ती भरून काढणार. 'हॉलंड' या शब्दाचा मुळीं अर्थच 'हॉलो लँड' म्हणजे खोलगट प्रदेश असा आहे. मग समुद्राचें पाणी देशभर पसरून हॉलंड समुद्रमय कां झाला नाहीं ? समुद्राला बाजूला सारणारा असा कोण अगास्त्य हॉलंडला मिळाला ?

या प्रश्नाचें उत्तर द्यावयाचें म्हणजेच 'डच' लोकांच्या धाडसाचें, परिश्रमाचें व बुद्धिमत्तेचें वर्णन करणें होय. वास्तविक हॉलंड हा मूळचा दलदलीचा प्रदेश. त्या दलदलींत सबंध मनुष्य खालीं गडप होऊन जावयाचा ! तेथें माणसांची वस्ती कशी होणार ? शिवाय, दलददलींत धान्य तरी कसें उगवणार ? अशी मूळची स्थिति असतांही

आज हॉलंड देश शहरें व खेडीं यांनीं गजबजलेला आहे. डच शेतकरी व गवळी चांगले सुखवस्तु असून त्यांचीं बँकांत खातीं आहेत. लोकसंख्येच्या मानानें हॉलंड देश युरोपांत सर्वांत श्रीमंत आहे असें म्हणतात.

हा चमत्कार कसा घडला? ती दलदल कशी नाहींशी झाली? हें स्थित्यंतर केवळ माणसांच्या परिश्रमानें व शहाणपणानें घडून आलें. माणसानें निसर्गावर मिळविलेल्या जयाचें हॉलंड हें एक उत्तम उदाहरण आहे. दलदलीच्या आसपास फारतर अर्धनग्न अडाणी कोळी मासे धरीत झोपड्या करून राहिले असते. पण डच लोक 'ठेवील देवेश तसें रहावें' या मताचे नव्हते. निसर्गाला आपल्या बुद्धिमत्तेनें आपल्या इच्छेप्रमाणें राबविण्याची त्यांच्यांत धमक होती. म्हणून ते कामास लागले.

त्यांनीं दलदलीचे लहान लहान टापू आंखून घेतले, व त्यांच्या भोंवतीं भिंती बांधल्या. नंतर त्या भिंतींपाशीं मोठमोठ्या पवनचक्क्या बांधल्या. हॉलंड देश सपाट असल्यानें व समुद्र शेजारीं असल्यानें समुद्राकडचें वारें सारखें चालू असतें. या वाऱ्यानें पवनचक्कीचे अजस्र हात खालींवर रहाटगाडग्याप्रमाणें फिरूं लागतात व ते यंत्रांना गति व शक्ति देतात. या पवनचक्क्यांच्या योगानें पंप चालू होतात व पंपांमधून दलदलींतील सर्व पाणी बाहेर उपसलें जातें. हें पाणी भिंतींच्या पलीकडे कालवे खोदून त्यांच्यांतून समुद्रांत पोंहचवितात. भिंतींच्या आंतील प्रदेशांतील सर्व पाणी काढलें गेलें म्हणजे तितकी जमीन कोरडी होते, व तेथें घरें बांधतां येतात, व शेती करितां येते. अशाप्रकारें डच लोकांनीं जमिनीचा एक एक तुकडा घेऊन तो कोरडा केला. हें काम फार श्रमाचें व कंटाळवाणें होतें. थोडीशी जमीन कोरडी करण्यास कितीतरी दिवस लागले व पैकाही फार खर्चावा लागला. परंतु मेहनती डच

लोकांनीं याप्रमाणें हळूहळू आपल्या पवनचक्क्यांच्या व कालव्यांच्या युक्तीनें सर्व देश कोरडा केला. व त्या कोरड्या जमिनीवर मोठमोठीं शहरें वसविलीं, आगगाड्या सुरू केल्या व उद्योगधंदे काढले.

हा त्यांचा उपक्रम किती तरी वर्षें चालू होता. अजूनही तो थांबला नाहीं. तुम्ही युरोपच्या नकाशांत हॉलंड देशाकडे पाहा. त्याच्या उत्तरेस ' झायडर झी ' ( Zuider Zee ) नांवाचा समुद्राचा बराच मोठा उथळ फाटा आहे. हा सबंध उपसागर शोषून टाकण्याचा उपक्रम या डच अगस्त्यांनीं चालविला आहे. जेथें आज समुद्र दिसत आहे तेथें कांहीं वर्षांनीं लहानमोठीं शहरें आपल्या दृष्टीस पडतील.

तुम्ही आतां असा प्रश्न कराल, दलदल नाहींशी करण्यास पवनचक्क्या व कालवे उपयोगीं पडले, परंतु जमिनीच्या सपाटीपासून उंचावर असलेला समुद्र जागच्या जागीं कसा राहिला? यासाठीं डच लोकांनीं काय युक्ति योजिली असेल? डच लोकांनीं समुद्र थोपवून धरण्यासाठीं प्रचंड बंधारे बांधिले. या बंधाऱ्यांना ते 'डाइक्'(Dyke) असें म्हणतात. हे बंधारे तीन मजली घराइतके उंच आहेत व दोन तांगे एका वेळीं वरूनजाऊं शकतील इतके रुंद आहेत. हे बंधारे बांधण्याचें काम सुद्धां फार श्रमाचें होतें. पहिली अडचण पायाची. त्या दलदलीच्या जमिनींत कितीही खोल खणलें तरी भक्कम पाया कसा लागणार? बरें, पाया खंबीर नसेल तर वर बंधारा म्हणा किंवा घर म्हणा कसें बांधतां येईल? तें मागेंपुढें कोसळून खालीं पडावयाचें.

डच लोकांनीं प्रथम मोठमोठीं झाडें तोडून आणून तीं जमिनींत खूप खोल, दोन रांगा करून एकावर एक गाडलीं व या लाक-

डांच्या दोन रांगांच्या मध्यें मोठमोठे दगड आणून भरले. हॉलंड-मध्यें दगड मिळणें फार कठीण. यासाठीं दगड लांबून जहाजांतून आणावे लागले. या दगडालाकडाच्या बंधाऱ्यावर दोन्ही बाजूंस माती टाकण्यांत आली. कांहीं कांहीं बंधाऱ्यांवर झाडें व गवत लावलें आहे. हे प्रचंड बंधारे बांधण्याइतकेंच त्यांची राखणी कर-ण्याचें काम दगदगीचें आहे. डच लोक रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून बंधाऱ्यांची राखण करितात, व आपला शत्रु जो समुद्र त्याला आपल्या प्रदेशांतील टीचभर जागा मिळूं देत नाहींत. पाव-साळ्यांत समुद्र खवळलेला असतो, व त्याच्या प्रचंड लाटा या बंधाऱ्यांवर येऊन कोसळत असतात. अशा वेळीं बंधाऱ्याच्या भिंतीला लहानसें का भगदाड पडलें तरी समुद्र त्यांतून आपलें डोकें खुपसून तें भगदाड मोठें करील व अनेक मैलपर्यंतचा प्रदेश पाण्याखालीं बुडून मनुष्यहानि होईल. पंधराव्या शतकांत असाच एक अनर्थ घडला. बंधाऱ्याला भगदाड पाडून समुद्र आंत घुसला व अनेक शहरें व खेडीं पाण्याखालीं बुडालीं. पुष्कळ माणसें मेलीं. असा अनर्थ परत घडूं नये म्हणून डच लोक बंधाऱ्यांची फार काळजीपूर्वक राखणी व पाहाणी करितात. थोडेसें भगदाड पडलें कीं पहारेकरी धोक्याची सूचना म्हणून घंटा वाजवितात. लागलींच लोक धावून येतात व तें भगदाड बुजवितात.

डच लोकांनीं समुद अडविण्यासाठींच बंधारे घातले आहेत, असें नाहीं. त्यांच्या सर्व नद्यांच्या व मोठमोठ्या कालव्यांच्या दोन्ही बाजूंस थेटपर्यंत बंधारे घातलेले असतात. नद्यांची सपाटीसुद्धां आसपासच्या प्रदेशापेक्षां उंच आहे व नद्यांना पूर आला म्हणजे पुराचें पाणी आसपास पसरण्याची भीति असते. याचसाठीं नद्यांना सुद्धां दोन्ही बाजूंनीं बंधाऱ्यांचें नियंत्रण घालावें लागतें.

सारांश, हॉलंडमध्यें जिकडे जाल तिकडे बंधारे, कालवे व पवनचक्क्या तुमच्या दृष्टीस पडतील. हॉलंडमध्यें इतके बंधारे आहेत कीं, त्या सर्वांना एकापुढें एक लावलें तर हजारों मैल



"पवनचक्क्या"

लांबीची एक भली मोठी भिंत होईल. त्याचप्रमाणें हॉलंडमध्यें लहान मोठे कालवेही अनेक आहेत. त्या सर्वांची मिळून लांबी दोन हजार मैल सहज होईल. कांहीं कालवे इतके मोठे व इतके खोल आहेत कीं, त्यांतून समुद्रांतील जहाजें आंत येऊं शकतात. कांहीं उसाला पाणी द्यावयाला काढलेल्या पाटाइतके लहान आहेत. हॉलंडची राजधानी 'आम्स्तरदाम' जवळ जो 'नॉर्थ सी' कालवा आहे तो पंधरा मैल लांब व पंचवीस फूट खोल आहे. या कालव्याभोंवतीं बंधाऱ्यांच्या अजस्र भिंती आहेत. हा कालवा जमिनीपासून उंचावर आहे. तो समुद्राला नेऊन मिळविला आहे. समुद्राच्या मुखाजवळ समुद्राला थोपवून धरणारे मोठमोठे दरवाजे आहेत.

हॉलंडमध्यें जिकडे जाल तिकडे लहानमोठे कालवे असल्यानें डच लोक त्यांचा रस्त्यांप्रमाणें उपयोग करितात. खेडेगांवांतील लोकांचे तर जाण्यायेण्याचे मार्ग म्हणजे हे कालवे. प्रत्येक शेतकऱ्याजवळ व गवळ्याजवळ लहानमोठ्या होड्या असतात. या होड्यांत गहूं, भाजीपाला वगैरे भरून ते शहरांत बाजारांत विकावयाला येतात. गिऱ्हाईकही आपापल्या होड्यांतून बाजारांत येतात. कित्येक शहरांत रस्त्यांच्या ऐवजीं कालवे असतात व त्यांमधून लोक होड्यांत बसून आपल्या कामधंद्याला जात असतांना दिसतात. हे कालवे जमिनीपेक्षां उंच असल्यानें होडींत बसून जात असतांना किनाऱ्यावरील घरांच्या माडीवर काय चाललें आहे, तें स्पष्ट दिसतें. या घरांत राहणारीं मुलें आपल्या खिडक्यांत उभीं राहून कालव्यांतील मासे पकडतात. घरांतील बाया भिंतीला मोठे आरसे टांगतात व त्यांतून कालव्यांतून कोण जात आहे, येत आहे तें पाहातात. त्यांचीं मुलें शाळेंतून येत असतांना त्यांना आरशांत दिसतात. त्यांच्या घरीं भेटावयाला येणाऱ्या मंडळींचें प्रतिबिंब त्यांना आरशांत दिसतें. खाशी सोय! नाहीं?


"हिवाळ्यांतील कालव्यावरील देखावा"

हिंवाळयांत कालव्यांतील पाणी गोठून त्याचा बर्फ बनतो. मग जी मौज होते, ती विचारूं नका. म्हातारेकोतारे, मुलेंमुलीं सारीं माणसें पायाला स्केट बांधून कालव्यांतील बर्फांतून स्केटिंग करीत भरकन् जात असतात. या वेळीं कालव्यांत माणसांची कोण गर्दी होते म्हणून सांगूं.

कालवे ओलांडण्यासाठीं ठिकठिकाणीं लहान मोठे पूल असतात. मोठ्या कालव्यावर जहाजें पुलाजवळ आलीं म्हणजे पूल वर उचलण्याची सोय केलेली असते. जहाज पुढें गेलें कीं परत पूल खालीं जागच्या जागीं येतो.

बंधाऱ्यांपेक्षां व कालव्यापेक्षांही पवनचक्क्यांची संख्या हॉलंडमध्यें मोठी आहे. कालव्याच्या किनाऱ्यावर कांहीं थोड्या हातांच्या अंतरावर एक एक पवनचक्की असते. एका वेळेला तुम्हांला सहज पन्नास पाउणशें पवनचक्क्या दृष्टीस पडतात. प्रत्येक शेतकऱ्याच्या मालकीची एक तरी चक्की असते. या चक्कींचा एक उंचच्या उंच बुरूज असतो, व या बुरजाच्या टोकाला पन्नासपासून शंभर फूट लांबीचे पवनचक्कीचे दोन हात असतात. हे वाऱ्यानें खालींवर सारखे फिरत असतात. कांहीं कांहीं बुरजांचा खालचा भाग म्हणजे शेतकऱ्यांचें घर असतें. पवनचक्क्यांचें मुख्य काम म्हणजे शेतकऱ्याच्या शेतांतील ओल नाहींशी करावयाची. कारण, दलदल नाहींशी झाली तरी जमिनीवर चोहोंकडे पाणी खेळत असल्यानें व जमीन त्या पाण्यापेक्षां सखल असल्यानें तिला ओल येणारच. ही ओल नेहमी काढून टाकली पाहिजे. या शिवाय पवनचक्क्यांच्या सहाय्यानें पिठाच्या गिरण्या, लाकूड कापण्याचे व इतर कामाचे कारखाने चालतात.

हॉलंडमध्यें लोक वाहतुकीला व रहदारीला केवळ कालव्यांचाच उपयोग करितात असें समजूं नये. हा देश अगदीं सपाट असल्यानें

आगगाड्या चालविणें एथें फार सोईचें आहे. एथें डोंगर फोडून बोगदे काढण्याची किंवा रस्ता काढण्याची दगदग करावयाला नको. किंवा मोठमोठे पूलही बांधण्यास नको. यामुळें हॉलंडमध्यें आगगाड्यांचें जाळें पसरलें आहे. आगगाड्यांशिवाय तेथें वाफेनें व विजेनें जालणाऱ्या ट्रॅमगाडयाही आहेत.

हॉलंडमध्यें एका पक्ष्याला फार महत्त्व प्राप्त झालें आहे. तो पक्षी म्हणजे करकोचा होय. हा पक्षी बंधाऱ्यावर बसून त्यावरील किडे खातो. हे किडे बंधाऱ्यांचें लाकूड खात असतात. परंतु करकोचा या किड्यांना खात असल्यानें त्याला देशाचा मित्र समजण्यांत येतें. हॉलंडमध्यें करकोच्याला मारणें किंवा इजा करणें यास कायद्यानें मनाई केली आहे.

वरील माहितीवरून डच लोकांच्या अंगांतील गुण कोणते आहेत हें दिसून आलें असेलच. डच लोकांची शेती व्यवस्थित व चांगल्या प्रकारें चालली आहे. ते गहूं, ओट, जव हीं पिकें काढितात; पण त्यांचा मुख्य भर बागाइतावर आहे. बहुतेक शेतकऱ्यांच्या घरांच्या परसांत कोबी, गाजरें, पालेभाज्या, कांदे, बटाटे व फळझाडें लावलेलीं असतात. या परसांतील बागेची शेतकरी फार चांगली निगा ठेवतो. पाण्याची विपुलता असल्यानें जिकडे पाहावें तिकडे लहान लहान हिरवींगार शेतें दृष्टीस पडतात व त्यांमधून इकडून तिकडे रुपेरी रंगाचे कालवे खेळत आहेत असा भास होतो.

डच लोकांची विशेष प्रसिद्धि त्यांच्या शेतीसाठीं नाहीं. ते दूधदुभत्याच्या धंद्यासाठीं फार प्रसिद्ध आहेत. हॉलंडधून इंग्लंडमध्यें इतकें लोणी व चीज जात असतें कीं, हॉलंडला इंग्लंडचा 'गवळीवाडा ' असें गमतीनें म्हणतात. मुबलक पाणी असल्यानें या देशांत गवत नामी उगवतें, व तें गुरांना फार मानवतें. हॉलंडांतील कांहीं गाई एका वेळीं १०।१५ शेर सकस व मधुर असें दूध देतात.

उन्हाळ्यांत गाईंना कुरणांतच ठेवतात, व रोज सकाळ-संध्याकाळ गवळिणी कुरणांत जाऊन दूध काढितात. पावसाळ्यांत व हिंवाळ्यांत मात्र गाई गोठ्यांत बांधितात. हॉलंडमध्यें लाकूड व दगड या दोन्ही वस्तू दुर्मिळ आहेत. त्या परदेशाहून आणाव्या लागतात. म्हणून घराचें बांधकाम काटकसरीनें करावें लागतें. यासाठींच गुरांसाठीं वेगळे गोठे न बांधितां गुरें बांधण्याची सोय राहात्या घरांतच एका बाजूला केलेली असते. डच लोक गुरांची फार काळजी घेतात, व घरांतील माणसांप्रमाणें त्यांना प्रेमानें व आपुलकीनें वागवितात. गुरांचा गोठा घरांतील इतर खोल्यांइतकाच स्वच्छ असतो. थंडीमध्यें त्यांच्या आंगावर ब्लँकेट घालण्यास डच गवळणी कधीं विसरावयाच्या नाहींत. शिवाय त्या गुरांना रोज अगदीं स्वच्छ धुवून पुसून काढितात.

डच लोक पायाखालीं लाकडें रोवतात व मग त्यांवर घरें बांधितात. झाडें तोडून तीं घरांच्या पायासाठीं उपयोगांत आणण्याच्या या चालीला उद्देशून "डच लोक झाडांवर राहातात" असें एका लेखकानें गमतीनें म्हटलें आहे. या लोकांच्या घरांच्या भिंती लहान असतात; परंतु छप्पर मात्र उंच व उभे असतें. यामुळें पावसाचें पाणी तात्काळ घरावरून निघून जातें. छपरावर लाल रंगाचीं कौलें असतात. भिंतींना पांढरा रंग दिलेला असतो. घरांत मुलांना निजण्यासाठीं पलंगाऐवजीं भिंतीमध्येंच कपाटासारखी व्यवस्था केलेली असते. डच लोकांची चूल मोठी मजेदार असते. चूल नसतेच म्हटलें तरी चालेल. एका खोलींत रंगीबेरंगी विटांचा एक उंच ओटा असतो. हीच त्यांची चूल. या ओट्यावर लोखंडाचा एक आंकडा टांगलेला असतो. आंकड्यांत भांडें अडकवून तें त्या ओट्यावर लोंबकळत ठेवितात, व ओट्यावर कोळशे शिलगावतात कीं झालें काम चालू. डच घरांतील दुसरी एक विशेष गोष्ट

म्हणजे घरांतील शोभेचा बिछाना. हा कधीं वापरला जात नाहीं. तो केवळ शोभेचाच असतो. हा बिछाना शक्य तितका सुंदर ठेविला जातो. हा नेहमीं झाकलेला असतो. पाहुणे मंडळी, स्नेही वगैरे आले म्हणजे तो उघडा करितात.


"डच स्त्री"

डच लोकांचे कपडे मोठे मजेदार असतात. पुरुष व मुलगे आपल्याइकडील काबुली लोकांसारख्या पोकळ, घोळदार अशा काळ्या मखमलीच्या विजारी घालितात व कमरेला खूप मोठा पट्टा अडकवितात. या पट्ट्यांचीं बकलें मोठीं असून तीं चांदीचीं असतात. पुरुष आंगांत लहान रंगीबेरंगी जाकिटें घालितात व डोक्याला पसरट टोप्या घालितात. ते काबुल्याप्रमाणेंच केस वाढवून ते मानेपर्यंत सोडितात. बायका एकावर एक असे पुष्कळ आखुडसे लेहंगे नेसतात. त्यांच्या टोप्या लेसच्या केलेल्या असून त्यांचे दोन्ही बाजूंला कानशिलाच्या खालपर्यंत दोन कान लोंबत असतात. सणासुदीला डच बाया डोक्याला सोन्याचीं, चांदीचीं किंवा या धातूंचा मुलामा दिलेल्या पत्र्यांचीं एक प्रकारचीं चिलखतें घालतात. हीं चिलखतें पिढ्यान्-

पिढ्या फार काळजीपूर्वक जपून ठेवितात. डच लोक पायांत लाकडी जोडे घालितात. त्यांच्या जमिनींत ओल असल्यानें चामड्याचे जोडे ते क्वचित वापरतात. याच कारणासाठीं जपानी लोकही लाकडी जोडेच घालितात. शहरांतील डच लोक अलीकडे इतर युरोपियन लोकांप्रमाणेंच पोषाख करितात.

डच लोक जगांत त्यांच्या स्वच्छतेविषयीं व नीटनेटकेपणाविषयीं फार प्रसिद्ध आहेत. हॉलंडमध्यें गेल्यावर एका दिवसांत हे गुण तुमच्या दृष्टीस पडतात. त्यांच्या कालव्यांवरील असंख्य पूल पाहा; त्यांच्या घरांच्या भिंती पाहा, जणूं काय नुकताच त्यांना रंग दिला आहे असें तुम्हांस वाटेल. कालव्यांतून फिरणारीं जहाजें घ्या. त्यांचे डेक रोज धुवून पुसून अगदीं लख्ख केलेले असतात व ते बर्फाप्रमाणें शुभ्र दिसतात. कोठें म्हणून डाग सांपडावयाचा नाहीं. परक्या लोकांना डच लोकांची स्वच्छपणाची संवय अतिरेकाला गेली आहे असें वाटतें. ह्यांच्या घरांत शिरावयाचें म्हणजे परदेशांतील माणसें भिऊन अगदीं टांचेवर चालतात; इतकीं तीं घरें स्वच्छ असतात. डच घरधनीण भल्या पहाटेस उठली कीं, साबणाचें पाणी, फडक्याचा बोळा व केरसुणी घेऊन साफसूफ करायला लागते. आधीं ती घरासमोरील रस्ता साफ करिते. घराचा उंबरा, दारें, खिडक्या साबणाच्या पाण्याचा बोळा घेऊन त्यानें पुसून पुसून चकचकीत करिते व लांब बांबूनें वरील कानेकोपरे साफ करिते. तिचा हा रोजचा हल्ला घरांतील निर्जीव खिडक्या दरवाजांवरच होतो असें नाहीं. घरांतील कोंबडया, बदकें, डुकरें, गाई हे प्राणीसुद्धां या हल्ल्यांतून वांचत नाहींत. त्यांच्यावरही साबणाच्या पाण्याचा प्रयोग होतो. तीं तक्रार करीत असतातच; पण घरधनीण त्यांना काय दाद देते! तिच्या स्वयंपाकघरांतील भांडयांत तुम्ही खुशाल तोंड पाहून घ्या. इतकीं तीं स्वच्छ व चकचकीत असतात. फार काय, घराची

तक्तपोशी रोज धुवून पुसून अगदीं चकचकीत झालेली असते. गुरें बांधण्याच्या जागादेखील माणसें झोंपण्याच्या खोलीइतक्या स्वच्छ असतात.

डच बाया फार उद्योगी असतात. पुरुष शेतावर किंवा बागेंत काम करण्यांत गुंतले असल्यामुळें गाईंचें दूध काढणें, त्यांना धुणें, चारा घालणें, ताक व लोणी करणें वगैरे कामें बायाच करितात. दूध विकण्याचें काम पुरुष करितात. दुधाचे भरलेले डबे एका लहानशा गाडींत ठेवितात व त्या गाडीला दोन कुत्रे जुंपतात. गवळी लगाम हातांत घेऊन गाडीमागून चालतो. दुपारीं कामकाज आटोपलें कीं, डच बाया सूत काढितात व तागाचें कापड तयार करितात. त्यांच्यांत एक मोठी गमतीची चाल आहे. मुलगी जन्माला आली म्हणजे तिचें लग्न होईपर्यंत तिची आई तिच्यासाठीं अत्यंत सुंदर असें तागाचें कापड विणीत असते. लग्न झाल्यावर तोंपर्यंत विणलेलें कापड घेऊन मुलगी सासरीं जाते.

जपानी लोकांप्रमाणें डच लोक फुलांचे फार शौकी आहेत. त्यांचे फुलझाडांचे बगीचे पाहाण्यासारखे आहेत. त्यांना विशेषतः 'टयुलिप' नांवाचें एक सुंदर फुलझाड फार आवडतें. एके काळीं फुलझाडावरील त्यांची आवड विकोपाला गेली होती. शंभर दीडशें वर्षांपूर्वी टयुलिपचा एक गड्डा त्याच्या भार सोन्याच्या किंमतीनें विकला जात असे. टयुलिपच्या एक प्रकारच्या गड्डयाची पांच हजार रुपये किंमत येई. आजही हॉलंडमधून टयुलिप व इतर फुलझाडांचे हजारों कांदे दरसाल परदेशांत रवाना होतात व हॉलंडला त्याबद्दल दरसाल लाखों रुपये मिळतात.

आतां आपण डच शहरांकडे वळूं. एक तृतीयांश डच लोक शहरांतच राहातात. वीस हजारांहून अधिक लोकसंख्येचीं तीस शहरे आहेत. हीं सर्व शहरें कालव्यांनीं एकमेकांस जोडलेलीं आहेत.

शहरांतील घरें चार पांच मजल्यांचीं असतात. या घरांखालीं पायांत उभींच्या उभीं झाडें पुरतात. ‘डच लोक झाडांवर राहातात’ हें विधान किति खरें आहे! शहरांत मोठमोठे बगीचे, उपवनें, नाना प्रकारचीं शोभिवंत दुकानें, ग्रंथसंग्रहालयें, पदार्थसंग्रहालयें, नाटकगृहें, चित्रगृहें आणि बँकांच्या व शाळांच्या इमारती असतात. आमस्तरदाम व रातरदाम या बंदरांतून हॉलंडचा जगाशीं दांडगा व्यापार चालतो. या बंदरांत जगांतील नाना देशांतील जहाजें व्यापारासाठीं येत असतात. हॉलंड हें दर्यावर्दी राष्ट्र आहे. इंग्लंड व फ्रान्स यांच्याही पूर्वीं त्यानें हिंदुस्तान व स्ट्रेट्स सेटलमेंटमध्यें व्यापाराच्या वखारी घातल्या होत्या. आज युरोपच्या बाहेर हॉलंडच्या साठपट आकाराचा मुलूख डच लोकांच्या ताब्यांत आहे.

हॉलंडमध्यें कोळशाच्या खाणी नाहींत. तथापि जहाजांमधून दुसऱ्या देशांतून डच लोकांना कोळसा आणितां येतो. या कोळशाच्या व पवनचक्क्यांच्या साह्यानें हॉलंडमध्यें नाना प्रकारचें कापड व यंत्रें तयार करण्याचे कारखाने आहेत.

आमस्तरदाम शहराची एका धंद्याकरितां जगांत फार प्रसिद्धि आहे. तो म्हणजे हिऱ्यांना पैलू पाडणें हा होय. हें शहर जगामध्यें हिऱ्यांच्या व्यापाराची मुख्य पेठ आहे. खाणींतून काढलेले हिरे ओबडधोबड असतात व त्यांत इतर दोष असतात, त्यामुळें त्यांची यावी तशी किंमत येत नाहीं. परंतु हिऱ्यांना नीटनेटका आकार दिला व घासून पुसून ते साफ केले तर ते प्रमाणशीर व सुंदर दिसतात व त्यांची किंमतही वाढते. परंतु हिरा हा अत्यंत कठीण पदार्थ आहे. दुसऱ्या कसल्याही पदार्थाच्या योगानें त्याला कापतां येत नाहीं. ऐरणीखालीं हिरा ठेवून त्याच्यावर कितीही घाव घातले तरी तो अभंग राहातो. इसवी सन १४५६ मध्यें ‘बरघेम’ नांवाच्या बेल्जमच्या जवाहिऱ्यानें असा शोध लावला कीं, हिरे एकमेकांवर घासले असतां

दोघांचाही थोडासा कीस पडतो, व हिऱ्याच्या किसानें दुसरे हिरे घासले असतां ते साफ होतात.

बरघेमच्या या शोधानंतर डच लोकांनीं हिऱ्यांचे पैलू पाडण्याचा व ते साफ करण्याचा उद्योग सुरू केला. आपल्या बुद्धिमत्तेच्या व चिकाटीच्या जोरावर ते या धंद्यांत निष्णात बनले. आज आमस्तरदाम शहरीं हिऱ्यांचे पैलू पाडण्याचे साठाच्यावर कारखाने आहेत व एकएका कारखान्यांत शेंकडों लोक काम करीत असतात. त्यांत बाया व मुलेंही असतात. या कारखान्यांत मुख्य महत्त्वाचें काम म्हटलें म्हणजे खाणींतील हिऱ्यांचा जो भाग चपटा, बसका किंवा ओबडधोबड दिसेल तो बरोबर कापून प्रमाणबद्धशीर करणें हा होय. या कामासाठीं बारीक अणकुचीदार हिरे चिकटविलेल्या चाकूसारख्या एका हत्याराचा ते उपयोग करितात. पैलू पाडण्याचें काम फार कौशल्याचें व जोखमीचें असतें. जरा कमीजास्ती भाग कापला गेला कीं हजारों रुपयांचें नुकसान होण्याचा संभव असतो. या कामासाठीं वाफेनें गरगर फिरणाऱ्या एका चाकाचा उपयोग करितात. या चाकाला हिऱ्याचा कीस लावलेला असतो. चाक दर मिनिटांत पंधराशें वेळां फिरतें. या चाकावर हिरा धरून त्याला योग्य तो आकार देतात, व त्याचे पैलू पाडतात. हिऱ्याच्या कारखान्यांतील सर्व काम फार जपून करावें लागतें. हिऱ्यांच्या किसाचा एक कणही वायां जाऊं देत नाहींत. मोठाल्या हिऱ्यांचे दागदागिने करितात. परंतु लहान हिऱ्यांचे दुसरे अनेक उपयोग आहेत. ते काच कापावयाला, धातूंवर नक्षीकाम करावयाला, भोंकें पाडावयाला वगैरे कामाला उपयोगीं पडतात.

डच लोक चिनी मातीचीं भांडीं तयार करण्यांत हुशार आहेत. विशेषतः 'डेल्फ्ट' या गांवांतील चिनी मातीच्या भांड्यांचे कारखाने पाहाण्यासारखे आहेत. डच लोक चिनी मातीच्या भांड्यांवर पवन-

चक्क्या, जहाजें, कालवे वगैरेंचीं, हॉलंडांतील देखाव्यांचीं, निळसर रंगांत सुंदर चित्रें काढितात.

दलदलीचा व अपुरा देश, लाकूड, दगड व कोळसा या आधुनिक जगांतील महत्त्वाच्या वस्तूंचा अभाव अशी प्रतिकूल परिस्थिति असतांही शीत कटिबंधांतील एक चिमुकलें राष्ट्र आपल्या हिंमतीनें व चिकाटीनें कसें पुढें आलें व त्यानें आपल्या सुखसोयींसाठीं निसर्गाचें स्वरूप कसें पार बदलून टाकलें याचे हॉलंड हें एक छानदार उदाहरण आहे.

---

## प्रकरण १३ वें

## सहकारी चळवळीचे पुढारी डेन लोक.

डेनमार्क हा हॉलंडच्या शेजारचाच एक लहान देश आहे. हा देश सहकारी चळवळीच्या बाबतींत अग्रगण्य समजला जातो. सहकारी संस्था पाहण्यास अनेक देशांतील लोक तेथें कौतुकानें जात असतात. आपणही त्यांच्याबरोबर जाऊं.

हिंदुस्थानला डेनमार्कपासून पुष्कळच शिकण्यासारखें आहे. हिंदुस्थानचे शेंकडा ८० लोक शेतकरी आहेत; पण ते कंगाल स्थितींत असून त्यांना एक वेळचें जेवण कष्टानें मिळतें. डेन लोकांचाही मुख्य धंदा शेतीचाच आहे; पण डेनमार्क देशाचा युरोप खंडांतील श्रीमंत देशांमध्यें दुसरा नंबर लागतो, इतके ते लोक सुखी व संपन्न आहेत! शिवाय, डेनमार्कांत हिंदुस्थानप्रमाणेंच छोट्या शेतीची पद्धत आहे,व ही पद्धत त्या धाडशी व कल्पक लोकांनीं पूर्णपणें यशस्वी करून दाखविली आहे. तीही आपल्याला पाहिली पाहिजे.

डेनमार्क हा अगदीं इवलासा देश आहे. त्याचें क्षेत्रफळ आपल्या सिंधप्रांताच्या तीन पंचमांश इतकें असेल नसेल. डेनमार्कमध्यें सुपीक म्हणावयाला स्लेशविग-हालस्टेन हा प्रांत होता. जर्मनीनें बळजोरीनें या लहान दुबळ्या राष्ट्रापासून तो प्रांत हिसकावून घेऊन जणू काय

त्याच्या काळजाचा लचकाच तोडला. यापूर्वी फ्रेंच बादशहा नेपोलियन याच्या स्वाऱ्यांनीं डेनमार्क उध्वस्त होऊन डेन लोकांत कांहीं त्राण उरलें नव्हतें. अशा बिकट प्रसंगीं डेनमार्कनें धीर खचूं न देतां मेहनत करून अल्पावधींत आपली उन्नति करून घेतली. श्लेशविग-हॉल्स्टेन हातचें गेल्यावर शिल्लक राहिलेली जमीन खडकाळ, रेताड किंवा माळरानवजा होती. डेनमार्कनें प्रथम जेवढी पडीक जमीन होती, तेवढी लागवडीस आणण्याचा प्रयत्न केला. दाट जंगलें होतीं तेथपर्यंत आगगाड्या नेल्या व तेथें लागवडीस सुरुवात केली. पाट-बंधारे बांधून रुक्ष रेताड मुलूख सुपीक बनविला. खाचखळगे, नाले भरून जमीन सपाट केली. जटलंड बेटांतील १७७२ एकर पडीक जमीन एका खासगी संस्थेनें लागवडीस आणली. डेन लोकांनीं दोन मोठ्या नद्यांचा उपयोग शेतीकडे केला. या नद्यांवर अनेक पूल बांधले, बंधारे घातले, नद्यांचें पात्र ठिकठिकाणीं खोदून खोल केलें व लक्षा-वधि रुपये खर्चून या नद्यांच्या पाण्याचा उपयोग शेतीकडे केला. अल्पावधींत एकंदर २५००० एकर रेताड नापीक जमीन लागवडीस आली व ७५००० एकर जमिनीवर फळझाडांची लागवड झाली. आपल्या जमिनींत कोणतीं पिकें कशीं काढतां येतील, जमिनीच्या मशागतीचे प्रकार सुधारून जमिनीचा मगदूर कसा वाढवितां येईल हें निश्चित करण्यासाठीं डेन लोकांनीं ४०० शेतें प्रयोगांसाठीं राखून ठेविलीं व तेथें नवे नवे प्रयोग चालू केले.

ही सर्व अद्भुत घटना खासगी संस्थांनीं घडवून आणली. त्यांनीं सरकारची वाट पाहिली नाहीं. कांहीं लोकांनीं एकत्र जमावें, भांड-वल उभारावें व एकादा पडीक प्रदेश लागवडीस आणावा, पाटबंधारे बांधावे, आगगाड्यांचे रस्ते तयार करावे, अशी सहकारी पद्धतीनें खासगी रीतीनें डेनमार्कनें आपल्या जमिनींची सुधारणा केली.

जमीन तयार झाली, पण ती करणाऱ्या शेतकऱ्यांची काय वाट ?

डेनमार्कला माणसांचीं वाण नव्हती. या वेळीं गरीब बेकार लोक तेथें पाहिजे तितके होते. मजुरांना मजुरी अगदीं थोडी असे. गरीब लोक पोटासाठीं थोडी मजुरी घेऊन गुरांसारखे राबत व श्रीमंत लोक वाटेल तितके मजूर मिळत असल्यानें मजुरीचे दर कमी करीत. यामुळें देशांत कंगाल लोकांचा सुळसुळाट झाला होता. या लोकांची सोय लावणें हें सरकारचें कर्तव्य होतें. डेनमार्कमध्यें कारखाने किंवा मोठाले उद्योग धंदे फारसे नव्हते. तेव्हां शेतीकडेच या लोकांचा उपयोग करणें भाग होतें.

या लोकांना आपल्या जमिनीविषयीं आपलेपणा वाटावा, त्यांनीं जमिनीची काळजीपूर्वक मशागत करावी व सुखी व्हावें यासाठीं डेनमार्क सरकारनें एक नवीन प्रकारची जमीनसाऱ्याची पद्धत अमलांत आणिली. त्यांनीं एका कुटुंबास पुरतील असे जमिनीचे सातपासून दहा एकरापर्यंतचे लहान लहान भाग पाडले, व चांगलें वर्तन असलेल्या कोणाही पुरुषास किंवा अविवाहित स्त्रीस एक एक भाग कसावयास दिला. दोनचार एकाला एक लागून असलेले तुकडे विकत घेऊन ते एकमेकांस जोडूं व मोठ्या प्रमाणावर शेती करूं असा कोणी विचार केला तर त्याला तशी परवानगी मिळत नसे.

कोणासही त्याच्या पसंतीस येईल तें किंवा पंच निवडून देतील तें शेत मिळे. या शेतावर त्या गृहस्थास राहण्यास घर, गोठा व कोठी बांधावी लागे, व कांहीं ठराविक जनावरें व शेतीचीं आउतें विकत घ्यावीं लागत.

या सर्वांसाठीं त्या कंगाल लोकांनीं पैका कोठून आणावा? पैक्याचीही सोय सरकारनेंच केली. शेत, घर, जनावरें व आउतें यांस लागणाऱ्या रकमेचा $\frac{1}{10}$ हिस्सा शेतकऱ्यास स्वतः जमवावा लागे. $\frac{9}{10}$ हिस्सा सरकार शेंकडा तीन टक्के व्याजानें कर्जाऊ देई. ही मदत दोन हप्त्यांनीं मिळे. ही रकम फेडण्यास सरकारनें

९३ वर्षांची मुदत ठेविली होती. रक्कम फेडण्याची पद्धतही फार सवलतीची होती. दर वर्षी तीन टक्के व्याजाचे व एक टक्का मुद्दलाच्या फेडीचा असे चार टक्के कुळास सरकारांत भरावे लागत. याप्रमाणें थोड्या रकमांच्या हप्त्यांनीं सर्व कर्ज फेडण्याचें, सरकार देणें देऊन सुद्धां, कुळांना शक्य झालें.

या छोट्या शेतीच्या पद्धतीनें डेनमार्कचें अपरिमित कल्याण झालें. सर्वांचीं शेतें जवळ जवळ सारखींच असल्यानें 'हा बडा जमीनदार, हा गरीब शेतकरी' असा विषम भेद समाजांतून नाहींसा झाला. इंग्लंडांतील रायडर हॅगर्ड नांवाच्या श्रीमान् जमीनदारानें डेनमार्कची शेतकऱ्यांची परिस्थिति डोळ्यांनीं पाहून खालील उद्गार काढले:—

"डेनमार्कमध्यें अगदीं हलक्या दर्जाचा मजूरसुद्धां आज पूर्णपणें स्वावलंबी बनला आहे. इंग्लंडमध्यें सरकारला आंधळया, पांगळया, म्हाताऱ्या अनाथ लोकांकरितां दरवर्षीं लाखों रुपये खर्चावे लागतात. औद्योगिक प्रगतींत जगांतील सर्व राष्ट्रांच्या पुढ गेलेल्या जर्मनीच्या राजधानींत पन्नास हजार भिकारी अन्नवस्त्रावांचून मोकाट फिरत आहेत. उलटपक्षीं या लहानग्या देशांत तळहाताएवढ्या जमिनीचे तुकडे कसणाऱ्या लोकांत पूर्ण स्वावलंबी, आत्मविश्वासाचे व सुदृढ तरुण निर्माण होत आहेत."

डेनमार्कची छोट्या शेतीची कहाणी आतांपर्यंत सांगितली. यापुढील कहाणी यापेक्षांही अद्‌भुत व मनोरंजक आहे. डेनमार्कची हवा शेतीला फारशी अनुकूल नाहीं. आसपास समुद्र असल्यानें व हॉलंडप्रमाणें सर्व प्रदेश खोलगटच असल्यानें समुद्राकडून आलेल्या धुक्यानें डेनमार्कचें आकाश व्यापिलेलें असतें. यामुळें हवा सर्द असते, व तेथें बऱ्याच प्रकारचीं पिकें होत नाहींत. तरीही डेन शेतकऱ्यांनीं गहूं, जव, बटाटे, ओट वगैरेंची लागवड पद्धतशीर

रितीनें केली होती. इतक्यांत जर्मनीनें १८७२ त आपल्या शेतीच्या संरक्षणाकरितां परदेशाहून येणाऱ्या मालावर जबरदस्त जकात बसविली. यामुळें डेनमार्कचें धान्य जर्मनींत पाठविणें बंद झालें.

या आणीबाणीच्या प्रसंगीं डेनमार्क सरकारनें असें जाहीर केलें कीं, "आपल्या धान्याला परदेशांत आतां भाव येत नाहीं, यासाठीं जादा धान्य पिकविण्याचें बंद करून आपण आतां गुराढोरांची पैदास वाढवून दूधदुभत्यांचे धंदे सुरू केले पाहिजेत." ताबडतोब यक्षिणीच्या कांडीप्रमाणें डेन्मार्कची परिस्थिति बदलली. लोक जादा प्रमाणावर पिकें काढण्याचें सोडून गुरांना चरण्यासाठीं कुरणें राखूं लागले व गुरांचा संग्रह वाढवूं लागले.

पण एवढयावर थांबलें नाहीं. प्रत्येक डेन शेतकऱ्यानें पांचपन्नास गाई बाळगून, आपल्याच पायांवर उभें राहून गवळ्याचा धंदा केला असता तर डेनमार्कची जगांत इतकी प्रसिद्धि झाली नसती व कदाचित् मीं हें प्रकरणही लिहिलें नसतें. डेनमार्कच्या लोकांची खरी करामत जशी त्यांच्या छोटया शेतीमध्यें दिसून आली तशीच ती **सहकारी पद्धतीनें** गवळ्याचा धंदाच नव्हे तर सर्व प्रकारचा व्यवहार करण्यांत दिसून आली.

ही सहकारी चळवळ काय हें आपण समजून घेतलें पाहिजे. हें समजून घेणें सोपें आहे. म्हातारा व त्याचीं मुलें ही गोष्ट प्रसिद्धच आहे. म्हाताऱ्याच्या मुलांना एक एक काठी सहज मोडतां आली, पण त्याच काठ्यांचा जुडगा कोणासही मोडतां आला नाहीं. कारण, एकीचें— सहकार्याचें— बळ. जें काम एकटयाला करतां येत नाहीं, किंवा तें करण्यास त्याला वेळ आणि श्रम पुष्कळ पडतात, तेंच काम थोड्या श्रमानें अनेक माणसें एकत्र आलीं म्हणजे तीं करूं शकतात. हीच सहकारी चळवळ. हिला दुसरीही बाजू आहे. एक माणूस आपल्या मालकीचें एक दुकान उघडतो. गांवाला

त्याच्या दुकानांतील मालाची गरज असते व म्हणून सर्व गांवाला तो दुकानदार सांगेल त्या भावानें जिन्नस विकत घ्यावे लागतात. म्हणजे सगळ्या गांवाचा पैसा त्या एकटया दुकानदाराच्या खिशांत पडतो. याच्या उलट, जर सगळ्या गांवानें मिळून वर्गणी करून सर्व वर्गणीदारांच्या मालकीचें दुकान उघडलें तर त्याच जिनसा गांवकऱ्यांना थोड्या किंमतींत मिळूं शकतील. अशा दुकानास सहकारी तत्त्वावर चालविलेलें दुकान म्हणतात.

अशा सहकार्याच्या अभावीं आपल्या लोकांची किती फसवणूक व नुकसान होतें हें एक दोन उदाहरणें घेऊन स्पष्ट करतों. पुण्यामुंबईस व इतर शहरांतही बाजारांत आपण, 'सांगलीचें — बेळगांवचें— कृष्णाकांठचें उत्तम लोणी' अशा दुकानांवरील पाटया वाचतों व त्या दुकानांतून रुपयाला १० छटाक, १२ छटाक असें लोणी विकत घेतों. हें लोणी खरोखर मूळचें कोणाच्या मालकीचें ? कृष्णाकांठच्या गरीब गरजू शेतकऱ्यांच्या. सांगलीस किंवा इतर ठिकाणीं सावकार लोक पाटयाच्या पाटया खुर्दा घेऊन बाजाराच्या अड्डयावर बसतात व लोणी घेऊन येणाऱ्या शेतकऱ्यांना अडवून मातीमोलानें त्यांच्याकडून लोणी विकत घेतात. कोणी कोणी शेतकऱ्यांना आधींच कर्ज देऊन बांधून टाकितात व वाटेल त्या भावानें लोणी देणें त्यांना भाग पाडतात. हे सावकार स्वतःचा नफा चोपून घेऊन तें पुण्यामुंबईस पाठवितात. तेथील दुकानदार आपला नफा व खर्च लोण्यावर आकारून मग तें गिऱ्हाइकाला विकणार. म्हणजे मूळ शेतकऱ्यांचें नुकसान व गिऱ्हाइकांचें नुकसान ! मधल्या फुकटया मध्यस्थांचा— सावकार दुकानदारांचा— मात्र फायदा ! यापेक्षां लोणीवाल्यांनीं आपलें सहकारी मंडळ सुरू केलें व सर्वांचें लोणी एकत्र जमविण्याची व तें पुण्यामुंबईस पाठवून स्वतःच्याच सहकारी दुकानांवर तें विकण्याची व्यवस्था केली तर त्यांना आपल्या मालाचा

योग्य मोबदला मिळेल व गिऱ्हाइकांनाही लोणी माफक भावांत मिळेल. हे मधले उपटसुंभ नाहींसे करणें व माल पैदा करणारा आणि माल विकत घेणारा या दोघांचा प्रत्यक्ष संबंध घडवून आणणें हाच सहकारी चळवळीचा मुख्य उद्देश आहे.

दुसरें उदाहरण थोडक्यांत सांगतो. पुण्याच्या मंडईंत पहाटेस लोणी विकण्याच्या अड्डयावर डोक्यावर पाटया घेऊन येणारे मावळे सिंहगडच्या वाटेनें भाज्या व फळें घेऊन दहा बारा मैल चालून येतात. त्यांचे रोज किती हाल, किती नुकसान होत असतें ? थोड्याशा किंमतीच्या भाजीसाठीं घरदार सोडून त्यांना १०।१२ मैल यावें लागतें. दलालामार्फत माळी शक्य तितक्या कमी भावांत माल लिलावांत विकत घेतात व तो मंडईंत विकतात. याच भाजीवाल्यांसाठीं सहकारी संस्था काढली तर घरबसल्या त्यांच्या भाज्या, फळें, लोणी पुण्यास आणण्याची व्यवस्था होईल व विक्रीचे पैसे ज्याचे त्यास घरबसल्याच मिळतील.

असो. आतां आपण डेनमार्ककडे वळूं. डेनमार्कनें सर्व देशभर सहकारी संस्थांचें जाळें पसरविलें आहे. तेथें सावकार, गुमास्ता, अडत्या या मध्यस्थांचें नांव नाहीं. खेड्यांतील माणसास त्याचा जो कांहीं माल विकावयाचा असेल, तो त्याच्या घरून माल विकणाऱ्या सहकारी संस्था घेऊन जातात व त्याला कापडालत्ता, धान्य व इतर संसारास व धंद्यास उपयोगी अशा ज्या वस्तु लागतात त्या सर्व सहकारी संस्थाच पुरवितात. या दोन्ही प्रकारच्या— माल नेणाऱ्या व जिनसा विकत देणाऱ्या— संस्थांचा प्रत्येक गांवकरी एक प्रकारें मालकच असतो. कारण त्या त्या संस्थांत त्यांचें वर्गणीच्या रूपानें भांडवल गुंतलेलें असतें.

पूर्वी लिहिलेंच आहे कीं, १८७२ पासून डेनमार्कनें कुरणें राखून, गाई ठेवून दुधदुभत्याचा धंदा जारीनें सुरू केला. या धंद्यांत

या छोट्याशा देशाला विलक्षण फायदा झाला. जगांत जितकी लोण्याची पैदास आहे, तिचा शेंकडा २८ हिस्सा एकट्या डेन्मार्कचा आहे. एकट्या इंग्लंडमध्यें डेन्मार्कमधून दर वर्षीं पन्नास लक्ष शेर लोणीं जातें. याखेरीज डेनमार्क लक्षावधि शेर लोणी दूरदूरच्या देशांत हवा न जाईल अशा डब्यांत बंद करून पाठवितें. याखेरीज या देशाचा दुसरा मोठा धंदा कोंबड्यांच्या अंड्यांचा. डेनमार्कचीं दरवर्षीं लक्षावधि अंडीं खपतात. इंग्लंडमध्यें इंग्रज मनुष्य जीं अंडीं खातो, तीं बहुधा डेनमार्कनें पाठविलेलीं असतात. डेनमार्कचा तिसरा महत्त्वाचा धंदा डुकरें पाळून त्यांचें मांस विकण्याचा. हा धंदा त्यांना सहज सुचला. दुधाचें लोणी काढल्यावर जें ताक राहातें, तें डुकरांना चांगलें मानवतें व तीं त्यावर चांगलीं गलेलठ्ठ होतात. आपलें ताक वायां जाऊं नये म्हणून डेनमार्कनें डुकरें पाळण्यास सुरवात केली. दरसाल या डुकरांच्या मांसाची डेनमार्कमधून फार मोठ्या प्रमाणांत निर्यात होते.

हे सर्व धंदे सहकारी तत्त्वावरच चालतात. डेनमार्कच्या प्रमुख सहकारी संस्था म्हणजे 'सहकारी दूधदुभत्याच्या संस्था.' यांच्या विद्यमानें १९०९ सालीं डेन्मार्कमध्यें सुमारें ११५७ सहकारी दूधघरें असून त्यांत १,५७,००० लोक गुंतलेले होते. दूध व लोण्याची पारख करणाऱ्या संस्था नुसत्या ५१९ होत्या, व त्यांत दहा हजार लोक काम करीत होते.

या दूधदुभत्याच्या परस्पर सहकारी संस्थांचे सभासद शेतकरीच व त्यांतील सर्व भांडवल शेतकऱ्यांचेंच असतें. हें भांडवल लहान लहान रकमांच्या भागांच्या ( शेअर्स ) रूपानें जमविलें जातें. यामुळें लहानसहान शेतकऱ्यांना त्या संस्थांचे भाग घेणें पतकरतें. प्रत्येक दूधदुभत्याच्या संस्थेचीं दूधघरें असतात. या दूधघरांत त्या त्या संस्थेच्या सभासद शेतकऱ्यांच्या घरून त्यांचें दूध रोज सकाळीं आणण्यांत

येतें. ज्या शेतकऱ्याचें जितकें दूध दूधघरांत येत तितक्याच दुधाच्या प्रमाणांत त्याचे त्या संस्थेंत भाग असतात. या पद्धतीमुळें मालाच्या प्रमाणांत शेतकऱ्यावर जबाबदारी असते व त्याला मालाच्या प्रमाणांतच नफाही मिळतो.

या दूधघरांत दुधाचें लोणी, मलई, चीझ वगैरे पदार्थ तयार होऊन विक्रीसाठीं रवाना होतात. आपण एका दूधघराचें उदाहरण घेऊं—

ब्रोस्तप येथील सहकारी दूधघर म्हणजे एक मोठा कारखानाच आहे. २६४ शेतकरी याचे भागीदार आहेत. या सभासदांच्या घरचें दूध आणण्यासाठीं १८ मोटारगाड्या ठेविल्या आहेत. या दूधघरांतून रोज तीन हजार शेर दूध घरोघर विकलें जातें. लोणी, चीझ वगैरे पदार्थ बनवितात तें वेगळेंच.



"दूधगाडी"

पहांटेस सहा वाजतां मोटारगाड्यांतून सभासदांच्या गोठ्यांतलें दूध कारखान्यांत येतें. आल्याबरोबर दुधाचें वजन होतें व रजिष्टरांत तें नमूद होतें. दुधामध्यें भेसळ होऊं नये म्हणून निरनिराळ्या मालकाच्या दुधाचा नमुना ठेविलेला असतो व या नमुन्याच्या दुधांतील तुपाच्या प्रमाणावर किंमत बसविलेली असते. शिवाय या परस्पर सहकारी संस्थांचे अधिकारी वरचेवर प्रत्येकाच्या घरीं जाऊन दुधाच्या कसदारपणाची व निर्भेळपणाची तपासणी करितात. दूध आंतून

ठेविलेले रिकामे डबे पालथे निथळत ठेवितात. अशा निथळीच्या थेंबांचेंच सुमारें ४०।४५ शेर दूध जमा होतें! यानंतर दुधाचें लोणी काढतात तो प्रकार असा:——आधीं फिल्टरपद्धतीनें दूध गाळून घेतात. नंतर तें दूध एका मोठ्या नसराळ्यांत जातें. या नसराळ्याभोंवतीं वाफेच्या नळ्या असतात. या वाफेच्या योगानें दूध तापतें. नंतर नळ्यांमधून दूध दुसऱ्या एका नसराळ्यांत जातें. या भांड्यास यंत्राच्या साहाय्यानें चक्राकार गति देतात. ती इतकी कीं, भांड्याचे एका मिनिटांत सहा हजार फेरे होतात! या गतीमुळें दूध इतकें ढवळून निघतें कीं, दुधाचे सर्व ओशट बिंदु हलके असल्यानें भांड्याच्या मध्याकडे येतात व एका नळींतून मलई आणि दुसरींतून ओशट बिंदु नसलेलें दूध—'गिरणींतलें दूध'—बाहेर पडतें. नंतर तें गिरणीचें दूध परत पहिल्यापेक्षां जास्त तापवितात. मग तें दुसऱ्या टाकींत जाऊन पडतें. तेथें त्याचें वजन होतें. मग सभासद शेतकऱ्यांच्या घरीं त्यांनीं पाठविलेल्या दुधाच्या पाऊणपट दूध परत पाठवितात व बाकीच्या पावपट दुधाचा चीझ नांवाचा एक खाण्याचा पदार्थ निराळ्या एका कारखान्यांत बनतो. मलई, लोणी विक्रीसाठीं डब्यांत भरून रवाना होतात.

हीं दूधघरेंच लोकांना दूध विकतात. आच्छेर दुधाचे मोहरबंद डबे घरोघर रतिबाप्रमाणें पाठविले जातात. दूधवाल्या गवळ्याला दूध कसें व कोठें विकावें हें पाहावें लागत नाहीं. दूधदुभत्याच्या संस्थेचे सभासद झालें कीं संपलें. आपल्या पुण्यास आसपासच्या ४७ खेड्यामधून सुमारें पंधरा वाटांनीं २७८० शेर दूध रोज बायाबापड्या आणीत असतात, असें म्हणतात. या इतक्या लोकांसाठीं जर ठिकठिकाणीं दूधघरें निघालीं तर किती छान होईल?

डेन्मार्कमध्यें केवळ दूधदुभत्याच्याच संस्था आहेत असें नाहीं. सहकारीपणा डेन लोकांच्या रोमरोमांत भिनला आहे. कोणतीही

बारीकसारीक गोष्ट करावयाची झाली तरी तें सहकारितेनेंच करितात. त्यांच्या गुरेंढोरें पैदास करणाऱ्या सहकारी मंडळ्या प्रसिद्ध आहेत. या मंडळ्या गुरांची योग्य जोपासना व त्यांची सशास्त्र निपज यांकडे लक्ष पुरवितात. शेतकऱ्यांना खत, बींबियाणें, आउतें, लत्ताकपडा पुरविण्यासाठीं " माल पुरविणाऱ्या सहकारी मंडळ्या " निघाल्या आहेत. " संयुक्त माल पुरविणारी सहकारी मंडळी " नांवाची तेथें एक मोटी राष्ट्रिय संस्था आहे. तिच्या एकंदर ८०० शाखा असून प्रत्येक खेड्यांत एक एक उपशाखा आहे. दर खेड्यांत या शाखेची कोठी असते, व तिच्यांतून शेतकऱ्यास लागणारे सर्व पदार्थ पुरविले जातात. कोपनहेगन या राजधानीच्या शहरीं मालाची एक भली जंगी वखार आहे. या वखारींतून सर्व शाखांना माल पाठविला जातो.

डेन्मार्कमध्यें गुरांचा चारा पुरविणाऱ्या सहा मंडळ्या आहेत. या मंडळ्या दूधदुभत्याच्या ६०० मंडळ्यांनींच स्थापन केल्या आहेत. याशिवाय या दूधदुभत्याच्या मंडळ्यांनींच नुसतें खत पुरविणाऱ्या चार मोठ्या मंडळ्या काढल्या आहेत. या मंडळ्यांनींच दूधदुभत्याच्या कारखान्यास लागणारी यंत्रसामुग्री पुरविणारी एक निराळी सहकारी मंडळी स्थापन केली आहे. याप्रमाणें मोठमोठ्या सहकारी संस्थांनीं इतर आनुषंगिक व्यवहारासाठीं अनेक लहानसहान सहकारी संस्था काढिल्या आहेत. एक शेतकरी सहज आठदहा निरनिराळ्या प्रकारच्या सहकारी संस्थांचा सभासद असतो.

या अद्भुत सहकारितेनें डेन लोकांना अल्पावधींत थोड्या खर्चांत व फार थोड्या मेहनतीनें आपला माल पैदा करतां येतो; व ज्या

देशाच्या ज्या बाजारांत भाव जास्त येत असेल तेथें नेऊन विकतां येतो. त्याचप्रमाणें अवश्य लागणाऱ्या वस्तूही योग्य किंमतींत त्यांना घरबसल्या मिळूं शकतात. यामुळें डच लोक फार श्रीमंत झाले आहेत व तेथील प्रत्येक शेतकऱ्याचें सेव्हिंग बँकेंत खातें आहे. सारांश, डेन्मार्क म्हणजे सहकारितेचा विजय होय!

---

## प्रकरण १४ वें

# सुंदर देशांतले बोलके ग्रीक

युरोपखंडाची रजा घेण्यापूर्वी त्या खंडांतील एक देश आपण अवश्य पाहिला पाहिजे. तो देश ग्रीस होय व त्यांत राहणाऱ्या लोकांना ग्रीक असें म्हणतात. ग्रीस देश युरोपांत फार मागासलेला असा आहे व शेती, उद्योगधंदे, कारखाने या बाबतींत आपल्याला या देशापासून शिकण्यासारखें कांहीं नाहीं. हा देश पाहण्याचा हेतु वेगळा आहे.

आपण आज जिला पाश्चात्य सुधारणा किंवा संस्कृति म्हणतो, तिचें उगमस्थान ग्रीस आहे. इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी वगैरे अलीकडचीं सुधारलेलीं युरोपीय राष्ट्रें जेव्हां रानटी अवस्थेंत होतीं, तेव्हां ग्रीसचा भरभराटीचा काळ होता, ग्रीक शहरें सधन होतीं, तेथील राज्यव्यवस्था उत्तम होती व कलाकौशल्य, वाङ्मय, तत्त्वज्ञान यांत ग्रीसनें प्रावीण्य मिळविलें होतें.

---

**नोट**—सदर प्रकरण कै. वा. सहकारी कृष्ण यांच्या एका लेखाच्या आधारानें लिहिलें आहे.

ग्रीस देशांत युरोपांतील इतर देशांप्रमाणें धुक्याचें किंवा थंडीचें साम्राज्य नाहीं. तेथें सूर्यप्रकाश भरपूर परंतु सुखावह असतो. हवा इतकी मोकळी असते कीं, तेथें फार लांबवरचें-अनेक मैलापर्यंत स्वच्छ दिसतें व माणसाच्या दृष्टीच्या टप्प्यांत भोंवतालचा विस्तृत भूप्रदेश एकदम येतो. ग्रीसच्या तिन्ही बाजूस निळसर समुद्राचा वेढा असून सर्व प्रदेश डोंगराळ आहे. जिकडे जाल तिकडे उंच बर्फाच्छादित शुभ्र डोंगर आणि हिरव्यागार दऱ्या व खोरीं. या डोंगराळ प्रदेशांत अनेक वाटांनीं समुद्र आंत घुसला आहे. जणूं काय समुद्र व पर्वत लपाछपीचा खेळच खेळत आहेत. उंच शुभ्र पर्वत, हिरव्या दऱ्या, निळसर समुद्राचे आंत पसरलेले फाटे, पिंवळसर ऑलिव्ह झाडांनीं भरलेलीं मैदानें व या सर्वांवर व भोंवतीं स्वच्छ मोकळें वातावरण. याप्रमाणें ग्रीस म्हणजे विविध रंगाचा एक सुंदर गालिचा आहे.

या सुंदर देशाची रचनाच अशी आहे कीं, तेथें राहणाऱ्या माणसांना भव्य व सुंदर विचार सुचावेत आणि त्यांच्या हातून भव्य व सुंदर अशीं कार्यें घडावींत. प्राचीनकाळचे ग्रीक लोक अशाच प्रकारचे होते. ते सौंदर्य व भव्यता या गुणांचे उपासक होते. आपलीं शरीरें सुंदर व भव्य असावींत व दिसावींत असे त्यांचे प्रयत्न असत. यासाठीं स्त्रीपुरुष पद्धतशीर व्यायाम घेत. ग्रीक कारागिरांनीं भव्य व सुंदर असे पुतळे घडविले, त्यांपैकीं कांहीं अद्यापि आपल्या दृष्टीस पडतात. ग्रीकांनीं देवळें, सभागृहें व क्रीडांगणें भव्य व सुंदर अशीं बांधलीं. त्यांनीं सुरू केलेला शिल्पकलेचा विशिष्ट सांप्रदाय आजही जगमान्य असून सर्वत्र त्याचें अनुकरण होत आहे.



"ग्रीक पद्धतीची पॅरिस येथील 'पँथियान' नांवाची इमारत"



ॲक्रॉपोलिस-ग्रीस.

अथेन्स राजधानीशेजारी ॲक्रापोलीस नांवाची एक उंच टेकडी आहे. तिच्यावर अद्यापि ग्रीक शिल्पकलेच्या उत्तम नमुन्यांचे अवशेष दृष्टीस पडतात व ते पाहण्यास जगांतील सर्व देशांतील लोक तेथें भक्तिभावानें जात असतात. पार्थेनन नांवाचें खांबाऐवजीं संगमरवरी स्त्रियांचे पुतळे असलेलें दुसरें देवालय, ॲथीना नांवाच्या युद्ध-



ग्रीसमधील खांबाऐवज सुंदर स्त्रियांचे पुतळे असलेलें देवालय.

देवतेचा भव्य आडतीस फूट उंचीचा संगमरवर व सोनें यांचा बनविलेला भव्य पुतळा, वगैरे अनेक शिल्पकृतींचे अवशेष ॲक्रापोलिसवर पाहण्यासारखे आहेत.

ग्रीक वाङ्मयांत आदिकवि होमर हा प्रसिद्ध आहे. यानें इलियड नांवाचें आपल्या रामायणासारखें एक महाकाव्य लिहिलें. हा

आंधळा होता, असें म्हणतात. ग्रीक तत्त्ववेत्ते साक्रेटिस, प्लेटो व ॲरिस्टॉटल यांचीं नांवें सर्वश्रुत आहेत. साक्रेटीसनें मनुष्यप्राण्याचें ज्ञान किती अल्प आहे, वास्तविक तो किती अज्ञानी आहे, हें प्रश्नोत्तरपद्धतीनें जन्मभर सिद्ध केलें.त्याचा शिष्य प्लेटो याचे सृष्टीच्या उत्पत्तीविषयींचे विचार वेदांताशीं जुळतात. त्याची भाषा काव्यमय व प्रासादिक आहे. त्याचा शिष्य ॲरिस्टॉटल ह्यानें त्या वेळीं ज्ञात असलेल्या तत्त्वज्ञान,नीतिशास्त्र, राजकारण,तर्कशास्त्र, ज्योतिष वगैरे सर्व शास्त्रांवर ग्रंथ लिहिले, इतका तो जाडा विद्वान् होता.



ग्रीसचा वाल्मीकि आंधळा होमर

त्याच्या ग्रंथांना युरोपखंडांत इतका मान मिळत असे कीं, पंधरा शतकें त्यांना युरोपांतील विद्वान् लोक वेदवाक्यांप्रमाणें प्रमाण मानीत. ॲरिस्टॉटलच्या मतांविरुद्ध बोलणें किंवा लिहिणें हा सोळाव्या शतकापर्यंत युरोपांत गुन्हा समजला जात असे.

वक्तृत्वकलेमध्यें डिमॉस्थेनीस हा ग्रीक वक्ता प्रसिद्ध आहे. शौर्यांतही प्राचीन ग्रीक कोणास हार गेले नाहींत. त्यांच्या लिओनिडास नांवाच्या योद्ध्यानें अवघ्या चौदाशें जवानांच्या मदतीनें थर्मापिली नांवाच्या खिंडींत त्या वेळीं अजिंक्य गणलेल्या इराणी साम्रा-

ज्याच्या अफाट सैन्याशीं टक्कर दिली. प्रसिद्ध ग्रीक बादशहा आलेक्झांडर याचें नांव कोणास माहीत नाहीं ? त्यानें वयाच्या बत्तीस वर्षांत ग्रीसपासून पंजाबपर्यंतचीं सर्व राज्यें पादाक्रांत केलीं. जिंकण्यास यापुढें राज्यें उरलीं नाहींत म्हणून त्याच्या डोळ्यांना पाणी आलें असें म्हणतात.

ग्रीस देशांत डोंगराच्या पायथ्याला खोऱ्यांत वसलेलीं अनेक शहरें होतीं. एका खोऱ्यांतून दुसऱ्या खोऱ्यांत जाण्यास सोईचे रस्ते नव्हते. यामुळें आपसांत फारसें दळणवळण होत नसे. प्रत्येक शहर व त्याच्या आसपासचा पांच दहा मैलांच्या टापूंतला प्रदेश स्वतंत्र व स्वयंपूर्ण असा असे. प्रत्येक शहर म्हणजे एक राज्य असे. सर्व जाणते शहरवासी संध्याकाळीं सभागृहांत एकत्र जमत व आपल्या शहरापुरते कायदे करीत आणि युद्ध किंवा तह करणें वगैरे गोष्टी ठरवीत. याप्रमाणें हीं जुनीं नगर–राज्यें खरोखरीचीं लोकसत्ताक होतीं व लोकसत्ताक राज्यपद्धतीचा धडा त्यांनींच युरोपखंडाला दिला.

राज्यकारभाराच्या बाबतींत जरी शहराशहरांचा एकमेकांशीं संबंध येत नसे, तरी राष्ट्रीय खेळांच्या सामन्यांत सर्व शहरें मनापासून भाग घेत. हे सामने आलिंपिया नांवाच्या एका विस्तीर्ण मैदानांत चार वर्षांतून एकदां होत असत. चार वर्षांच्या या कालाला एक आलिंपिआड असें म्हणत व त्यावरून ग्रीकलोक कालगणना करीत. यावरून ग्रीकलोक खेळांना व शरीरसौष्ठवाला किती महत्त्व देत असत हें दिसून येईल. या आलिंपिया मैदानाच्या मध्यभागीं ग्रीक देवता झ्यूस् याचें सुंदर देवालय असून भोंवतीं विस्तृत स्नानगृहें, कुस्त्यांचे आखाडे, सभागृहें, स्वयंपाकगृहें वगैरे शोभिवंत इमारती होत्या व मैदानाच्या निरनिराळ्या भागांत पळणें, घोडदौड करणें, घोड्यांचे रथ चालविणें, उड्या मारणें, भाला फेंकणें, कुस्त्या खेळणें,

बॉक्सिग (एकमेकाला ठोसे मारण्याचा खेळ) करणें वगैरे अनेक प्रकारच्या खेळांचे सामने होत व विजयी वीरांना कुमारिकांनीं मुद्दाम विणलेले सुंदर झगे घालण्यांत येत. हे सामने झ्यूस देवतेच्या प्रीत्यर्थ होत असत. कारण, मनाप्रमाणें शरीरही सुदृढ व चपळ ठेवणें हें एक धार्मिक कर्तव्य आहे, असें ग्रीकलोक मानीत असत. अलीकडे युरोपांत जगांतील सर्व खेळाडूंसाठीं अनेक खेळांचे सामने सुरू झाले आहेत. त्यांनाही जुन्या ग्रीक सामन्यांच्या सन्मानार्थ ऑलिंपिआचे खेळ असें म्हणतात.

आतां आपण प्राचीन ग्रीसकडून अर्वाचीन ग्रीसकडे वळूं. दऱ्याखोऱ्यांत राहणारा अर्वाचीन ग्रीक प्राचीन काळच्या ग्रीकांसारखाच स्वातंत्र्य व समता यांवर प्रेम करणारा आहे. ग्रीसमध्यें मालक आपल्या नोकरांशीं बरोबरीच्या नात्यानें हस्तांदोलन करितो व त्यांत त्याला कमीपणा वाटत नाहीं. श्रीमंत ग्रीक मनुष्य रस्त्यानें बुटाला पॉलिश करीत फिरणाऱ्या गरीब माणसाबरोबर निःशंकपणें हस्तांदोलन करतो.

समुद्र किनाऱ्यावर रहात असल्यानें ग्रीक लोक पूर्वींपासूनच दर्यावर्दी आहेत. प्राचीन काळापासून भूमध्यसमुद्रावरील वाहतुकीचा व इतर व्यापार ग्रीक लोकांच्या ताब्यांत आहे. भूमध्य समुद्रावरील प्रत्येक बंदरांत मालानें भरलेलीं ग्रीक जहाजें हटकून आढळावयाचींच. या समुद्रालगतच्या सर्व शहरांमध्यें मोठमोठ्या ग्रीक पेढ्या व दुकानें आहेत. असें म्हणतात कीं, स्वदेशापेक्षां परदेशांत ग्रीक लोकांची संख्या अधिक आहे.

समुद्रावर फार सावधपणें रहावें लागतें. वारा केव्हां जोरानें सुटेल, केव्हां पडेल, वादळ केव्हां होईल इकडे दर्यावर्दी माणसांना नेहमीं लक्ष द्यावें लागतें. समुद्रावरील अनुभवामुळें ग्रीक लोक चाणाक्ष व दक्ष बनले आहेत. व्यापारांत ते इतके हुशार आहेत कीं, एक ग्रीक

दोन ज्यूंच्या तोडीचा असतो अशी युरोपांत म्हण आहे. ज्यू लोक हे युरोपांतले मारवाडी आहेत असें म्हटलें तरी चालेल. त्याचप्रमाणें नेहमीं या बंदरांतून त्या बंदरांत असें भटकत रहावें लागत असल्यानें ग्रीक लोकांना एके ठिकाणीं स्वस्थ बसणें अगदीं आवडत नाहीं. ती एक त्यांना शिक्षाच वाटते. त्यांच्या पायावर जणूं काय भोंवराच आहे. शरीराबरोबरच त्यांच्या मनाची वृत्तिही चंचल बनली आहे. जीभ तर सकाळपासून संध्याकाळपर्यंत सारखी चुरू चुरू चालू असते. ग्रीक लोकांच्या गळ्यांत एक मण्यांची माळ असते. त्यांची टकळी सुरू असतां हाताचीं बोटें मण्याशीं खेळत असतात.

ग्रीक माणसें फार चौकस-फाजील चौकस म्हणाना—असतात. त्यांना बारिक सारिक प्रत्येक गोष्टीची माहिती पाहिजे असते. तुम्ही त्यांच्या तडाख्यांत सांपडलांत कीं, ते तुमच्यावर प्रश्नांचा भडिमार सुरू करितात. प्रश्न विचारणें हा त्यांचा मनोधर्मच बनून गेला आहे. कांहीं नाहीं तर ग्रीक मनुष्य तुम्हांला "तुम्हीं केंस कापले त्या न्हाव्याचें नांव काय?" "तुम्हीं तुमचा बूट पॉलिश केव्हां केला?" अशासारखे निरर्थक प्रश्न विचारील पण स्वस्थ बसणार नाहीं.

ग्रीक लोकांना खेडेगांवांत किंवा एकांतांत राहणें आवडत नाहीं. कोठून आवडणार? तेथें चकाट्या पिटावयाला दुकानें, हॉटेलें कोठून असणार? तथापि शेतकऱ्यांना अर्थात् आपल्या शेतावरच राहावें लागतें.

ग्रीसमध्यें मुख्य दोन गोष्टी पिकतात. करंट नांवाचीं लहान बिनबियांचीं द्राक्षें व ऑलिव्ह फळझाडें. या दोहोंचे तेथें मोठाले मळे असतात. हजारों स्त्रिया, पुरुष व मुलें द्राक्षें खुडण्यांत मळ्यांत गुंतलेलीं असतात. हीं द्राक्षें आधीं उन्हांत चांगलीं वाळवून सुकवितात व मग पेटाऱ्यांत बंद करून बंदरावर परदेशांत पाठविण्यासाठीं

रवाना करितात. ग्रीसला करंटपासून दरसाल लाखों रुपये मिळतात. ऑलिव्ह खाण्यास चांगलें लागतें. त्याच्यापासून तेलही निघतें. या तेलाशीं लावून ग्रीक लोक भाकर खातात. स्वीस लोकांप्रमाणें त्यांना दूध, लोणी किंवा चीज मिळत नाहीं. कारण, तेथें फारसें गवत उगवत नसल्यानें कोणी गुरें पाळीत नाहींत. ग्रीक लोक घरीं फक्त अन्न शिजवितात. भाकरी भाजणें, मांसाची आमटी तयार करणें, मासे तळणें वगैरे भटाऱ्याच्या दुकानांतून पैसे देऊन करून घेतात. भटाऱ्याला कापलेले मासे, मांसाचे तुकडे, कांदे, कणीक वगैरे पदार्थ नेऊन द्यावे, म्हणजे तो सर्व पदार्थ तयार करून देतो.

ग्रीसमध्यें सकाळीं रस्त्यानें गवळी पुष्कळ बकऱ्या घेऊन घरोंघर फिरतांना दिसतात. घरांतील मोलकरीण आपल्या समक्ष त्याच्याकडून दूध काढून घेते. ग्रीसमध्यें गाई नसल्यानें लोक बकरीचें दूध पितात.

ग्रीक लोकांना मध फार आवडतो. हिमिटसचा मध फार प्रसिद्ध आहे. मधमाशा हिमिटस नांवाच्या पर्वतावर उगवणाऱ्या पिंवळ्या फुलांतील मधाचा पोळ्यांत संग्रह करितात म्हणून मधाला असें नांव पडलें आहे. ग्रीसमध्यें सुगंधी व मधानें भरलेलीं अनेक फुलें फुलत असल्यानें मधही विपुल असतो. रस्त्यानें म्हाताऱ्या बाया झाडाच्या फांदीला लागलेलें मधाचें पोळें विकीत असतांना दृष्टीस पडतात.

ग्रीसमध्यें मधाप्रमाणेंच नारिंगें व अंजिरें रस्त्यानें फार थोड्या किंमतींत विकत मिळतात. लहान पोरें गाढवावर हीं फळें लादून रस्त्यानें विकीत फिरतात. रस्त्यानें वस्तू विकत फिरण्याची चाल तेथें फार आहे. तुम्ही ग्रीक शहरांत रस्त्यानें करमणुकीसाठीं निघा. तुम्हांला कोणी एकांत एक ओवून माळा केलेले कांदे व लसूण विकतांना दिसतील, तर कोणी लेमोनेड व मिठाई घेऊन फिरतांना

आढळतील. कोणी कोंबड्यांचा तांडाच्या तांडा घेऊन घरोघर हिंडतांना दिसतील. घरांतील बाया कोंबडें हातांत घेऊन चांगलें निरखून हातानें दाबून पाहातात व पसंत पडेल तें विकत घेतात. बुटाला ठिगळे लावणारा चांभार आपल्या इकडल्या सारखाच रस्त्यांत आपली कामगिरी करीत असतो. पण रस्त्यांत हटकून आढळणारा मनुष्य म्हणजे बुटांना पॉलिश करणारा. ग्रीक लोकांना बूट यत्किंचित् मळलेले खपत नाहींत. दिवसांतून दोनदोन चारचारदांसुद्धां ते आपल्या बुटांना पॉलिश करून घेतात. त्यांचे बूट इतर युरोपियन लोकांप्रमाणें नसतात. ते बहुधा लाल रंगाचे असून त्यांचें टोंक पुणेरी जोड्याप्रमाणें वर मुरडलेले असतें व त्यावर काळ्या रंगाचा एक ऐटदार गोंडा लाविलेला असतो.

इतर पोशाखाच्या बाबतींतही ग्रीक लोक इतर युरोपियन लोकांहून वेगळ्या प्रकारचे दिसतात. ते गुडघ्यापर्यंतच्या तंग विजारी घालतात व अंगांत गुडघ्यापर्यंत घोळाच्या अंगरख्यावर कशिदाकाम केलेलें जाकीट घालतात. डोक्याला कानटोपीवजा तांबड्या रंगाची टोपी असून तिला लांबलचक गोंडा लटकत असतो.



"अलीकडील ग्रीक पुरुष"

व्यापारांत पैसे मिळवून आधुनिक ग्रीक राष्ट्र सधन होत आहे. शिक्षणाकडेही त्याचें चांगलें लक्ष आहे. परंतु पूर्वजांची असामान्य बुद्धिमत्ता, कलाकौशल्य व पराक्रम त्यांच्याजवळ नाहींत. तें पूर्वजांच्या बरोबरच विलय पावलें.

---

## प्रकरण १५ वें

# मेंढरांच्या देशांतील आस्ट्रेलियन लोक

आतां आपण एका वेगळ्याच खंडाकडे वळूं. आपल्या देशाच्या आग्नेयीस आस्ट्रेलिया या नांवाचा देश आहे. हा देश जगांतील सर्वांत मोठें बेट आहे. आस्ट्रेलिया व त्याच्या भोंवतालचीं लहानसान बेटें मिळून आस्ट्रेलेशिया या नांवाचें एक वेगळेंच खंड मानतात.

आस्ट्रेलियाचा शोध एका इंग्रज माणसानें केला व म्हणून हें बेट इंग्रजांच्या ताब्यांत गेलें. आरंभीं ब्रिटिश सरकार जन्मठेपेच्या कैद्यांना या बेटांत पाठवीत असे; परंतु पुढें आस्ट्रेलियाचा किनाऱ्यालगतचा प्रदेश वसाहत करण्यास योग्य आहे असें आढळून आल्यावर ब्रिटिश लोक तेथें येऊन राहूं लागले. तथापि या बेटाच्या विस्ताराच्या मानानें तेथें वस्ती फारच थोडी आहे. १९२१ सालीं आस्ट्रेलियाची लोकसंख्या फक्त चौपन्न लाख होती. म्हणजे एकट्या लंडन शहरांत जेवढीं माणसें राहतात तेवढीं या विस्तीर्ण देशांत आहेत. पूर्वेकडील किनाऱ्यालगतचा मुलुख सोडून दिला तर आस्ट्रेलियाच्या नऊ दशांशापेक्षां अधिक भागांत एका चौरस मैलाला दोन माणसें असें प्रमाण पडतें.

असें कां असावें बरें? या बेटांत वसाहती सुरू होऊन चांगलीं शंभर वर्षें झालीं. एवढ्या अवधींत अमेरिकेंत लाखों नवीन माणसें भराभर आलीं, त्यांनीं जंगलें तोडलीं, लागवड केली व शहरें वसविलीं. आज पूर्व किनाऱ्यापासून पश्चिम किनाऱ्यापर्यंत अमेरिकेंत मुंग्यांसारखीं माणसें पसरलीं आहेत. आस्ट्रेलियांत याप्रमाणें वस्ती न होण्याचें कारण म्हणजे समुद्र किनाऱ्याचा टापू सोडून दिला तर हें बेट म्हणजे एक भलें जंगी रखरखित वाळवंट आहे व त्यांत

इतकी उष्णता आहे कीं थंड हवेंत वाढलेल्या युरोपियन लोकांना तेथें राहतां येत नाहीं. या विस्तीर्ण प्रदेशांत अतिशय थोडा पाऊस पडतो व नद्याही नाहींत.

अशा परिस्थितींत वसाहत करण्यास गेलेले लोक समुद्र किनाऱ्यालाच चिकटून बसले असल्यास नवल नाहीं. या अरुंद भागांतच त्यांनीं मोठमोठीं शहरें वसविलीं व उद्योगधंदे चालविले. या लोकांचा मुख्य धंदा मेंढरें पाळून त्यांचीं लोंकर व मांस विकण्याचा आहे. जगांत जितक्या मेंढया आहेत त्याच्या एक षष्ठांश एकट्या आस्ट्रेलियांत आहेत. १९१९ सालीं तेथें आठ कोटी चाळीस लक्ष मेंढया होत्या. एकजणानें असा हिशेब केला आहे कीं आस्ट्रेलियांतील सर्व मेंढया एकत्र करून त्यांच्या चार रांगा केल्या व त्यांना विषुववृत्तावर उभें केलें तर सर्व पृथ्वीभोंवतीं हा जिवंत लोकरीचा चौपदरी पट्टा होईल. वसाहतवाले येण्यापूर्वीं या बेटांत मेंढया नव्हत्या. वसाहतवाल्यांना पूर्व व दक्षिण भागांत एक बारीक जातीचें गवत वाढलेलें दिसलें. पाऊस कमी पडला तरी गवत उगवायाचेंच व जमीन सुपीक नसली तरी ती गवताला चालते. वसाहतवाल्यांच्या हें ध्यानांत येतांच त्यांनीं युरोपमधून चांगल्या जातीचें गवत आणून लाविलें व स्पेनमधून मेरिनो नांवाची पुष्कळ लोंकर येणाऱ्या मेंढरांची जात आणिली व तिची पैदास केली. याप्रमाणें परिस्थिति पाहून त्यांनीं आपला धंदा ठरविला व त्यावर ते सधन व सुखी झाले.

आपल्या इकडे एका धनगरापाशीं फार तर शंभर दोनशें मेंढरें असतील. आस्ट्रेलियांत कित्येक श्रीमंत धनगरांजवळ एक एक लाख मेंढरें आहेत. यांना 'धनगर राजे' म्हणतात. धनगर म्हटलें म्हणून हे आस्ट्रेलियन लंगोटी लावून घोंगडी पांघरून मेंढरांच्या मागें फिरणारे अडाणी लोक असतील असें कोणीं समजूं नये. हे

चांगले शिकले सवरलेले आहेत. ते चांगले भारी कपडे घालतात, छानदार बंगल्यांत राहतात व स्वतःच्या मोटार गाड्यांत फिरतात. पण आपण एका धनगराच्या घरींच जाऊं या म्हणजे आपल्याला या लोकांच्या राहणीची माहिती होईल.

चला आपण आगगाडींत बसून जाऊं. आपल्या इकडच्या सारखेंच उकडत आहे. तरी पण तहान लागली तरी काळजी नको. आगगाडीच्या डब्यांना बाहेर पाण्यानें भरलेल्या क्यानव्हासच्या पिशव्या टांगल्या आहेत त त्यांच्याजवळच पिण्याचे प्यालेही आहेत. किती छान सोय ही ! आपल्या सदर्न मराठा रेल्वेवर अशी सोय झाल्यास किती बरें होईल. खिडकींतून पहा. कसे मधून मधून गव्हाचे मळे दृष्टीस पडतात. गव्हाला पाऊस कमी लागतो. इकडचे शेतकरी दहा इंचांपेक्षा कमी पावसावर भरपूर गव्हाचें पीक काढितात. खिडकींतून दिसणारें एक ठराविक दृश्य म्हणजे मेंढया. दृष्टि पोहोचेल तितक्या लांबवर अगदीं क्षितिजापर्यंत बघा मेंढयाच मेंढया. हा मेंढयांचाच देश. तेव्हां त्यांत नवल कसलें. चला, आलें स्टेशन. ते पहा आपले धनगर स्नेही प्लॅटफार्मवर आपल्याला नेण्यासाठीं उभे आहेत. त्यांनीं आपल्याला नेण्यास स्वतःची मोटार आणली आहे. बसा मोटारींत.

हें पहा आपण आपल्या स्नेह्याच्या घरीं येऊन पोहोंचलों. काय म्हणतां? हें तर एक लहानसें गांवच आहे? होय. तें खरेंच. हीं सारीं घरें आपल्या मित्राचीं आहेत. तो मध्यें मोठा बंगला दिसतो त्यांत तो राहतो. किती बळकट घर आहे पहा. बंगल्याभोंवतीं दिसतात त्या कचेरी, कोठारें, लोहार, सुतारकाम वगैरे अनेक कामांच्या इमारती आहेत. या बाकीच्या घरांत आपल्या मित्राचे नोकर राहतात. आपल्या मित्राच्या बंगल्याच्या मागें क्रिकेट, गॉल्फ व क्रोके खेळण्याचीं पटांगणें आहेत. हे आस्ट्रेलियन लोक

खेळांचे फार शोकी. प्रत्येक आस्ट्रेलियन स्त्री व पुरुष आठवड्यांतून कांहीं वेळ खेळण्यांत घालवितात. त्यांच्या प्रत्येक शहरांत क्रिकेटचीं अनेक पटांगणें आणि करमणुकीच्या खेळांसाठीं कितीतरी उपवनें असतात. आपला धनगर मित्र शहरांपासून शेकडों मैल लांब कुरणांत राहतो. त्याला व त्याच्या नोकरचाकरांना खेळण्यास इतक्या लांब कसें जातां येईल? त्यांना खेळण्याची घरींच सोय केली पाहिजे.

घरांवर लोखंडाचे हौद पहा कसे आहेत. ते पाणी साठविण्यासाठीं केले आहेत. येथें पाऊस थोडा पडतो. तेव्हां पावसाचें पाणी वायां जाऊं न देतां तें साठवून ठेवण्याची ही युक्ति आहे. आपल्याकडे गुजराथमध्यें कांहीं ठिकाणीं गच्चीवर पावसाचें पाणी धरून ठेवण्यासाठीं चुन्यानें बांधून काढलेले अशा प्रकारचे हौद असतात.

आपल्या धनगर यजमानाच्या मालकीचें पन्नास साठ मैलांचें मोठें कुरण आहे. याच्या भोंवतीं तारांचें कुंपण घातलेलें आहे. कुंपणाच्या आंत जिकडे तिकडे मेंढरें पसरलीं आहेत. हाच त्यांचा कोंडवाडा. कुरणातलें गवत घ्यावें, ठिकठिकाणीं पाणी ठेवलें असतें तें प्यावें व कुरणांतच झोपीं जावें असा त्यांचा क्रम असतो. मेंढरें राखणारे नोकर घोड्यांवर बसून फिरत असतात. एवढ्या मोठ्या कुरणांत व इतकीं मेंढरें राखण्यास पायीं चालून कसें जमणार. कांहीं धनगरांचीं कुरणें तर इतकीं मोठीं असतात कीं त्यांच्या भोंवतीं घोड्यावरून फिरण्यास सुद्धां कित्येक दिवस लागतात. कुरणें मोठमोठीं असल्यामुळें आस्ट्रेलियन लोकांचे घोड्यावांचून चालत नाहीं. ते घोडयांची फार चांगली पैदास करितात. व्हेलर नांवाच्या एका जातीचे आस्ट्रेलियन घोडे मजबूत व देखणे असतात. १९१९ सालीं या देशांत पंचवीस लाख घोडे होते.

कोळ्यांचीं मुलें जशीं समुद्रांत लहानपणापासून निःशंकपणें होडी घेऊन जातात तशीं आस्ट्रेलियन मुलें बेलाशक खोगीर न घालतां घोडयांच्या उघडया पाठीवर बसतात व लगाम न लावतां त्यांना वाटेल तिकडे दामटीत नेतात. घोडयांना तबेला लागत नाहीं. ते खुशाल कुरणांत चरत हिंडतात.

राखणदार फार चपळ व हुशार असावे लागतात. त्यांना अनेक कामें करितां आलीं पाहिजेत. घोड्यावर चांगलें बसतां आलें पाहिजे, हजारों मेंढरें भरभर मोजतां आलीं पाहिजेत, त्यांना एका ठिकाणीं जमवितां आलें पाहिजे, त्यांचें दुखलें खुपलें ओळखतां आलें पाहिजे व त्यावर इलाज करितां आला पाहिजे. त्यांना मेंढरें धुतां आलीं पाहिजेत, भादरतां आलीं पाहिजेत व कापतांही आलीं पाहिजेत.

वीस पंचवीस मैल म्हणजे आस्ट्रेलियन धनगरांच्या खिजगणतींत जमा नाहीं. त्यांचीं मुलें क्रिकेट खेळण्यास खुशाल दहा मैल जातात व परत येतात. मुली आपल्या मैत्रिणींच्या घरीं बसण्यास सहज वीस मैल जातात. अर्थात हें सारें घोडयांवर. अलीकडे मोटारीही वापरतात. आतां एका धनगराच्या घरापासून पन्नास साठ मैल राहणाऱ्या दुसऱ्या धनगरांच्या घरांपर्यंत टेलिफोनची सोय आहे व आपला स्नेही लांब राहणाऱ्या आपल्या मित्रांबरोबर आपल्या खोलींत बसल्या बसल्या बाजारभाव व सटर फटर गोष्टींची चर्चा करूं शकतो. तसेंच त्याच्या घरीं बिनतारेचें रेडियो यंत्र आहे. या यंत्रांतून त्याला सिडने, मेलबोर्न वगैरे शेकडों मैल लांब असलेल्या शहरांतील चाललेलें गायन व व्याख्यान घरबसल्या ऐकतां येतें.

सर्वच धनगरांपाशीं हजारों मेंढरें असतात असें नाहीं. पुष्कळांजवळ थोडींच मेंढरें असतात. आज एक लाख मेंढरांचा जो धनी

आहे तो किंवा त्याचा बाप आरंभीं अगदीं गरीब असेल. त्यांच्यापाशीं दोनतीनशें मेंढरें, आठदहा घोडे व दोन तीन राखणे एवढींच असतील. बहुतेक धनगर राजांचा मूळचा इतिहास असाच आहे. सरकारला त्या निर्जन प्रदेशाची वसाहत करावयाची होती. म्हणून सरकारनें नांवाला थोडीशी किंमत घेऊन समुद्रालगतच्या जमिनी आरंभींच्या वसाहतवाल्यांना देऊन टाकल्या. मेंढरें जसजशीं वाढत गेलीं तसतसा मेंढवाडाही मोठा होत गेला व धनगर हळूहळू भीत भीत समुद्रापासून दूर दूर पसरत गेले.

भीत भीत म्हणण्याचें कारण मागें दिलें आहे. या लांबच्या टापूंत पाऊस पडतो व जमीनही चांगली आहे. परंतु केव्हां अवर्षण पडेल याचा नेम नाहीं. अवर्षण पडलें म्हणजे मेंढरांना खाण्यास गवत व पिण्यास पाणी मिळत नाहीं व तीं पटापट मरतात. पंधरा वीस वर्षांपूर्वीं पांच वर्षें अवर्षण होतें. या काळांत आस्ट्रेलियांत सहा कोटी मेंढरें भुकेनें व तहानेनें व्याकूळ होऊन मेलीं. असें सांगतात कीं डोळ्यादेखत अशीं मेंढरें मरतांना पाहून कांहीं धनगरांना दुःखानें वेड लागण्याची पाळी आली. आस्ट्रेलियांत वस्ती कां वाढत नाहीं हें आतां दिसून येईल.

अवर्षणासारखेच मेंढरांचे दुसरे शत्रु म्हणजे ससे, कांगारू, एनु वगैरे प्राणी. हे कुरणांतलें गवत खातात व मग मेंढरांना उपाशी राहण्याची पाळी येते. कांगारू हा आस्ट्रेलियांतच आढळणारा एक विचित्र प्राणी आहे.



"कांगारू"

मादीच्या पोटाला एक पिशवी असते व ती पिल्लाला मोठा होईपर्यंत तिच्यांत लपवीत असते. एनु हा शहामृगासारखा पण लहान आकाराचा प्राणी आहे. आस्ट्रेलियन धनगर या प्राण्यांची शिकार करून यांना मारून टाकतात.

अवर्षणानें मेंढरें मरूं नयेत म्हणून अलीकडे या लांबच्या प्रदेशांत ठिकठिकाणीं यंत्रानें जमिनींत हजारों फूट खोल भोंक पाडतात व पंपानें पाणी वर आणितात. अशा विहीरींना आसियन विहीरी म्हणतात. या विहीरींमुळें आतां पाण्याची बरी सोय होत चालली आहे.

त्याचप्रमाणें नद्यांना बांध घालून पाणी अडवून तें बारा महिने टिकवावयाचें व त्याचें पाट काढून तें शेतीकरितां व मेंढरांकरितां लांबवर न्यावयाचें असे प्रयत्न आस्ट्रेलियन सरकार अलीकडे करीत आहे. या प्रयत्नांत त्यांना चांगलें यश मिळाल्यास आस्ट्रेलियाचें स्वरूप पालटेल. तेथील पुष्कळशी जमीन लागवडीखालीं येईल व लोकसंख्याही बरीच वाढेल.

आस्ट्रेलियन लोकांनीं स्पेनमधून मेरिनो नांवाची मेंढराची जात आणून तिचीच पुढें वाढ केली हें मागें सांगितलेंच आहे. या मेंढरांना फार लोंकर असते. कांहीं कांहीं मेंढरांवर तर वीस शेरांपर्यंत लोंकर येते व ते लोंकरीच्या एकाद्या गठ्ठयासारखे दिसतात. लोंकरीच्या भारानें त्यांच्या अंगाच्या वळकट्या पडतात. डोक्यावरची लोंकर इतकी दाट असते कीं, कानाचीं फक्त टोकें बाहेर दिसतात. व डोळ्याच्या ठिकाणीं दोन खोल भोकें दिसतात. आपण त्यांच्या लोंकरींत हात खुपसला तर मनगटापर्यंत आंत गेला तरी हाताला मांस लागत नाहीं. या अशा एका मेंढीची किंमत सहा सात हजार रुपये येते. सर्वच मेंढ्यांवर इतकी लोंकर निघत नाहीं. तरी ८।१० शेर तर निघतेच निघते. आस्ट्रेलियाचें मुख्य उत्पन्न लोंकरीचें आहे.

तेव्हां मेंढीवर जितकी जास्त लोंकर येईल तितकें मालकाचें उत्पन्न जास्त. यामुळें मेंढरांची चांगली निपज करण्याकडे आस्ट्रेलियन सरकारचें फार लक्ष आहे. दरवर्षीं सिडने शहरांत मेंढरांचें प्रदर्शन भरतें. व त्यांत चांगल्या मेंढरांना सर्टिफिकेटें व बक्षिसें दिलीं जातात. या प्रदर्शनासाठीं सर्व ऑस्ट्रेलियांतून धनगर आपलीं निवडक मेंढरें घेऊन येतात. प्रदर्शनांत प्रसंशापत्र मिळणें हा मोठा मान समजतात, व त्यासाठीं धनगर मंडळी नेहमीं झटतात.

मेंढ्यांच्या अंगावरील लोंकर कापावयाचा दिवस म्हणजे धनगरांचा मोठा महत्त्वाचा दिवस होय. सर्वजण सकाळींच उठतात. कामाला सहा वाजतां सुरवात होते. पण त्यापूर्वी एंजिनवाले एंजिन साफ करण्यांत व त्यांत तेल घालण्यांत गुंतलेले असतात. मॅनेजर इकडे तिकडे धांवपळ करून सर्व व्यवस्थित आहे कीं नाहीं हें पाहत असतो. राखणदार पोरें आपापल्या ताब्यांतील मेंढरें आणण्याच्या तयारींत असतात. त्यांच्या हाताखालचे सांगकामे जें पडेल तें काम करण्यास उभे असतात.

आजकाल वाफेच्या किंवा विजेच्या साहाय्यानें चालणाऱ्या यंत्रानें मेंढयांची लोकर काढतात. हें यंत्र दंतवैद्य ज्या प्रकारच्या यंत्रानें दांत साफ करतो त्याप्रकारचें असतें. प्रत्येक यंत्राजवळ एकजण उभा असतो. हातांत नवी मेंढी आली कीं तो यंत्र सुरू करतो. कात्रीनें भराभर सर्व लोंकर कातरली जाते. ताबडतोब तो मनुष्य त्या मेंढीला दुसऱ्याजवळ देऊन नव्या मेंढीला घेतो व आपलें काम सुरू करितो. कधीं चुकून कातरतांना मेंढीला जखम होते. त्यासाठीं Tar-boys म्हणजे 'डांबरीं पोरें' म्हणून ओळखलीं जाणारीं मुलें डांबर घेऊन तयार असतात. ते जखमेवर डांबर लावितात. याप्रमाणें अंधार पडेपर्यंत काम चालतें. फक्त मध्यें दोनदां जेवावयाला व एकदोनदां विडीचे झुरके ओढावयाला सुटी मिळते.



''यंत्रानें लोंकर कापण्याची पद्धति''

मेंढयांची कापलेली लोंकर गोळा करणारीं वेगळीं माणसें असतात ते ती गोळा करून टेबलावर फेकतात. तेथें दुसरे लोक उभे असतात. ते लोंकरीच्या घड्या करून निवड करणाऱ्याकडे देतात. हा तज्ज्ञ असतो. तो भराभर लोंकरीच्या निरनिराळ्या जातींची निवड करून त्या अलग करितो. पायावरची व शेपटीवरची लोंकर वेगळ्या प्रकारची असते. पोटावरची वेगळ्या प्रकारची असते. शिवाय, कांहीं मेंढरांची लोंकर हलक्या दर्जाची असते, तर कांहींची वरच्या दर्जाची असते. लोंकरीची निवड झाल्यावर ती दाबून तिचे मोठमोठे गठ्ठे बांधतात, व त्यांवर मेंढराची जात, लोंकरीचा दर्जा, गठ्याचें वजन व मेंढवाड्याचें नांव इतके तपशील लिहितात. नंतर गठ्ठे जवळच्या बंदरावर रवाना होतात. याप्रमाणें कांहीं आठवड्यांत पन्नास हजारापासून दोन लाखापर्यंत मेंढरांची लोंकर कापली जाते.

बंदरावर लोंकरीचे गठ्ठे सांठवून ठेवण्याच्या मोठ्या टोलेजंग

वखारी असतात. एका एका वखारींत हजारों गठ्ठे असतात. प्रत्येक गठ्ठा आदमासे दोनशें शेर वजनांचा असतो. या वखारींतच मालाचा सौदा ठरतो. व्यापारी वखारींत येतात व गठ्ठयाला भोंक पाडून लोंकर चाचपून पाहतात व भाव करितात. हेच व्यापारी मग सगळा माल परदेशीं पाठवितात. आस्ट्रेलियाचा बहुतेक व्यापार इंग्लंडाशींच आहे.

ऑस्ट्रेलिया हा कुरणांचा देश असल्यानें मेंढराप्रमाणेंच तेथें गाईही पुष्कळ आहेत. १९१९ सालीं तेथें एकंदर एक कोटी तीस लक्ष गुरें होतीं. मेंढयांचें व गुरांचें मांस फार मोठ्या प्रमाणांत ऑस्ट्रेलियांतून बाहेर जातें. इंग्लंडमध्यें जें मांस रोज खातात त्यांतील बरेंच ऑस्ट्रेलिया पुरवितें. हें मांस बर्फांत घालून ठेविलेलें असतें. म्हणून कित्येक दिवसपर्यंत खराब होत नाहीं. मांस नेण्यासाठीं मुद्दाम वेगळ्या प्रकारचीं जहाजें तयार केलीं आहेत व त्यांत बर्फाच्या योगानें फार कमी उष्णतामान केलेल्या खोल्या असतात. यांत मांस, लोणी वगैरे पदार्थ नासूं नयेत म्हणून ठेवतात. ऑस्ट्रेलियाचा लोण्याचा व्यापारही दांडगा आहे. एकट्या न्यू साऊथ वेल्समध्यें १९०७ मध्यें २०९१४५ दुभत्या गाई होत्या. दूधदुभत्याचा व्यापार सहकारी तत्त्वावर चालविण्याचा ऑस्ट्रेलियांत उपक्रम सुरू आहे. बायरन बे या ठिकाणीं लोण्याचा सहकारी कारखाना आहे. तितका मोठा कारखाना जगांत कोठें नाहीं असें म्हणतात. रोज सकाळीं शेतकरी दुधावरच्या मलईचे अंदाजी पांचशें डबे या कारखान्यांत आणतात व आठवड्याला त्यांचें साठ टन लोणी तयार होऊन परदेशी जातें. दरमहा शेतकऱ्यांना विक्रीचे पैसे मिळतात. साधारणपणें शेतकऱ्यांना महिन्याचे ६८००० पौंड वाटले जातात. यावरून या कारखान्याच्या प्रचंड उद्योगाची कल्पना येईल.

## सोन्याच्या खाणी

ऑस्ट्रेलियामध्यें सोन्याचा धूर निघतो असें म्हणावयाला हरकत नाहीं. कारण त्याच्या पांची प्रांतामध्यें सोन्याच्या अनेक खाणी आहेत. एकट्या क्वीन्सलंड प्रांतांतच सुमारें दोन हजार खाणी आहेत. या प्रांतांत मौंट मार्गन नांवाचा जो डोंगर आहे. त्यांत सोनें व लोखंड हीं एकत्र मिसळलेलीं सांपडतात. मौंट मार्गन ही जगांत सर्वांत मोठी सोन्याची खाण आहे. क्वीन्सलंडच्या जमिनींत धुळीशीं मिसळलेलें इतकें सोनें आहे कीं, पाऊस पडून गेल्यावर मुलें गटारांत सोन्याचे कण वेचीत हिंडतात. तथापि सोन्याचा मुख्य प्रांत म्हटला म्हणजे व्हिक्टोरिया हा होय. या प्रांतांतील बहुतेक जमिनींत सोन्याचे कण आढळतात. असें म्हणतात कीं, व्हिक्टोरिया प्रांतांत असा कोणताच जमिनीचा तुकडा नसेल कीं, ज्याची माती सोन्यासाठीं हपापलेल्या लोकांनीं पांच दहादां चाळून गाळून पाहिली नसेल.

सोन्याच्या धंद्याला सुरवात बॅलारॅट या गांवीं झाली. या ठिकाणीं प्रथम मोठ्या प्रमाणांत सोनें सांपडलें. ही बातमी समजतांच धाडशी लोक सोन्याच्या आशेनें भराभर या प्रांतांत आले. आस्ट्रेलियाची जी थोडीबहुत आजवर वसाहत झाली आहे त्याचें कारण हें सोनेंच. शेंपन्नास मेंढ्या राखून अनेक वर्षे मेहनत करून लोंकर विकून पैसा मिळविण्याइतका सर्वांना दम कोठें होता ? ऑस्ट्रेलियांत सोनें सांपडतें. आपलें नशीब चांगलें असेल तर एखादी सोन्याची ढेप आपणांस सांपडेल व एका दिवसांत आपण कुबेर बनूं या आशेनें हजारों लोक ऑस्ट्रेलियांत राहण्यास गेले. ते प्रथम मेलबोर्न बंदरांत उतरून पायीं चालून बॅलारॅटला येत. बॅलारॅटच्या खाणीमुळें मेलबोर्न हां हां म्हणतां मोठें शहर बनलें. कांहींना सोनें मिळालें, कांहींना मिळालें नाहीं. ज्यांना एका दिवसांत कुबेर बनतां

आलें नाहीं ते "आतां परत जाण्यांत काय हाशील, येथेंच राहा झालें." असें म्हणून कायमचेंच तेथें राहिले व शेतीभाती करूं लागले, किंवा मेंढरें पाळूं लागले. आंगमेहनतीनें कांहीं वर्षांनीं हे लोक कुबेर नाहीं तरी बरेच सधन झाले.

बॅलारॅटमध्यें खणतां खणतां सोन्याचा एक एकूणपन्नास शेर वजनाचा ढेपा सांपडला व पुढें तर ब्याण्णव शेर वजनाचा ढेपा सांपडला. या ढेप्याला ऑस्ट्रेलियन लोकांनीं 'वेल्कम् नगेट' म्हणजे 'सुस्वागतम् ढेपा' असें नांव दिलें. हा ढेपा मेलबोर्नच्या सराफ कट्टयावर दीड लाख रुपयांना विकला गेला. बॅलारॅटच्या खाणींतील माती वर काढून ती चाळणींत घालतात व वर पाणी सोडतात. माती चाळणींतून गळून जाते व सोनें राहतें. त्याच्या तापवून विटा बनवितात. इतर कांहीं खाणी खडकांत सोनें असतें. या खडकाचा त्यावर जोरानें प्रहार करून-चुरा करतात. मग तो चुरा पाऱ्याच्या वाहत्या प्रवाहांत सोडतात. सोनें पाऱ्यांत मिसळून जातें व इतर द्रव्यें बाहेर पडतात. नंतर पारा व सोनें यांचें मिश्रण खूप तापवितात. या योगानें पाऱ्याची वाफ होऊन ती बाहेर पडते व भांड्यांत फक्त सोनें शिल्लक राहतें. त्याच्या मग लहान लहान विटा बनवितात.

बॅलारॅटची खाण खोदीत खोदीत अर्धा मैल खोल नेली आहे. इतक्या खोल जमिनीच्या पोटांत चोहोंकडे रस्त्यांचें जाळें केलें आहे व त्यांत घोड्याच्या ट्रामगाड्या इकडून तिकडे फिरत असतात. तेथें रात्रंदिवस विजेचे दिवे व पंखे चालू असतात.

बॅलारॅट खाणीच्या तोंडाशीं खनन शास्त्राचें कॉलेज आहे. या कॉलेजच्या ताब्यांत एक स्वतंत्र खाण आहे. शिक्षकांच्या देखरेखीखालीं विद्यार्थी खाणींत काम करितात. विद्यार्थीच सुरुंग लावून

खडक उडवितात व ज्या यंत्राच्या योगानें खडक खाणींतून वर येतात तीं यंत्रेंही तेच चालवितात. खाणीवरील खडकांचा चुरा करण्याचें, सोनें वेगळें काढावयाचें त्यांच्या विटा तयार करण्याचें वगैरे कामें कारखान्यांत विद्यार्थीच करितात.

पश्चिम ऑस्ट्रेलिया हें ओसाड, रुक्ष व रखरखीत वाळवंट आहे, हें मागें सांगितलेंच आहे. या प्रदेशांत शेंकडों मैल चालले तरी खडक व वाळू यांशिवाय दुसरें कांहीं दिसणार नाहीं. तथापि या खडकांत सोनें मिसळलेलें आहे व वाळूंत सोन्याचे कण आहेत. धाडसी माणसांनीं अशा या वाळवंटांत समुद्रकिनाऱ्यापासून व पाण्यापासून शेंकडों मैल दूर सोन्याच्या खाणी खोदण्याचें काम चालविलें आहे. या वाळवंटांत काम करणाऱ्या माणसांकरितां अन्नपाणी उंटावरून शेंकडों मैलावरून रोज आणण्यांत येतें. अलीकडे समुद्र किनाऱ्यापासून पाण्याचे नळ थेट या सोन्याच्या खाणीपर्यंत नेले आहेत.

पश्चिम आस्ट्रेयांतील खाणींत अगदीं अलिकडच्या सुधारलेल्या यंत्र साधनानें काम चालू असतें. खाणीच्या तोंडाशीं वर आणलेले खडक नेण्यासाठीं ज्या ट्रॅमगाड्या आहेत, त्या जमिनीवरून चालत नाहींत. त्या वर लाविलेल्या तारावरून खडक घेऊन कारखान्याकडे जातात. त्याचप्रमाणें तेथें माल नेण्याआणण्याचें दुसरें एक मजेदार यंत्र आहे. त्याला ते लोक गमतीनें 'उडता कोल्हा' असें म्हणतात. हा उडता कोल्हा म्हणजे एक बकेट तारांना टांगलेली असते. ती खाणीच्या तोंडाशीं असलेला खडक यंत्रसामर्थ्यानें आंत घेते. व मग तारेवरून सुमारें पाव मैल अंतरावर असलेल्या कारखान्यांत नेते व तेथें यंत्रबलानेंच तो खडक खालीं रिचवून परत तारेवरून खाणीकडे आपला मोर्चा वळविते. खाणीच्या तळाशीं सर्वत्र विजेच्या दिव्यांचा लखलखाट असतो. या प्रकाशांत सोनें

मिसळलेल्या खडकांचा रंग मोठा सुंदर दिसतो. खाणींत हवेच्या दाबानें मोठमोठे खडक फोडले जातात व यंत्रानें ते वर येतात. कारखान्यांत रासायनिक मिश्रणाच्या प्रचंड पराती असतात. जवळच खडकांचा चुरा करणारीं भयंकर यंत्रें आ वासून तयार असतात. त्यांच्यापुढें प्रचंड कढया असलेल्या मोठ्या भट्टया असतात. या भट्टयांची एक लाख पौंडापर्यंत किंमत पडते इतक्या त्या महाग असतात. या भट्टयांची उष्णता इतकी भयंकर असते कीं, त्यांच्याजवळ जातां येत नाहीं. काम करणारीं माणसें नखशिखांत अस्बेस्टासचा पोशाख करून मग जवळ जातात.

## वाळवंटांतील दोन अनुभव

आतां सोन्याच्या खाणी सोडून पश्चिम ऑस्ट्रेलियाचें वाळवंट कशा प्रकारचें आहे याची माहिती दोघां प्रवाशांच्या शब्दांत सांगतों.

पहिला प्रवाशी व त्याच्या बरोबरीचे लोक पाण्यापासून रस्ता चुकून भटकत होते. तो लिहितो—"भयंकर ऊन पडलें होतें. बरोबरीचे लोक दुःखानें कण्हत होते. त्यांचें दुःख माझ्यानें पाहवेना. मी वाटाड्याला बरोबर घेऊन तसाच कष्टानें पाण्याच्या शोधास निघालों. आम्ही भटक भटक भटकलों. पण चोहोंकडे ओसाड रखरखीत प्रदेश. पाण्याचें नांव नाहीं. मी तसाच निराशेनें परतलों. माझ्या संवगड्यांची फारच वाईट स्थिति झाली होती. माझीही दशा वाईटच होती. घसा अगदीं कोरडा पडला होता व तहानेमुळें नीट बोलवत नव्हतें व ऐकूंही येत नव्हतें.

मी मंडळीला म्हणालों. "गड्यांनों, पाणी मिळालें तरच आपण जगणार. तर कसेंही करून पाण्याच्या शोधास चला." आम्ही पुढें पुढें चाललों. दोन मैल चालण्यास आम्हाला दीड तास लागला. शेवटीं आम्ही एका लहानशा दलदलीच्या भागावर येऊन ठेपलों.

तावडतोब वाटाड्या पळाला व त्या दलदलींत जाऊन घुसला. मी मागून जाऊन पाहतों तों एका ठिकाणीं बऱ्याचशा पातळ चिखलांत त्यानें तोंड खुपसलें होतें. त्यानें अर्धा चिखल गट्ट केला. मी तंगडी धरून त्याला मागें सारलें. मग आम्ही सर्वांनीं तो ओलसर चिखल मोठ्या आनंदानें प्राशन केला. तो आम्हांला किती गोड लागला म्हणून सांगू !"

दुसरा प्रवाशी पुढीलप्रमाणें वाळवंटाचा अनुभव सांगतोः— "सकाळपासून पूर्वेकडून लू [ गरम वारे ] चालू होते. हा वारा इतका उष्ण होता कीं, मी झुडपाआड लपलों. तें झुडूप करपून जळून कसें गेलें नाहीं कोण जाणें. दुपारीं मी पेटींतून थर्मामिटर [ उष्णतामापक यंत्र ] काढलें. पारा १२५ डिग्रीपर्यंत चढला. मला तें खरें वाटेना. मी झाडाच्या खोडावर सावलींत तें ठेविलें. एक तासानें येऊन पाहातों तों पारा शेवटच्या डिग्रीपर्यंत [१२७ डिग्री] चढून नळी फोडून बाहेर पडला. यावरून किती उष्णता असेल व तो वारा किती भयंकर असेल याची कल्पना करतां येईल."

ऑस्ट्रेलिया हा नवीन देश आहे. तेथें कामधंद्यास पुष्कळच वाव आहे. काम भरपूर मिळतें व मजुरीही पुष्कळ मिळते. लोक पुष्कळ पैका मिळवितात व तो सढळ हातानें खर्च करितात. भारी किंमतीच्या वस्तु विकत घेण्यास व वापरण्यास ते मागेंपुढें पाहणार नाहींत. यामुळें तेथील राहणीही महागाईची आहे. ऑस्ट्रेलियन लोक हे इंग्लंडमधून गेलेल्या लोकांचे वंशज असल्यामुळें रंगारूपानें ते साधारणपणें त्यांच्यासारखेच दिसतात. मात्र ऑस्ट्रेलियांतील उष्ण हवेंत वाढल्यामुळें त्यांचा रंग फिका असतो. शरीरानेंही ते अगदीं सडपातळ असतात. शिवाय ते फार उंच असतात. बहुतेक लोक सहा फुटाहून उंच असतात. असें कां असावें हें समजत नाहीं.

ऑस्ट्रेलियन लोक खूप उंच व सडपातळ असल्यानें इतर लोक थट्टेनें त्यांना मकेचें चिपाड असें म्हणतात.

ऑस्ट्रेलियाला चार पांच गोष्टी प्रतिकूल आहेत. सर्वांत प्रतिकूल गोष्ट म्हणजे तेथील उष्ण हवा. ऑस्ट्रेलियांतील गोरे लोक समुद्राला चिकटून राहिलेले आहेत. फार तर समुद्रालगतचे डोंगर व त्या पलीकडील मैदानें येथपर्यंत त्यांची मजल गेली आहे. त्यापलीकडच्या अफाट अशा मध्यभागांत व उत्तरभागांत जाऊन वसाहत करण्याचें धाडस त्यांच्याच्यानें होत नाहीं. त्या उष्ण हवेंत जे गोरे-लोक जातात ते अल्पावधींत मृत्युमुखीं पडतात असा अनुभव आहे. या मध्यभागाची जमीन फार सुपीक आहे. शिवाय, अनेक बहुमोल धातूंच्या तेथें खाणी आहेत. पश्चिम ऑस्ट्रेलियांत शेंकडों मैलांवरून पाणी नेऊन मोठमोठ्या खाणी खणण्याचें काम ऑस्ट्रेलियन लोकांनीं सुरू केलें आहे. परंतु, त्याच्या पलीकडे पसरलेल्या अफाट प्रदेशाची वाट काय? गोऱ्या लोकांना भीति वाटणाऱ्या या प्रदेशांत हिंदुस्थान, चीन व जपान यासारख्या उष्ण कटिबंधांतील देशांतील लोक राहूं शकतील, व वसाहत आणि लागवड करूं शकतील, निदान मजूर म्हणून त्यांची गोरे लोकांना फार मोठी मदत होण्यासारखी आहे. परंतु ऑस्ट्रेलियन लोक या आशिया खंडांतील 'काळ्या' लोकांना आपल्या देशांत येऊं देण्याच्या अगदीं विरुद्ध आहेत. ऑस्ट्रेलिया देश अगदीं शंभर नंबरी 'गोरा' च ठेवण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा आहे. मग त्यांच्या देशाची वसाहत व लागवड होण्यास कालावधि लागला तरी चालेल. ते म्हणतात ह्या काळ्या लोकांची संस्कृति आमच्याहून कमी दर्जाची—निदान भिन्न—आहे. ते आमच्या देशांत येऊन राहिल्यास आमच्या संस्कृतीस धक्का बसेल. काळ्या लोकांना खाण्यापिण्यास, कपड्यास फार थोडे पैसे लागतात. त्यांच्या गरजा थोड्या. ते अल्पसंतुष्ट शिवाय मेहनती. त्यांना एकदां

देशांत येऊं दिलें कीं ते मजुरी स्वस्त करतील व आमचे लोक उपाशी मरतील.

ऑस्ट्रेलियाचें हें धोरण कसेंही असो. पण मनुष्यबळ थोडेसें कां होईना पण तेवढयांतच शक्य तितकी आपली प्रगति करण्याचे. त्यांनीं आटोकाट प्रयत्न चालविले आहेत. त्यांनीं पूर्व व पश्चिम ऑस्ट्रेलिया आतां आगगाडीनें जोडला आहे. नद्यांना प्रचंड बंधारे घालून पाण्याचे कालवे मध्यभागांत नेण्याचे त्यांचे प्रयत्न सुरू आहेत. त्यांना कोळशाच्या व लोखंडाच्या खाणी सांपडल्यामुळें आज-पर्यंत जसे ते लोंकर वगैरे कच्च्या मालाची परदेशांत निर्यात करीत असत, तसें यापुढें करणार नाहींत. ते मोठमोठे कारखाने काढतील, लोखंडाचीं व पोलादाचीं यंत्रें तयार करतील. गिरण्या सुरू करून त्यांत कापड तयार करतील. हें सर्व खरें आहे. तथापि निसर्गापुढें व स्वतःच्या प्रकृतिधर्मापुढें त्यांच्यानें कितपत टिकाव धरवेल हें पाहाणें आहे. थोड्याशा लोकांकरितां हें अफाट कुरण राखून ठेवण्याची त्यांची प्रतिज्ञा कितपत टिकते हें पाहिलें पाहिजे.

---

## प्रकरण १६ वें

# कोळसा व लोखंडाच्या देशांतील ब्रिटिश लोक.

आपल्या देशावर ब्रिटिश लोकांचें राज्य आहे. संस्कृति, शिक्षण, व्यापार वगैरे बाजूंनीं गेल्या शंभर वर्षांपासून आपण त्यांच्यांशीं निगडित झालेले आहोंत. आपण त्यांची भाषा बोलतों त्यांचीं पुस्तकें वाचितों, त्यांचे व त्यांच्यासारखे कपडे घालितों, उच्च शिक्षण घ्यावयाचें असल्यास त्यांच्या देशांत जातों; इतकेंच नव्हे तर ते विचार करितात तसे विचार करितों. याप्रमाणें ग्रेट-

ब्रिटन आपल्याला आज गुरुस्थानीं आहे. तेव्हां त्याची आपल्याला माहिती असणें इष्ट आहे.

शिवाय आतांपर्यंत आपण निरनिराळ्या प्रकारच्या देशांचें निरीक्षण केलें. डेन्मार्कनें सहकारी चळवळीनें आपली स्थिति कशी सुधारली तें पाहिलें. हॉलंडनें पवनचक्क्या, कालवे व धक्के या साधनांनीं आपली जमीन कशी सुपीक केली व कारखाने थाटले तें पाहिलें. ऑस्ट्रेलियाचा मेंढरें राखण्याचा प्रचंड धंदा पाहिला. आपण पाहिलेले कांहीं देश शेती करणारे, कांहीं मेंढरें चारणारे व कांहीं दूधदुभत्याचा धंदा करणारे होते. ग्रेटब्रिटनसारख्या पुढें आलेल्या राष्ट्राचें भौगोलिक वैशिष्ठ्य काय आहे हें आतां पाहाणें आहे.

वास्तविक ग्रेटब्रिटन हें एक लहानसें बेट आहे. याचा आकार आयर्लंड धरूनसुद्धां आपल्या मुंबई इलाख्याहून मोठा नाहीं. यांतील शेतीच्या लायक जमीन फार थोडी आहे. बराचसा भाग डोंगराळ व नापीक आहे. सपाट व बऱ्यापैकीं जमीन आहे तिच्यांत गुरें चारण्याचीं कुरणेंच जास्त आहेत. उलट लोकसंख्या मुंबई इलाख्याच्या सवादोनपट मोठी आहे. म्हणजे शेतीचें उत्पन्न थोडें व खाण्यास माणसें मात्र पुष्कळ अशी इंग्लंडची स्थिति आहे. असें म्हणतात कीं, ग्रेटब्रिटनमध्यें ब्रिटिश लोकांना फार फार तर एक महिनाभर पुरेल इतकें धान्य पिकतें. बाकीच्या अकरा महिन्यांकरितां त्यांना परदेशांतून येणाऱ्या धान्यावर विसंबून राहावें लागतें. हॉलंड, डेन्मार्क, न्यूझीलंड, लोणी, चीज व अंडीं पाठवतील व ऑस्ट्रेलिया आणि अमेरिका गहूं व मांस पाठवितील तेव्हां ब्रिटिश लोकांना खाण्यास मिळणार, अशी त्यांची अन्नाच्या बाबतींत परावलंबी स्थिति आहे.

असें असूनही ग्रेटब्रिटन हें जगांतील बलाढ्य व संपन्न राष्ट्रांत प्रमुख आहे. तें कसें तें पाहा:—

[ १ ] अमेरिका [ संयुक्त संस्थानें ] खेरीजकरून जगांतील कोणत्याही राष्ट्रापेक्षां ग्रेटब्रिटनचा परदेशांशीं होणारा व्यापार व ग्रेटब्रिटनचे कारखाने जास्त आहेत.

[ २ ] जगांतील कोणत्याही, राष्ट्रापेक्षां ग्रेटब्रिटनजवळ व्यापारी जहाजें जास्त आहेत.

[ ३ ] जगांतील कोणत्याही राष्ट्रापेक्षां ग्रेटब्रिटनचें आरमार मोठें व सामर्थ्यवान् आहे.

[ ४ ] जगांतील कोणत्याही राष्ट्रापेक्षां ग्रेटब्रिटनच्या वसाहती व ताब्यांतील मुलूख जास्त आहे. ब्रिटिश साम्राज्य पांच खंडांत पसरलें असून त्याच्यावर सूर्य कधीं मावळत नाहीं हें प्रसिद्ध आहे.

या दोन्ही गोष्टींचा मेळ कसा बसवावा ? पुरतें अन्नही पैदा करूं न शकणाऱ्या लोकांना एवढी संपत्ति व सत्ता कशी मिळाली ?

याचीं कारणें शोधून काढणें फारसें कठीण नाहीं. तीं ग्रेट-ब्रिटनच्या भौगोलिक परिस्थितींतच सांपडतील. घरांत भरपूर खाण्याला मिळत असले म्हणजे माणूस घरींच बसून राहातो; घरा-बाहेर पडून अन्न मिळविण्याची त्याला जरूर वाटत नाहीं. तो तृप्त, अल्पसंतुष्ट व आळशी बनतो. उलट घरीं खाण्यास पुरेसें नसलें म्हणजे माणसाला घराबाहेर पडावें लागतें, धडपड करावी लागते, अन्न मिळविण्यास उद्योगधंदा करावा लागतो. हें करण्यांत त्याचा बाहेर चारचौघांशीं संबंध येतो, त्याला जगाचा विविध अनुभव येतो व कोणाशीं कसें वागावें हें समजतें.

ग्रेटब्रिटनची कांहीं अंशीं घरांत धान्य नसल्यामुळें बाहेर पड-णाऱ्या माणसाप्रमाणेंच स्थिति झाली. तें बेट असल्याकारणानें ब्रिटिश लोकांना समुद्रांतून प्रवास करणें अगदीं अंगवळणीं पडलें होतें. अफाट महासागरांत वारा नेईल तिकडे जाणाऱ्या, लहान

लहान जहाजांत बसून लांबवर प्रवास करणाऱ्या लोकांच्या अंगांत धाडस, कल्पकता, चिकाटी हे गुण वाढत जाणारच. शेती हा चरितार्थाचा मुख्य धंदा होणें शक्य नसल्यानें या दर्यावर्दी राष्ट्रानें परदेशाशीं व्यापार करण्यांत लक्ष पुरविलें असल्यास काय नवल ! व्यापार करण्यास व परदेशाहून खाण्याचे पदार्थ आणण्यास जहाजें पाहिजेत. शिवाय व्यापारी जहाजांचें संरक्षण करण्यास आरमारही पाहिजेच. याशिवाय ग्रेटब्रिटन बेट असल्यानें समुद्रांतून परचक्र केव्हां कोणच्या बाजूनें येईल याचा नियम नाहीं. सर्वच बाजू उघड्या. तेव्हां देशाचें संरक्षण करण्यासही मजबूत असें आरमार पाहिजे. या सर्व कारणांमुळें इंग्लंडचा व्यापार व आरमार वाढलें. परदेशाशीं व्यापार करतां करतां तिकडे अनायासें बुद्धिमत्तेच्या प्रभावावर राज्य मिळूं लागलें तर कोण टाकून देईल ? शिवाय, व्यापारासाठीं समुद्रपर्यटन करण्याची संवय लागल्यावर फाजील वाढलेल्या लोकसंख्येसाठीं व अन्य कारणांसाठीं नवीन प्रदेशांत वसाहती स्थापल्या जाणें हें क्रमप्राप्तच आहे. अशा रितीनें ब्रिटिश साम्राज्याचा उदय व विस्तार होत गेला.

या वरील स्पष्टीकरणाचा असा मात्र कोणी अर्थ घेऊं नये कीं, घरीं अन्न नसणें हें एक अभ्युदयाचें साधन आहे. तें केवळ प्रचोदक ( Driving ) कारण आहे. माणसांत कर्तृत्व हें पाहिजेच व तें दाखविण्याइतकी त्यास अनुकूल भौगोलिक परिस्थिति पाहिजे. हिंदुस्थानांतील बहुसंख्य लोकांस एक वेळेसच जेवण मिळतें व तेंही अपुरें व कदान्नाचें असतें. तथापि त्यांचा अभ्युदय झाला नाहीं. माणसाच्या अंगांतील धमक हीच या बाबतींत मुख्य महत्त्वाची गोष्ट समजली पाहिजे.

ग्रेटब्रिटनच्या आधुनिक अभ्युदयाचीं कारणें पुढीलप्रमाणें देतां येतील:—

[१] **स्थलमाहात्म्य.** हीं बेटें युरोप व अमेरिका यांच्या दरम्यान आहेत, व युरोपांतील उत्पादक देशाचा माल जगाच्या बाजारांत पाठविण्याच्या मार्गावर आहेत. यामुळें निसर्गानेंच जणूं काय ग्रेटब्रिटनला युरोपचा अडत्या व माल वाहून नेणारा बनविला आहे.

[२] आजच्या उद्योगधंद्याच्या युगांत **कोळसा व लोखंड** यांना फार महत्त्व आहे. बहुतेक आधुनिक धंदे या दोन पदार्थांवर अवलंबून असतात. तेव्हां ज्या देशाजवळ या दोघांचा पुरवठा विपुल तो देश उद्योगधंद्यांत पुढें येणारच. ग्रेटब्रिटनमध्यें कोळशाच्या व लोखंडाच्या पुष्कळ खाणी असून त्यांतील कोळसा व लोखंड यांचा सांठा जणूं काय अमर्यादित आहे असें दिसतें. या खाणींच्या जोरावरच ग्रेटब्रिटननें आपले प्रचंड व विविध कारखाने चालविले आहेत.

[ ३ ] ग्रेटब्रिटनची हवा थंड आहे. पण ती एस्किमोच्या प्रदेशासारखी अतिशय थंड नाहीं. ती सौम्य असून उद्योग करण्यास उत्तेजन देणारी आहे. या हवेमुळें ब्रिटिश लोकांच्या अंगांत नेहमीं तरतरी राहाते व उद्योग करितांना थकवा येत नाहीं. याच्या उलट हिंदुस्थानच्या उष्ण हवेंत फार वेळ उद्योग करवत नाहीं, विश्रांति घेण्याची जरुरी वाटते. याप्रमाणें उत्तेजक हवा ब्रिटनच्या अभ्युदयास अंशतः कारणीभूत झाली आहे.

[ ४ ] परंतु हवा उत्तेजक असली व इतर साधनें अनुकूल असलीं पण माणसें मठ्ठ असलीं तर व्यर्थ. स्वदेशास पुढें आणण्यास आवश्यक असे चिकाटी, कल्पकता, धाडस, ऐक्य, उद्यमशीलता, व्यवस्थितपणा, स्वार्थत्यागवृत्ति इत्यादि अनेक गुण हवापाणी वगैरे भौगोलिक बाबींवर सर्वस्वीं अवलंबून आहेत असें नाहीं व ते केवळ भौगोलिक कारणांनीं उद्भूत होतात असें तर मुळींच नाहीं. माण-

सांत मूळचेंच कांहींतरी असावें लागतें. मग कांहीं गुण सोन्याचा, कांहीं सवागीचा.

ब्रिटिश लोक स्वभावतः बुद्धिमान्, कल्पक व उद्यमशील आहेत. हें त्यांच्या अभ्युदयाचें विशेष महत्त्वाचें कारण आहे. अमेरिका [ संयुक्त संस्थानें ] खेरीजकरून जगांतील कोणत्याही राष्ट्रापेक्षां ग्रेटब्रिटननें यांत्रिक शोध अधिक लाविले आहेत. जेम्स वॅट व स्टिफन्सन् हीं दोन नांवेंच उदाहरणासाठीं पुरीं आहेत.

[५] ऑस्ट्रेलिया, कॅनडा, दक्षिण आफ्रिका वगैरे वसाहती व हिंदुस्तानसारखा ताब्यांतील मुलूख यांचा ग्रेटब्रिटनला फार उपयोग होतो. ब्रिटनला या देशांत हक्कानें व सवलतीनें व्यापार करितां येतो व या देशांतील कापूस वगैरे कच्चा मालही सवलतीनें नेतां येतो. त्याचप्रमाणें वरील देशांत फायदेशीर रीतीनें व्यापारांत व उद्योगधंद्यांत भांडवल गुंतवितां येतें. हिंदुस्तानसारख्या गरजू देशास कर्जही पुरवितां येतें. इतर राष्ट्रांना ब्रिटिश साम्राज्यान्तर्गत देशांचा असा फायदा मिळणें शक्य नाहीं. अलीकडे ( Imperial Preference) म्हणजे "साम्राज्यांतील देशांनीं जकातीच्या व व्यापाराच्या बाबतींत एकमेकांना परक्या देशांपेक्षां अधिक सवलती द्याव्यात." अशा अर्थाचें एक नवीन तत्त्व ब्रिटिश साम्राज्यांत प्रचारांत आलें आहे.

## औद्योगिक इंग्लंड

ग्रेटब्रिटन ह्या बेटांत इंग्लंड, स्कॉटलंड व वेल्स या तीन देशांचा समावेश होतो. तथापि सोयीसाठीं मुख्य देश जो इंग्लंड त्याचीच यापुढें माहिती दिली आहे.

इंग्लंड हा मुख्यत्वेंकरून औद्योगिक देश आहे. त्याच्यांत चारपंचमांश लोक शहरांत राहून गिरण्या, कारखाने, खाणी वगैरेंत

कामधंदा करून पोट भरतात व फक्त एक पंचमांश लोक खेड्यांत राहून शेती करितात किंवा गुरें राखतात.

वर लिहिलेंच आहे कीं, अलीकडच्या सर्व उद्योगधंद्यांना एक अत्यंत अवश्य वस्तु म्हणजे कोळसा होय. कोळसा हें आधुनिक जगांतील सोनें आहे असें म्हटलें तरी चालेल. आगगाड्या चालवावयाला कोळसा पाहिजे. समुद्रांत जहाजें हाकारण्यांत कोळसा पाहिजे. लोखंडाचीं यंत्रें व वस्तु तयार करावयाचे कारखाने चालविण्यास कोळसा पाहिजे. इतकेंच नव्हे तर कोळशाऐवजीं ज्या एका दुसऱ्या शक्तीचा या कामीं उपयोग करितात ती वीज उत्पन्न करण्यास सुद्धां कधीं कधीं कोळसा लागतो. याशिवाय स्वयंपाकास, दिवे लावण्यास, कोळसा पाहिजेच. कोळशाचा दुसरा महत्त्वाचा उपयोग म्हणजे थंडीपासून बचाव करण्याचा. इंग्लंड वगैरे युरोपांतील देशांत मनस्वी थंडी असते. हिंवाळ्यांत तर कांहीं विचारूंच नका. अशा वेळीं शेगडींत घालावयास कोळसा नसला तर लोकांचे किती हाल होतील याची कल्पना करवत नाहीं.

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत इंग्लंडला कोळशांच्या खाणींचा शोध लागला नव्हता. तेव्हांचें— कोळशापूर्वीचें— इंग्लंड अगदीं वेगळ्या प्रकारचें होतें. उत्तरभागांत वस्ती फार कमी होती. डोंगर, पठार, रानें, दलदली यांचें तेथें साम्राज्य होतें. मधून मधून दऱ्यांत व नद्यांच्या कांठीं लहानसान खेड्यांत लोक राहात असत. परंतु त्यांच्यामध्यें आपसांत रहदारी नव्हती. इंग्लंडमध्यें उत्तर दक्षिण अशी 'पेनाईन' नांवाची डोंगराची ओळ १६० मैल पसरली आहे. हिच्या पश्चिमेकडील कांहीं भाग डोंगराळ व कांहीं भाग दलदलीचा होता. पूर्वभाग बराचसा सपाट असून पाऊस बेताचा पडत असल्यानें तेथें लोक शेती करीत. डोंगर पठारावरील व लगतच्या खोऱ्यांतील लोक पठारावरील कुरणांत मेंढरें चारीत व त्यांची लोंकर

काढून परदेशीं पाठवीत. इंग्लंडचा मध्य व आग्नेयीकडचा भाग सपाट असून तेथें जमीन सुपीक असल्यानें लोक शेती करीत. याच प्रदेशाला पूर्वीं महत्त्व असे. या भागांतच शहरें असून बहुतेक लोकवस्ती इकडेच होती. समुद्रकिनाऱ्यालगतचे लोक मासे धरून आपली उपजीविका करीत.

या वेळीं उत्तर भाग म्हणजे एक अज्ञात, भयाण व ओसाड मुलूख होता. त्या बाजूस दक्षिण व मध्यभागांतले लोक फारसे फिरकत नसत. कोणी फेरीवाले मधून मधून कापड, खेळणीं वगैरे वस्तु घेऊन उत्तरेकडे जात. तेव्हां त्यांना पाहाण्यास सारें गांव जमा होई व हे दख्खनचे लोक चेटके असावेत असें उत्तरेच्या बाया बापड्या म्हणत.

त्यावेळीं बोटांवर मोजण्याइतकीं शहरें होतीं. देशभर लहान लहान टुमदार खेडीं होतीं. लोकसंख्या इतकी कमी होती कीं, सुपीक प्रदेश थोडा असूनही तेव्हां जितका गहूं यॉर्कशायरच्या खोऱ्यांत किंवा ईस्ट अँग्लियामध्यें पिके तो सर्वांना पुरून परदेशांत पाठविण्यास शिल्लक राही. शेतकरी घरोघर लहानसान धंदे करीत व पोट भरीत. अवश्य लागणाऱ्या बहुतेक वस्तु घरींच तयार होत. घरीं लागणारें कापड घरांतील बायाच फुरसतीच्या वेळीं विणीत. पण तें जाडेंभरडें असे. तलम, सुंदर कापड श्रमानें हिंदुस्तानांतून आणावें लागे व त्याला जबर किंमत द्यावी लागे.

देशांत ठिकठिकाणीं मोठमोठे सरदार किल्ल्यांतून राहात व त्यांच्या पदरीं फौजफांटा असे. आसपासची शंभर पाऊणशें मैलांच्या टापूंतील जमीन त्यांच्या मालकीची होती व कुळें तीं खंडानें करून पोटें भरीत. त्याचप्रमाणें आज जेथें मोठीं शहरें आहेत व हजारों माणसें कारखान्यांत खपतात तेथें पूर्वीं विस्तृत व भयंकर अरण्यें

होतीं. कांहीं रानें राजा व सरदार यांच्या शिकारीसाठीं राखलेलीं असत. कांहीं रानांत दरोडेखोर टोळ्या करून राहात व आसपास दरवडे घालीत.

कोळशापूर्वीचा इंग्लंड असा शेतकरीवृत्तीचा, घरोघर लहान-सान धंदे करणारा, कष्टाळू, झोपाळू होता. कोळशानें इंग्लंडचें स्वरूप जादूच्या कांडीप्रमाणें बदलून टाकिलें. पेनाईन डोंगराच्या पूर्वपश्चिम बरगड्यांत कोळशाच्या खाणी सांपडल्या. कोळसा जड असतो. त्याला लांबवर वाहून नेणें फार जिकीरीचें व खर्चाचें काम असतें. तेव्हां खाणींपासून कोळसा, भरभराटीस आलेल्या मध्य व आग्नेयी भागांत न नेतां उत्तरेकडील व वायव्येकडील कोळशाच्या मुलुखांतच गिरण्या व कारखाने काढणें भाग पडलें. गिरण्यांत व कारखान्यांत माल जलद तयार होतो व तो थोड्या किंमतीनें विकतां येतो. त्याच्यापुढें हातमागावर विणलेलें कापड काय टिकाव धरणार? अर्थात् घरगुती धंदे बसले. गिरण्यांत काम करण्यास हजारों मजूर लागूं लागले, व त्यांना मजुरीही चांगली मिळूं लागली. तेव्हां कष्टाची शेती टाकून खेड्यापाड्यांतील लोकांचा ओघ वायव्य व ईशान्य या दिशांकडे वळला, व अल्पावकाशांत ओसाड प्रदेशावर कोळशांच्या खाणींभोंवतीं प्रचंड कारखाने उभारले जाऊन त्यांत काम करणाऱ्या माणसांचीं घरें वसलीं गेलीं. अशा प्रकारें खाणींना लागून भराभर शहरें स्थापन झालीं. याप्रमाणें कोळशाचें नवें युग सुरू झालें.

कोळशाच्या खाणींभोंवतीं तीन मुख्य धंद्यांचे कारखाने आहेत. कापसाचें सूत बनविणें व कापड तयार करणें, लोंकरीचें कापड तयार करणें व लोखंडाच्या अनेक वस्तु तयार करणें. लँकशायर खाणींभोंवतीं कापसाचें, यार्कशायरमध्यें लोंकरीचें व नॉर्थंबरलंड-मध्यें व मध्यभागांत लोखंडाचे कारखाने भरभराटीस आले आहेत. कापसाच्या व लोंकरीच्या कारखान्यास लागणारीं यंत्रें तयार कर-

ण्याचे कारखाने नॉर्थंबरलंडमध्यें व बर्मिंगहॅम या मध्यभागांतील शहराभोंवतीं आहेत.

आपण प्रथम इंग्लंडचा सर्वांत जुना धंदा जो लोंकरीचें कापड तयार करणें त्याची माहिती मिळवूं. पेन्नाईन पठाराच्या पश्चिम भागावर समुद्राकडून वाहात येणाऱ्या मान्सून वाऱ्यांचा मारा बसतो व त्यामुळें त्या भागांत पाऊस पुष्कळ पडतो. पूर्व भागांत त्या मानानें कमी पाऊस पडतो. या भागांतील डोंगर पठारावर शेंकडों वर्षांपासून मेंढरें चारितात. आरंभीं मेंढरांची लोंकर हॉलंड देशांत पाठवीत असत. कारण त्यावेळीं जगांत लोंकरीचें कापड तयार करण्याचें काम मुख्यत्वें हॉलंडमध्यें होत असे. पुढें डच लोकांचा त्यांच्या देशांत फार छळ झाल्यानें त्यांच्यापैकीं कांहींजण पळून इंग्लंडांत आले. त्यांनीं इंलिश लोकांना लोंकरीचें कपडे विणण्यास शिकविलें. हल्लीं पूर्वींप्रमाणें लोंकर परदेशांत जात नाहीं. इतकेंच नव्हें तर इंग्लंडांत मिळते तितकी लोंकर न पुरून ती ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, दक्षिण अमेरिका व दक्षिण आफ्रिका या देशांतून आणावी लागते.

आरंभीं लोंकरीचें कापड लोक हातानें घरोघर विणीत असत, व त्यामुळें सर्व इंग्लंडभर हा धंदा चालू होता. पुढें वाहत्या पाण्याच्या साह्यानें विणण्याच्या यंत्रांच्या चाकांना गति देण्याचा शोध निघाला. यामुळें कापड अल्प श्रमांत व थोडक्या वेळांत निघूं लागलें. परंतु दशभर जलद वाहाणारे पाण्याचे प्रवाह कोठून सांपडणार? ते फक्त डागराळ मुलुखांतच असावयाचे. यामुळें पेन्नाईनच्या पठारावरून यॉर्कशायरमध्यें वेगानें वाहाणाऱ्या नद्यांच्या कांठींच हा धंदा टिकून राहिला. पुढें वाफेनें चालणाऱ्या यंत्रांचा शोध लागला. वाफ तयार करण्यास कोळसा पाहिजेच. त्याचा या परगण्यांतच शोध लागला. याचा परिणाम असा झाला कीं, जवळ कोळसा नसलेल्या इतर

प्रदेशांतील गिरण्या बंद झाल्या व यॉर्कशायरमधील गिरण्या वाढत गेल्या.

याप्रमाणें यॉर्कशायरला सर्व साधनें अनुकूल झालीं. शेजारच्या पठारावर मेंढरें चरण्यास मुबलक गवत, पठाराच्या बरगडींतच कोळशाच्या मोठमोठ्या खाणीं, शिवाय लोंकर धुण्यास व रंगविण्यास अवश्य असे पाण्याचे प्रवाह तेथें हवे तितके आहेत. लोंकरीचें कापड तयार करणारीं सर्व शहरें पेन्नाईनच्या पायथ्याला वसलीं आहेत. कारण तेथें वर लिहिलेलीं सर्व साधनें अनुकूल आहेत.

यॉर्कशायरमध्यें 'लीड्स्' हें सर्वांत मोठ्या प्रमाणावर लोंकरीचें कापड तयार करणारें शहर आहे. एथें लोंकरीच्या कारखान्यांशिवाय कातडें कमावण्याचे कारखाने फार आहेत. मेंढरांचे कातडें जवळपास वाटेल तितकें मिळत असल्यानें हा धंदा लीड्सूला निघणें साहजिक आहे. याशिवाय यंत्रें तयार करण्याचे कारखाने तेथें आहेत.

आतां आपण सुताचें कापड बनविणाऱ्या लँकशायर परगण्याकडे वळूं. या प्रदेशांत पूर्वीं दलदल व अरण्यें होतीं. जाण्यायेण्यास रस्ते नव्हते; कसब्याचीं गांवें नव्हतीं; लोकवस्ती फार विरळ होती. परंतु कोळशांच्या शोधानें हें सर्व पालटलें. इंग्लंडमध्यें कापूस बिलकूल पिकत नाहीं. तथापि जगांत जितक्या चात्या आहेत, त्यांतील शेंकडा ४० इंग्लंडांत चालतात हें एक आश्चर्य आहे. लँकशायरच्या गिरण्यांत तयार झालेल्या कापडानें जगांतील पन्नास कोटी माणसांचें अंग झांकलें जातें असा अंदाज आहे. लँकशायरच्या गिरण्यांची भूक जबरदस्त आहे. अमेरिका, हिंदुस्थान, इजिप्त, चीन या देशांतून हजारों गांठी घेऊन जहाजें लिव्हरपूल बंदरावर येत असतात. अमेरिकेस जाण्यास येण्यास हेंच बंदर जवळ व सोयीस्कर असल्यानें व लँकशायरला लागणाऱ्या कापसापैकीं दोन तृतीयांश कापूस अमेरिकेहून येत असल्यानें लंडनच्या खालोखाल लिव्हरपूल बंदराला

महत्त्व प्राप्त झालें आहे. आज या बंदरांतील गोद्या नऊ मैल पसरल्या असून माल चढविण्याउतरविण्याच्या धक्क्यांची लांबी चाळीस मैल आहे. लिव्हरपूरहून लँकशायरमधील बेरी, ओल्डहॅम्, ब्लॅकबर्न, प्रेस्टन वगैरे कारखान्यांच्या शहरांत कापसाचे गठ्ठे रवाना होतात, व तयार झालेलें कापड परत लिव्हरपूलला परदेशीं पाठविण्यासाठीं परत येतें. तसेंच या कारखान्यांच्या प्रदेशांत राहाणाऱ्या लाखों माणसांना लागणारें धान्य लिव्हरपूलहूनच येतें. लिव्हरपूलहून आलेला कापूस सर्व शहरांत वांटण्यासाठीं व त्या शहरांत तयार झालेलें कापड वखारींत सांठवून मग लिव्हरपूलला रवाना करण्यासाठीं एक मध्यवर्ती ठिकाण हवें होतें. ती जागा मँचेस्टरनें भरून काढली. मँचेस्टर हें केवळ वखारींचें शहर न बनतां तेथेंही अनेक गिरण्या निघाल्या व तें झपाट्यानें वाढूं लागलें. १७७४ मध्यें या शहराची लोकसंख्या केवळ सत्तावीस हजार होती. १७८९ मध्यें मँचेस्टरला पहिली वाफेची गिरणी सुरू झाली, व त्यानंतर बारा वर्षांतच त्याची लोकसंख्या ८४००० झाली. हल्लीं ती दहा लाखांवर आहे. केवढा हा व्यापाराचा प्रभाव! १८९४ पर्यंत अमेरिका, हिंदुस्तान वगैरे देशांहून आलेलीं प्रचंड जहाजें लिव्हरपूलला आपला माल उतरवीत, व तो पुढें मँचेस्टरला आगगाडीनें रवाना होई. १८९४ मध्यें मँचेस्टर व लिव्हरपूल यांच्या दरम्यान कोट्यवधि रुपये खर्चून पस्तीस मैल लांब, एकशेंवीस फूट रुंद व सव्वीस फूट खोल असा कालवा खोदण्यांत आला. तेव्हांपासून महासागरांतलीं मोठालीं जहाजें मँचेस्टरला येऊं लागलीं. या कालव्याच्या दोन्ही बाजूस गिरण्यांचीं रांग लागली आहे.

लँकशायरमध्येंच हा कापसाच्या कापडाचा धंदा कां चालतो त्याचें कारण आहे. पाण्याचे प्रवाह व कोळशाच्या खाणी कापसाच्या गिरण्यांनाही लागतातच. परंतु यॉर्कशायरमध्यें सुद्धां या दोन्ही

गोष्टी आहेत. मग तेथें लोकरीप्रमाणें कापसाच्या गिरण्या कां निघाल्या नाहींत ? याला कारण हवा. लँकशायर परगणा समुद्राजवळ असून पश्चिमेकडून व आग्नेयीकडून वाहाणारे मान्सून वारे त्यावरून वाहातात व पाऊसही पुष्कळ पडतो. यामुळें लँकशायर परगण्याची हवा दमट आहे. उलट यॉर्कशायर समुद्रापासून दूर आहे व तेथें पाऊसही बेताचा पडतो. यामुळें तेथील हवा कोरडी आहे. कोरड्या हवेंत बारीक सूत काढतां येत नाहीं. तें मध्येंच तुटतें. दमट हवेंत वाटेल तितकें बारीक सूत काढतां येतें. लँकशायरमध्यें सुताच्या गिरण्या निघण्याचें हें एक कारण आहे.

लोखंड हें खाणींतूनच मिळतें. तें खाणींतील खडकांत इतर द्रव्यांबरोबर मिसळलेलें असतें. बाहेर काढल्यावर या लोहमिश्रित दगडांना कोळसा व चुनखडी बरोबर मिसळून भट्टींत घालतात व खूप आंच देतात. त्या योगानें दगडांतील लोखंड वितळतें व त्याचा रस भट्टींतून नळीवाटें बाहेर पडतो. या रसाचेंच शुद्ध लोखंड बनतें. कोळशाचा शोध लागण्याच्या शेंकडों वर्षांपूर्वीं इंग्लिश लोक लोखंडाचा उपयोग करीत होते. त्यावेळीं भट्टींत जाळण्यासाठीं लाकडें वापरीत, व म्हणून जंगलाच्या जवळ लोखंडाच्या भट्ट्या लावीत. यॉर्कशायरमध्यें शेफिल्ड व त्याच्या आसपासच्या मुलखांत लोखंडाच्या खाणी असून जवळच रानें आहेत. याशिवाय लोखंड शुद्ध करण्यास लागणारी चुनखडीही तेथें हवी तितकी आहे व ज्यांवर शस्त्रांना धार लावितात ते सहाणेचे दगड जवळच पेन्नाइन डोंगरांत मिळतात. पुढें कोळशाच्या खाणी या भागांतच सांपडल्यानें आयतीच सोय झाली. यामुळें चाकू, कातरी, वरतरे व इतर अनेक प्रकारचीं बारीक शस्त्रें शेफिल्डमध्यें उत्तम प्रकारें तयार होतात. शेफिल्डहून लाखों चाकू दरवर्षीं परदेशीं जातात.

शेफिल्डच्या दक्षिणेस इंग्लंडच्या मध्यभागचें मुख्य शहर बर्मिंघॅम आहे. याच्या शेजारीं लोखंडाच्या खाणी आहेत व जवळच पूर्वी आर्डन नांवाचें अरण्य होतें. यामुळें लोखंड काढून त्याच्या वस्तु तयार करण्याचा धंदा तेथें तीनशें चारशें वर्षांपासून लोक घरोघर करीत असत. त्यावेळीं प्रत्येक घर म्हणजे एक कारखानाच असे. व घरांतील सर्व माणसें खिळे, चुका, सांखळ्या वगैरे लोखंडाच्या वस्तु करीत असत. पुढें कोळशाचा शोध लागला. कोळसा बर्मिंघॅमपासून दूर होता, व वास्तविक बर्मिंघॅमचा हा धंदा बसावयास पाहिजे होता. परंतु गंमत अशी झाली कीं, लोकांना पुष्कळ वर्षांपासून हें काम करण्याची संवय झालेली. शिवाय लोखंडही जवळच होतें. येऊनजाऊन कोळसा आडून बसला. त्याला आगगाड्यांतून व कालव्यानें यॉर्कशायरच्या खाणींतून आणूं लागले. यामुळें बर्मिंघॅमचा धंदा जोरांत चालला. पुढें कोळसाही शेजारीं सांपडला. बर्मिंघॅमला आज खिळ्यापासून आगगाडीच्या एंजिनापर्यंत सर्व प्रकारच्या लहान मोठ्या लोखंडाच्या वस्तु तयार होतात. एथें स्क्रू, खिळे, टाकाचीं टोकें, टांचण्या, सुया तर इतक्या होतात कीं, नुसत्या एक महिन्यांत तयार झालेल्या टांचण्या व सुया तुम्ही मोजूं म्हणाल तर एक जन्म पुरणार नाहीं. या शहरांत वाफेचीं एंजिनें, गिरण्यांस लागणारीं मोठीं यंत्रें, तोफा, शास्त्रीय उपकरणें वगैरे तयार करण्याचे अनेक कारखाने आहेत. लहान आगगाड्या, आगबोटी वगैरे मुलांचीं खेळणीं तर येथें इतकीं होतात कीं, बर्मिंघॅमला "युरोपचें खेळण्याचें दुकान" असें म्हणतात.

पेन्नाइन डोंगराच्या ईशान्येस नॉर्थंबरलंडमध्यें ज्या कोळशाच्या खाणी आहेत त्या विस्तृत असून टाईन नांवाच्या नदीच्या जवळच आहेत. ही नदी समुद्राला मिळते तेथें न्यूकॅसल हें प्रसिद्ध बंदर आहे. कोळशाची वाहतूक नदींतून व नंतर समुद्रमार्गानें करणें

कमी खर्चाचें असल्याकारणानें न्यूक्यासल बंदरांतून दरवर्षी लक्षावधि टन कोळसा परदेशीं रवाना होतो. शिवाय, स्वीडनहून समुद्रमार्गानें लोखंड आणणें सोपें असल्यानें न्यूक्यासल, जॅरो व टाईन नदीच्या कांठचीं इतर शहरें यांच्यामध्यें पोलादाचीं प्रचंड जहाजें, जहाजांचीं व आगगाड्यांचीं एंजिनें, आगगाड्यांचे डबे, रूळ, पुलाचे भाग वगैरे तयार करण्याचे कारखाने निघाले आहेत. असें म्हणतात कीं, इंग्लंडमध्यें अलीकडे जीं जहाजें तयार होतात त्यांपैकीं अर्धीं या टाईन कांठच्या शहरांत तयार होतात.

वर इंग्लंडच्या कोळसा व लोखंड या संबंधींच्या उद्योगाचें थोडेसें तपशीलवार वर्णन दिलें आहे. हेतु हा कीं, जमिनीच्या पोटांत असलेले हे पदार्थ श्रमानें वर काढून इंग्रजांनीं त्यांच्या जोरावर निसर्गावर किती मोठा जय मिळविला आहे हें स्पष्ट करावें. पेन्नाइनच्या पूर्वपश्चिमेकडील हा यॉर्कशायर-लँकशायरचा भाग म्हणजे शेंकडों मैल पसरलेला एक भला मोठा धडधड आवाज करणारा कारखानाच आहे असें म्हणतां येईल. जिकडे जाल तिकडे गिरण्या, लोखंडाच्या प्रचंड भट्टया व त्यांतून वर पसरणारा कोळशाचा धूर. जिकडे जाल तिकडे रस्ते कोळशानें काळे बनलेले व समोरून येणाऱ्या माणसांचे कपडे काळे झालेले. कोळसा वाहून नेणाऱ्या मालगाड्या भराभर जातांना आढळतात. इकडील नद्यांच्या पाण्याचा रंग सुद्धां इतका बदलतो कीं, या नद्यांतून शाईचा प्रवाहच वाहात आहे कीं काय असें वाटतें. जिकडे जाल तिकडे गिरण्यांच्या यंत्रांचा धाडधाड आवाज चालू असतो. सारांश, कोळसे महाराजांच्या या राज्यांत चोहोंकडे गर्दी, धूर, काळा रंग, मळके कपडे व कर्कश आवाज यांची रेलचेल आहे.

कोळशानें इंग्लंडच्या समाजव्यवस्थेंत व आर्थिक परिस्थितींतही क्रांति घडवून आणली आहे. पूर्वी लोक घरोघर उद्योग करीत तेव्हं

जो तो आपल्या परीनें स्वतंत्र होता. आतां गिरण्या चालविण्यास लक्षावधि रुपयांचें भांडवल लागतें. यामुळें कांहीं थोड्या श्रीमंत लोकांच्या ताब्यांत गिरण्या व कारखाने गेले व त्यांची लाखों मजुरांवर सत्ता चालूं लागली. याप्रमाणें मालक व मजूर असे दोन तट पडले. गिरण्यांतील मजूर, खाणींतले मजूर, बंदरांवरील गोद्यांवर काम करणारे मजूर, रेल्वेंतले कामगार वगैरे लोकांनीं आपापले संघ स्थापन केले, व योग्य तो पगार मिळणें, कामाचे तास कमी होणें, इत्यादि गोष्टींची चळवळ सुरू केली. त्यांना थोर दर्जाचे पुढारी लाभले, व त्यांनीं मजुरांचीं गाऱ्हाणीं जनतेपुढें उत्तम रितीनें मांडलीं. यामुळें मजुरांच्या पुष्कळ मागण्या मालकांना वेळोवेळीं मान्य कराव्या लागल्या. गिरणींतील कामगारांची स्थिति समाधानकारक आहे. त्यांना आठ तास काम करावें लागतें व भरपूर वेतन मिळतें. ते तीनचार खोल्यांच्या वेगळया घरांत राहतात. सुट्टींच्या दिवशीं ते मुलांबाळांसह बाहेरगांवीं जातात व चैनीसाठीं पुष्कळ पसा खर्च करितात.

अलीकडे या सर्व संघांनीं सर्वसामान्य संघ काढिला आहे, व त्याच्या द्वारें ते सामान्य-स्वरूपाच्या महत्त्वाच्या प्रश्नांबद्दल चळवळ करितात. या संघाजवळ लाखों रुपये आहेत व वर्तमानपत्रें, व्याख्यानें वगैरे अनेक प्रकारानीं तें लोकांपुढें आपली बाजू मांडीत असतात. या संघाच्या हातीं इंग्लंडची नाडी आहे असें म्हटलें तरी चालेल. कारण कांहीं कारणांमुळें कोळशांच्या खाणींतील मजुरांनीं संप पुकारला कीं इंग्लंडच्या नाड्या ढिल्या पडल्याच. गिरण्या बंद, लोखंडाचे कारखाने बंद, आगगाड्या बंद, घरांतील दिवे बंद व चूलही बंद ! बरें, तसेंच कांहीं विशेष कारण घडलें तर एका संघाच्या मजुरांनीं संप केला कीं, त्यांना सहानुभूति दाखविण्यासाठीं व मालकांना शरण आणण्यासाठीं इतर संघांतील मजूरही संप कर-

ण्यास तयार असतात. असा सार्वत्रिक संप सुरू झाला तर काय अनर्थ होईल याची कल्पना करवत नाहीं.

याप्रमाणें गेलीं शंभर वर्षें इंग्लंडांतील मजुरांनीं व्यवस्थितपणें चळवळ चालवून पुष्कळ सवलती मिळविल्या. पार्लमेंटमध्यें जाऊन तेथें मजुरांची बाजू मांडण्यासाठीं २५।३० वर्षांपूर्वीं 'मजूरपक्ष' नांवाचा नवीन पक्ष स्थापन झाला व या पक्षातर्फे कांहीं लोक पार्लमेंटांत निवडूनही आले. या पक्षानें नेटानें काम करून व आपल्या कार्यक्रमाची सत्यता जनतेस पटवून सन १९२९ सालच्या पार्लमेंटच्या निवडणुकींत बहुमत मिळविलें. हें पुस्तक लिहिलें जात आहे त्यावेळीं ब्रिटिश साम्राज्यावर मजूरपक्षाचें प्रधानमंडळ राज्य करीत आहे व विद्यार्थीदशेंत ज्यांना चहाची तहान गरम पाणी पिऊन भागवावी लागली ते मि. मॅक्डोनल्ड मुख्य प्रधान आहेत.

इंग्लंडच्या पूर्वभागांतील जमीन सखल असून तिकडे पाऊस बेताचा पडतो व उन्हाळ्यांत हवा उष्ण असते. ही स्थिति गव्हास अनुकूल असल्यानें शेंकडों वर्षांपासून या भागांत गव्हाची लागवड करितात. त्याचप्रमाणें उत्तरेकडील यॉर्कशायरमध्यें चाळीस मैल रुंदीचें विस्तृत व अत्यंत सुपीक खोरें आहे. तेथेंही गहूं चांगला पिकतो. इंग्लंडचें महत्त्वाचें पीक म्हणजे गहूंच आहे. परंतु देशांत पिकणारा गहूं पुरत नसल्यानें ऑस्ट्रेलिया, कॅनडा वगैरे देशांतून गहूं व गव्हाचें पीठ आणावें लागतें. गव्हाखेरीज दुसरीं पिकें म्हणजे बार्ली व ओट हीं होत. यांना निकस जमीन चालत असल्यानें त्यांचें पीक इंग्लंडांत पुष्कळ येतें. याशिवाय नैऋत्येकडील प्रदेशांत स्ट्रॉबेरी, चेरी, सफरचंद व हॉप नांवाचीं झाडें यांची लागवड मोठ्या प्रमाणांत होते. या भागांतील बागवान वर्षभर फळझाडें लावून निरनिराळीं फळें आगगाड्यांतून रोज लंडनला पाठवीत असतात. इंग्लंडांतील शेतकरी व बागवान कारखानदारांइतकेच

कुशल आहेत. योग्य तीं खतें वापरून जमिनीची मशागत नीट करून, कोणत्या पिकानंतर कोणतें पीक काढणें फायदेशीर आहे हें पारखून त्याप्रमाणें पिकांचा अनुक्रम साधून ते वर्षभर काम करितात व थोड्या जमिनीवर पुष्कळच पैका मिळवितात. ईस्ट अँग्लियामधील शेतकरी एका एकराला बत्तीस बुशेल गहूं पैदा करितो. आपल्या पंजाबांत पाटाखालच्या उत्तम जमिनींतसुद्धां फार झालें तर एकरीं वीस बुशेल गव्हाचें पीक होतें. इंग्लंडांत पावसाळा असा वेगळा मोसम नाहीं. वर्षभर झिमझिम पाऊस पडत असतो. तेव्हां इंग्रज शेतकऱ्याला दुष्काळाची भीति व पाटाच्या पाण्याची दगदग नसते हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

इंग्लंडांत शेतावर बैलाऐवजीं घोड्यांचाच उपयोग करितात. वाफेनें चालणारे नांगर व कापणीचीं यंत्रें निघाल्यापासून पुष्कळ शेतकरी त्यांचा उपयोग करितात. उत्तरेकडील व मध्यभागांतील कारखान्यांच्या प्रदेशासारखी शेतकीप्रधान प्रदेशांत दाटी नाहीं. या भागांत अद्यापि लहान लहान खेडीं असून तिकडील सृष्टि-सौंदर्य वाखाणण्यासारखें असतें. खेड्यांत दोन प्रकारचे लोक राह-



'इंग्लंडांतील एक खेडें'

तात. शेतकरी व त्यांच्या शेतावर काम करणारे मजूर. शेतकरी लंडनला किंवा इतर शहरांत राहणाऱ्या जमीनदारांपासून खंडानें शेतें घेतात व शेताजवळच घर करून राहतात. त्यांचीं घरें टुमदार दोन तीन मजल्याचीं असतात. परसांत बगिचा असतो व तेथें भाजीपाला लावितात. शेजारींच घोड्यांचा तबेला व गाईंचा मोठा गोठा असतो व त्याच्यापाशीं व्यवस्थितपणें रचलेली गवताची गंज असते. घरापुढें कोंबड्यांचें खुराडें असतें व इकडे तिकडे कोंबड्या बदकें व डुकरें फिरत असतात. घरावर वेली सोडलेल्या असतात. प्रत्येक शेतास कुंपण घातलेलें असतें.



'इंग्लंडांतील शेतकऱ्याचें घर'

मजूर शेतकऱ्यांच्या मालकीच्या झोपड्यांत राहतात व त्यांच्या मजुरींतून झोपडीचें भाडें कापलें जातें. झोपडीच्या मागें भाजीपाला लावायाला थोडीबहुत जागा असते. थोड्याशा खंडावर मजुरांना लहानसा शेताचा तुकडा मिळूं शकतो. त्याला अलॉटमेंट म्हणतात. यामध्यें भाजीपाला लावून मजूर लोक आपल्या अपुऱ्या मजुरींत भर

घालतात. या मजुरांची स्थिति समाधानकारक नाहीं. गिरणीकामगारांसारखें त्यांचे संघ नाहींत. मोसम चांगला असेल तर त्यांना वर्षभर काम मिळतें. नाहींतर मधून मधून जेव्हां मिळेल तेव्हां काम करावें लागतें. महायुद्धापूर्वी ते थोडेबहुत पैसे जमवून खंडानें शेत घेत. आतां दिवसेंदिवस खंडानें लहानसान शेतें मिळणें कठीण झालें आहे.

खेडेगांवाबाहेर एक उंच इमारत असते. हें गांवचें देऊळ होय. यांत रविवारीं गांवांतील सर्व माणसें मुलांबाळांसह स्वच्छ कपडे घालून देवाची प्रार्थना करण्यास जमतात. या देवळांतच गांवांतील लग्नें लागतात व मुलांचें नामकरण व बाप्तिस्मा होतो. कोणी मेलें म्हणजे त्याचें शव देवळांत आणितात व धर्मोपदेशकानें मृताविषयीं प्रार्थना केल्यावर देवळाच्या मागें मोठें आवार असतें तेथें प्रेताला लाकडी पेटींत घालून जमिनींत ती पेटी पुरतात व जमल्यास पुरलेल्या जागेवर स्मारक म्हणून एक दगड रोवतात व त्यावर मृताचें नांव खोदतात. इंग्लंडांत प्रेतें जाळण्याची चाल नाहीं. देवळाशिवाय दुसरें महत्त्वाचें ठिकाण म्हणजे शाळा होय. इची इमारत लहानशी पण टिकाऊ असून तिच्यांत उजेड व हवा भरपूर असते. मुलांना बसण्यास बाक व लिहिण्यास डेस्क असतात. मुलांना पुस्तकें, वह्या, टाक, पेन्सिली सरकारांतून पुरविलीं जातात.

इंग्लंडांतील सरदार लोकांचे लंडन राजधानींत मोठमोठे वाडे आहेत व पार्लमेंट सुरू असतांना ते या वाड्यांत राहतात. परंतु, प्रत्येक सरदाराचा त्याच्या वतनाच्या गांवीं वाडा असतो. हे वाडे जुने व विस्तृत असून त्यांच्याभोंवतीं शोभिवंत बगिचे असतात. वाड्यांत जुन्या काळचीं बहुमोल चित्रें व लाकूडसामान असतें. सरदार लोक वर्षांतून कांहीं महिने आपल्या वतनवाडीवर घालवितात. ते आपल्या कुळांशीं व इतर शेतकऱ्यांशीं मिळूनमिसळून

वागतात. आपल्या मित्रमंडळींना पाहुणचारासाठीं आपल्या गांवीं बोलावून त्यांच्यासह शिकारी व सहली करावयाच्या असा या सरदारांचा प्रघात असतो. हे सुशिक्षित असून आपल्या वतनवाडीकडे त्यांचें चांगलें लक्ष्य असतें. इंग्लंडांत शेतीची सुधारणा करण्याचें बरेचसें श्रेय यांच्याकडे आहे.

आपल्याकडे इनामदार, दरकदार पूर्वी वतनवाडीवर राहत व तिच्यावर त्यांचें फार प्रेम असे. महादजी शिंदे मोठेपणास चढले तरी त्यांना वतनाचा अभिमान वाटे व पाटिलबुवा म्हणून घेण्यांत भूषण वाटे. अलिकडे इनामदार व पांढरपेशी पेन्शनर लोकांना पुण्यासारख्या शहरांत राहणें आवडतें. हे जर आपापल्या गांवीं राहतील व तेथील लोकांत मिसळतील तर किती बरें होईल.

इंग्रज लोक व्यक्तिस्वातंत्र्याचे किती भोक्ते आहेत ते त्यांच्या कुटुंब व्यवस्थेवरून स्पष्ट होते. त्यांच्यामध्यें आपल्याप्रमाणें अविभक्त-कुटुंबपद्धत नाहीं. मुलगा रोजगार करूं लागून आपलें व बायकोचें पोट भरण्यास समर्थ होईपर्यंत लग्न करीत नाहीं. लग्न झाल्याबरोबर तो बायकोला घेऊन वेगळें घर करून राहतो. आईबाप, तीन-चार भाऊ, त्यांच्या बायका व मुलें, दोनतीन जवळचे किंवा लांबचे इतर नातलग यांनीं इंग्रजांचें घर भरलेलें नसतें. सासुरवास, जावानणंदाची धुसपुस, जावाजावांची कुरबुर, मुलांवरून भांडणें वगैरे प्रकार इंग्रज कुटुंबांत दिसणार नाहींत. तें सुटसुटीत असतें. जो तो वेगळ्या घरांत आपल्या आवडीप्रमाणें राहतो. भाऊ वेगळे राहिले म्हणून त्यांच्यांत प्रेम नसतें असें नाहीं. ते एकमेकांस भेटतात, एकमेकांकडे जेवणास जातात व सुखदुःखाच्या गोष्टी करितात.

इंग्रजांचीं घरेंही व्यक्तिस्वातंत्र्यास पोषक अशींच असतात. गरीब कामगार वर्गाची गोष्ट सोडून द्या. मध्यम व वरच्या वर्गांतील कुटुंबांत प्रत्येकाला निजण्यास वेगळी खोली असते. मूल तीन-

चार वर्षांचें झालें म्हणजे आईवेगळें दुसऱ्या खोलींत निजतें. संध्याकाळचें सहा वाजलें कीं, आई मुलाला न्हाऊं व खाऊं घालते आणि त्याला त्याच्या खोलींत अंधारांत निजवून आपल्या कामाला लागते. दुपारीं सुद्धां मुलांना घरामागील बागेंत उघड्यावर ढकलगाडींत निजवितात व त्याच्यापाशीं कोणी बसत नाहींत.

सुखवस्तु कुटुंबांत लहान मुलांची खेळण्याबागडण्याची स्वतंत्र खोली असते. तिला नर्सरी म्हणतात. या नर्सरींत मुलांचीं खेळणीं, चित्रें, चित्रांचीं पुस्तकें, घर बांधण्याच्या लांकडी विटा, मेकॅनो वगैरे साहित्य असतें.

इंग्रजांच्या घरांचें दार-प्रत्येकाच्या खोलींचें दार—नेहमीं बंद असतें. घरांत यावयाचें असल्यास दरवाजाजवळील विजेचें बटण दाबावें लागतें किंवा दार ठोठवावें लागतें. खोलींत यावयाचें असल्यास आधीं ठोठावलें पाहिजे व 'आंत या' असें म्हटल्यावर आंत गेलें पाहिजे. इंग्रज गृहस्थाचें घर म्हणजे त्याचा किल्ला आहे अशी एक म्हण आहे व ती व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीनेंही सार्थ आहे.

इंग्रजांचें व्यक्तिस्वातंत्र्य त्यांच्या स्थानिक स्वराज्य पद्धतींत आणि सामाजिक संस्थांच्या कारभारांत उत्तमप्रकारें दृष्टीस पडतें. इतर देशांत जीं अनेक कामें सरकारला प्रत्यक्ष करावीं लागतात तीं इंग्लंडांत जनता आपल्या जबाबदारीवर करिते. त्यांच्यांत सरकारनें हात घालणें इंग्रज समाजाला कधीं खपणार नाहीं. परवा परवांपर्यंत सरकारी शिक्षणखातें इंग्लंडांत नव्हतें व आज जरी तें आहे तथापि सल्ला व पैशाची मदत देणें या पलीकडे त्याला अधिकार नाहीं. याचें बीजही व्यक्तिस्वातंत्र्यांतच आहे. लंडनसारख्या मोठ्या शहरांतले दवाखाने सरकारची पै न घेतां खाजगी मदतीवर चालले आहेत. सरकारचा त्यांच्यावर कांहीं ताबा नाहीं.

इंग्लंडांतील विविध प्रकारच्या समाजसुधारणांचा इतिहास म्हणजे खाजगी व्यक्ति व खाजगी संस्था यांच्या कर्तबगारीचा इतिहास आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. एखादी गोष्ट करणें इष्ट आहे असें एका दोघांस वाटलें म्हणजे ते सभा बोलावितात, व आपले हेतु व योजना स्पष्ट करितात. तात्काळ वेगवेगळ्या कमिट्या नेमल्या जातात व पद्धतशीर रितीनें कामास सुरवात होते. कोणी वर्गण्या जमवितात, कोणी लोकजागृति करितात. संथपणानें अनेक वर्षें काम चालू असतें. कांहीं काळानें पार्लमेंटांतील एखाददुसरा सभासद तो प्रश्न हातांशीं घेतो व पार्लमेंटपुढें मांडतो. लोकजागृति नीट झाली असल्यास कायदे पास होतात व सुधारणेचा प्रसार सार्वत्रिक होतो.

कांहीं समाजकार्य करावयाचें झाल्यास सभेंत जमणें, कमिट्या नेमणें, कामें वाटून घेणें व तीं नियमित व चोख करणें हें इंग्रजांच्या अंगवळणीं पडलें आहे. सुखवस्तु कुटुंबांतील स्त्री व पुरुष दोघेही आठवड्यांतून दोन तीनदां तरी संध्याकाळचे जेवण झाल्यावर कसल्यातरी सभेला किंवा कमिटीला जातातच. चारचौघांनीं जमावयाचें, खल करावयाचा व बहुमत ठरेल त्याप्रमाणें प्रत्येकानें काम करावयाचें ही इंग्लंडची 'कमिटी–संस्था' अपूर्व आहे. इंग्रज लोक 'तज्ज्ञां' वर विश्वास ठेवून त्यांच्या अंगावर सर्व काम व जबाबदारी टाकून कधीं मोकळे होणार नाहींत. इंग्लंडच्या युद्धखात्याच्या मुख्य अधिकाऱ्याची जागा अद्यापपर्यंत कधींही धंदेवाईक शिपायाला मिळाली नाहीं. शिक्षणखातें, स्थानिक स्वराज्यखातें वगैरे खातीं लोकनियुक्त प्रतिनिधींच्या ताब्यांत असतात व त्या त्या खात्यांतील कायमच्या पगारी अधिकाऱ्यांना या प्रतिनिधींचे हुकूम ऐकावे लागतात.

व्यक्तिस्वातंत्र्यप्रिय इंग्रज समाजांत पुरुषाइतकीच स्त्रियांना मोक-

ळीक व सत्ता असणें उघड आहे. इंग्रजस्त्रिया पुरुषांप्रमाणें सर्व धंदे करितात व मनास वाटल्यास जन्मभर लग्न न करितां स्वतंत्रपणें राहतात. असा कोणताही पुरुषी खेळ आतां शिल्लक राहिला नाहीं कीं जो स्त्रिया खेळत नाहींत. स्त्रियांच्या पेहरवांतही अलीकडे पुष्कळ फरक पडला आहे. त्या गुडघ्याइतके तोकडे परकर नेसतात व मानेपर्यंत केंस ठेवितात. कांहींजणी अगदीं पुरुषाइतके आखुड केंस ठेवितात. इंग्रज पुरुषांच्या अंगावर वाजवीपेक्षां जास्ती व स्त्रियांच्या अंगावर वाजवीपेक्षां कमी कपडे असतात असें कांहीं लोक म्हणतात; परंतु कमी कपडे घालूं लागल्यापासून इंग्रज स्त्रियांची शरीरप्रकृति अधिक सुधारली असें डॉक्टर लोकांचें मत आहे.

आमच्या इकडील आया किंवा सासवा मुलगी घरांतील काम करीत नसल्यास तिला तूं काय आतां मड्डम होणार वाटतें? असें टोंचून बोलतात. वास्तविक 'मडमां' ना कितीतरी काम असतें. इंग्लंडांत फार महागाई असल्यानें मध्यम स्थितींतील कुटुंबांतसुद्धां मोलकरीण ठेवणें झेंपत नाहीं. ठेवलीच तर वरवरच्या कामास ठेवितात. स्वयंपाक करणें, कपडे धुणें, वाळविणें व इस्त्री करणें, कपडे शिवणें, रफू करणें, बाजारहाट करणें, हिशेब ठेवणें व पत्रें लिहिणें हीं सर्व कामें घरधनिणीलाच करावीं लागतात. परंतु तीं नवीन पद्धतीनें व वेळच्यावेळीं केल्यानें त्यांना लिहिण्या वाचण्यास व गायनवादनास फुरसत मिळतें व संध्याकाळच्या जेवणानंतर सभा, सिनेमा, नाटकें, गाण्याचे जलसे वगैरेला जातां येतें.

रविवारचा दिवस विश्रांतीचा असतो. या दिवशीं रेस्टॉरंट, सिनेमा व नाटकें बंद असतात व कुटुंबांतील माणसें एकमेकांच्या सहवासांत दिवस घालवितात. सकाळीं देवळांत प्रार्थनेस जातात व दुपारीं मुलाबाळांना घेऊन बागेंत फिरण्यास जातात. कांहीं कुटुंबें शनिवार, रविवार हे दिवस समुद्रकांठच्या एखाद्या हवा खाण्याच्या

गांवीं घालवितात. रात्रीं बाहेर जावयाचे नसेल तेव्हां कुटुंबांतील मंडळी दिवाणखान्यांत शेगडीभोंवतीं एकत्र जमतात. कोणीं पुस्तक वाचतो, कोणी पियानो वाजवितें, कोणी गातें. दिवसभराची एकमेकांची खबरबात याचवेळीं एकमेकास कळते. कारण साडेआठ नवाला माणसें जीं कामाला बाहेर पडतात तीं संध्याकाळीं सहा साडेसहाला परत येतात. दुपारचें जेवण जो तो आपल्या कामाच्या ठिकाणीं जवळच्या हाटेलांत घेतो.

इंग्रज लोक उघड्या मैदानावरील खेळाचे फार शोकी आहेत. महत्त्वाच्या क्रिकेटच्या किंवा फुटबॉलचे सामने पाहण्यास चाळीस पन्नास हजारापर्यंत लोक जमतात. शाळांत व कॉलेजांत मर्दानी खेळांना फार महत्त्व दिलें जातें. उत्तम खेळाडूला इंग्रज समाजांत मोठा मान मिळतो. १९२६ सालच्या उन्हाळ्यांत जर कोणा इंग्रज गृहस्थांस 'इंग्लंडांत सर्वांत लोकप्रिय पुरुष कोण आहे' असा प्रश्न विचारला असतां तर चट्कन् त्यानें क्रिकेटपटु हॉब्जचें नांव घेतलें असतें. खेळाच्या नियमाप्रमाणें खेळणें व प्रतिपक्षास नियमाविरुद्ध खेळून न फसविणें या प्रवृत्तीमुळें इंग्लिश लोकांत सचोटीनें व शिस्तीनें वागण्यास fair play म्हणजे सचोटीनें 'खेळणें' असें नांव पडलें आहे. ही खेळाच्या मैदानावर पैदा केलेली सचोटी व शिस्त खाजगी आचरणांत आणि सामुदायिक राजकारणांत दिसून येते. कोणी गैरशिस्त वागल्यास इंग्रज गृहस्थ पटकन् This is not cricket असें म्हणेल.

शिस्तीचें एक उत्तम उदाहरण म्हणजे इंग्लंडांतील 'क्यू' (queue) ची पद्धत. क्यू म्हणजे एकामागें एक रांगेनें उभें राहणें व आपली पाळी आली म्हणजे पुढें होणें. इंग्लंडमध्यें आगगाडीच्या तिकिट ऑफिसजवळ जा, ट्रॅमगाड्या व ऑमनीबसच्या नाक्याजवळ जा किंवा नाटक सिनेमाच्या तिकीट ऑफिसपाशीं जा

कधींही गोंधळ, धक्काबुक्की व शिवीगाळी ऐकूं येणार नाहीं. सर्वजण 'क्यू' मध्यें रांगेनें उभे राहतात व पाळी आली म्हणजे तिकिट घेतात किंवा ट्रॅममध्यें चढतात. एखाद्या लोकप्रिय नाटकाच्या आरंभींच्या प्रयोगांना अतोनात गर्दी होते. परंतु आठ आठ दहा दहा तास लोक शांतपणें क्यूमध्यें उभे राहतात.



" इंग्लंडांतील जमिनीच्या पोटांतील आगगाडी ( ट्यूब )"

लहानपणापासून मनावर ताबा ठेवण्याच्या सवयीमुळें अशा प्रकारची शिस्त अंगवळणीं पडते. इंग्रज मनुष्य सहसा मनांतील भावना व्यक्त करून दाखविणार नाहीं. त्याचे ओठ घट्ट मिटलेले असावयाचे. कितीही भीति वाटली किंवा प्रेमभावना उद्‌भूत झाली तरी तो ती अघळपघळ रितीनें व्यक्त करणार नाहीं. आईनें शाळेंतील चार सवंगड्यासमोर मुका घेतलेला इंग्रज मुलाला खपावयाचा नाहीं. त्यापेक्षां तिनें थोबाडींत मारली तरी त्याला पत्करेल. भाषण करितांना इंग्रजाचा आवाज भावनेनें कापणार नाहीं किंवा त्याचे डोळे ओले होणार नाहींत. आगगाडीच्या डब्यांत तुमच्या शेजारीं इंग्रज उतारू बसला तर तो एक शब्द बोलणार नाहीं. तुमच्या हातांतील

वर्तमानपत्र खालीं पडलें तर तात्बडतोब तें उचलून देईल किंवा तुमचें सामान उचलण्यास मदत करील पण परत घुम्यासारखा बसेल. खडतर समाजसेवा व उज्वल स्वार्थत्याग करितांना रोजचें कारखान्यांतील किंवा कचेरींतील काम करण्यासारखें इंग्रजाचें संथ वर्तन असतें.

या धिम्या व जड वृत्तीमुळें इंग्रज मनुष्य स्वभावतः क्रांतीपेक्षां उत्क्रांतीचा चहाता आहे. त्याला एकदम एखादी गोष्ट बदलणें आवडत नाहीं व एखाद्या नवीन गोष्टीविषयीं त्याची लवकर खात्री पटत नाहीं. उलट त्याला स्वतःला एखादी गोष्ट पटल्यास ती इतरांना पटवून देण्यास त्याला अनेक वर्षें लागलीं तर तो कंटाळत नाहीं व डोकें फिरवून घेत नाहीं. त्याच्या या जन्मस्वभावामुळें त्याला परदेशांतील राजकारण अनेक प्रसंगीं कळत नाहीं व कळल्यास त्याला त्या भावनांशीं समरस होण्यास वेळ लागतो. तथापि याच धिमेपणामुळें इंग्रज समाजास व सरकारास एकप्रकारचें स्थैर्य आलें आहे व त्याची हातचें सोडून पळत्याच्या पाठीमागें लागणाऱ्या भावनावश व चंचल वृत्तीच्या राष्ट्रांत उणीव भासतें हें कबूल केलें पाहिजे.

---

## प्रकरण १७ वें

# अमेरिकन लोक

आतां आपण अमेरिकेला भेट देणार आहोंत. अमेरिका खंडाचे दक्षिण अमेरिका व उत्तर अमेरिका असे दोन भाग आहेत. उत्तर अमेरिकेंत क्यानडा आणि संयुक्त संस्थानें असे दोन देश मोडतात. परंतु संयुक्त संस्थानें हींच अमेरिका या नांवानें ओळखिलीं जातात.

त्यांचाच विचार आपण या शेवटच्या प्रकरणांत करणार आहोंत.

अमेरिका हा एक वैभवसंपन्न भाग्यशाली देश आहे. हा देश फार अवाढव्य आहे. तो विस्तारानें हिंदुस्थानाच्या सुमारें दुप्पट व ग्रेट-ब्रिटनच्या तर चौतीसपट आहे. या अफाट प्रदेशांत शेंकडों नद्या असून देशाचा विस्तार मोठा असल्यानें त्या लांबवर वाहत जातात. या नद्यांच्या कांठचा प्रदेश फार सुपीक आहे. जगांत पिकणाऱ्या गव्हांपैकीं एक चतुर्थांश गहूं एकट्या अमेरिकेंत पिकतो. जगांतील सर्व इतर देश मिळून जितका कापूस पिकतो त्याहून अधिक कापूस अमेरिकेंत होतो. अमेरिकेच्या बागा विस्तृत असून त्यांत लाखों नारिंगें, सफरचंद व इतर फळें होतात आणि ऊसही मोठ्या प्रमाणांत पिकतो. अमेरिकेच्या खाणींतून ऑस्ट्रेलिया व दक्षिण आफ्रिका या देशांच्या खाणींइतकेंच विपुल सोनें व इंग्लंडच्या खाणींइतकाच विपुल कोळसा निघतो. इतर कोणत्याही देशापेक्षां लोखंड व रुपें अमेरिकेंत अधिक निघतें व जगांत पैदा होणाऱ्या तांब्याचा अर्धा भाग अमेरिकेचा आहे. अमेरिकेच्या रानांतून इतर देशांपेक्षां जास्त इमारतीचें लाकूड निघतें व तेथील कुरणांत असंख्य गाई व डुकरें चरत असून त्यांच्या मांसाचा व्यापार प्रचंड आहे.

अमेरिकेच्या शेंकडों नद्यांवरील हजारों धबधब्यांच्या योगानें जी प्रचंड विजेची शक्ति निर्माण होते ती हजारों सुताच्या व लोंकरीच्या कापडाच्या गिरण्या आणि लोखंडाचे व इतर सहस्रावधि कारखाने चालविते. या भाग्यशाली देशाचा समुद्रकिनारा फार विस्तृत असून त्यावर मासे धरण्याचा धंदा फार मोठ्या प्रमाणांत चालतो. शिवाय तेथें शेंकडों सोईस्कर बंदरें असून त्यांतून अनेक जहाजें रोज अमेरिकेचा नाना प्रकारचा माल घेऊन जगाला देतात.

अमेरिकेच्या लोकांजवळ अतोनात पैसा आहे. तेथील कांहीं व्यापाऱ्यांजवळ अब्जावधि संपत्ति असून त्यांचा दानधर्म कोटींनीं

मोजण्याइतका असतो. अमेरिकन मजूर रोज पंधरा रुपये मिळवितो आणि शेतकरी व गवळी स्वतःच्या मोटारींतून कामाला जातात. तेथें मोटारी इतक्या आहेत कीं पांच माणसाला एक मोटार हें प्रमाण पडतें. अमेरिकन सरकार फार सधन असून युरोपांतील मोठमोठीं राष्ट्रें त्याचे ऋणको आहेत. सारांश, शेती, खनिज संपत्ति, गुरेंढोरें, कारखाने व व्यापार या सर्व बाबतींत अमेरिका आज जगाच्या पुढें आहे.

अमेरिकेंत साडेदहा कोटी लोक राहतात. ते बहुतेक युरोपियन जातींचे आहे. परंतु तीनशें वर्षांपूर्वीं या अफाट देशांत एकही युरोपियन मनुष्य नव्हता. सर्व देशभर भयंकर अरण्य पसरलें होतें व त्यांतून अनेक जातींचे, तांबूस रंगाचे, पट्टे काढलेले व डोंकीवर पिसें खोवलेले रानटी लोक शिकार करून आपली उपजीविका करीत.



"रेड इंडियन"

सोळाव्या व सतराव्या शतकांत इंग्लंडमध्यें लोकांचा त्यांचा धर्ममतांबद्दल छळ होत होता व पुष्कळांना आपल्या धार्मिक मतांप्रमाणें वागतां येत नसे. त्यामुळें धर्मत्यागापेक्षां देशत्याग पतकरला असें वाटून इ.स. १६२० त कांहीं धर्मशील लोक इंग्लंड सोडून या नव्या देशांत राहण्यास आले. इतर कांहीं लोक कांहींतरी धाडस करावयाचें म्हणून आले. या नव्या लोकांनीं झाडी तोडली, लागवड केली व घरें बांधलीं. त्यांना आरंभीं रानटी लोकांनीं फार त्रास दिला व थंडीनें त्यांचे फार हाल झाले पण ते दृढनिश्चयी लोक तसेच टिकाव धरून राहिले.

अमेरिकेंत धर्मस्वातंत्र्य आहे हें ऐकून इतर देशांतील लोकही येऊं लागले. त्याचप्रमाणें परसत्तेखालीं गांजलेल्या अशा नाना देशांतल्या हजारों युरोपियनांनीं प्रजासत्तावादी व समतेच्या भोक्त्या अमेरिकेकडे धांव घेतली. पुष्कळसे गरीब युरोपियन स्वदेशांत पोटास मिळण्यास साधन नाहीं म्हणून या नव्या सुपीक देशांत येऊन लागवड करून राहूं लागले. याप्रमाणें अनेक कारणांमुळें लक्षावधि युरोपियन लोकांचा अखंड प्रवाह सुमारें सवाशें वर्षें अमेरिकेकडे वाहत होता. १९१० मध्यें अमेरिकेच्या लोकसंख्येंपैकीं अर्धा भाग असा होता कीं, ते स्वतः किंवा त्यांचे आईबाप परक्या देशांत जन्मलेले होते. आरंभींचे वसाहतवाले इंग्रज होते. त्यांच्यांत सर्व जातींच्या लोकांची पुढें भर पडत गेली. न्यूयॉर्क बंदराच्या धक्क्यावर उभे राहिलें असतां आपल्याला किंचित् काळसर वर्णाचे इटालियन, रशिया व पोलंडमधील लांब दाढ्यांचे व फिक्या रंगाचे ज्यू, पायांत लाकडी जोडे घांतलेले डच, लाल कानटोप्यावाले ग्रीक, आणि आयर्लंड, इंग्लंड, जर्मनी, स्वीडन, नार्वे वगैरे देशांतील हजारों लोक आपलीं गाठोडीं व मुलेंबाळें घेऊन जहाजांतून उतरतांना दृष्टीस पडतात.

सारांश, अमेरिका म्हणजे वर्णसंकर व राष्ट्रसंकर यांचें एक उत्तम क्षेत्र आहे. नाना देशांतले, नाना भाषा बोलणारे, नाना धर्मपंथाचे लाखों लोक तेथें एकत्र आले आहेत. तथापि या लोकांच्या आपसांत मारामाऱ्या झाल्या नाहींत व त्यांनीं तेथें आपले सवते सुभेही स्थापन केले नाहींत. अमेरिकेंत येण्यापूर्वीं ते कोणी का असत ना, अमेरिकेंत आल्यावर थोड्याच वर्षांत चालीरिती आणि आचारविचार या बाबतींत ते शंभर नंबरी अमेरिकन बनत व परस्परांत रोटी व बेटीव्यवहार होऊन ते एकरूप होऊन जात. त्याचप्रमाणें मूळची त्यांची कोणचीही मायबोली असली तरी अमे-

रिकेंत आल्यावर त्यांच्या मुलांना शाळांत एकच राष्ट्रीय भाषा—इंग्रजी -- शिकावी लागे. अमेरिकन सरकारनें निरनिराळ्या भाषा बोलणाऱ्या वसाहतवाल्यांसाठीं वेगळ्या शाळा काढल्या नाहींत.

याप्रमाणें हें अद्भुत संघटण यदृच्छेनें झालें नाहीं. दूरदर्शी अमेरिकन सरकारनें तें प्रयत्नानें व पद्धतशीर रितीनें घडवून आणिलें आणि त्याचें वसाहतखातें, शिक्षणसंस्था, वर्तमानपत्रें व ग्रंथकार यांचे प्रयत्न या एकीकरणाला कारण झाले आहेत.

उद्योगधंदे, हवामान व भूपृष्ठरचना या बाबतींत अमेरिकेचे पांच भाग पडतात. १ पूर्व किनाऱ्यावरील न्यू इंग्लंड नांवाच्या वसाहती, २ पूर्व किनाऱ्याचा मध्यभाग, ३ दक्षिण भाग, ४ मध्यभाग, ५ पश्चिम किनारा.

१ न्यू इंग्लंड हा प्रदेश उत्तर समशीतोष्ण कटिबंधांत असून तेथें उन्हाळ्यांत उष्णता साधारणच असते; परंतु हिवाळ्यांत मात्र थंडी मनस्वी असते. तीन चार महिने जमिनीवर बर्फाचा थर असतो आणि नद्या व सरोवरांवर तर दोन तीन फूट बर्फ सांचतें. या भागांतील जमीन डोंगराळ व खडकाळ असल्यानें तेथें मोठ्या प्रमाणावर शेती करितां येत नाहीं. इतर भागांच्या मानानें हा भाग फार लहान आहे. तथापि येथें लोकवस्ती फार दाट असून शेकडों शहरें जवळ जवळ नांदतात. याचें कारण या भागांतील हजारों कारखाने व प्रचंड व्यापार हीं होत. न्यू इंग्लंडच्या पश्चिम बाजूस डोंगरांची ओळ आलेली आहे व तिच्यांत अनेक नद्या उगम पावून न्यू इंग्लंडमधून वाहत जाऊन समुद्राला मिळतात. या नद्यांच्या धबधब्यापासून मिळणाऱ्या विजेच्या शक्तीनें न्यू इंग्लंडचें कापड, लोंकर, बूट, घड्याळें, चाकू, बटणें, कागद, बंदुका, तोफा वगैरे वस्तूंचे कारखाने चालतात. या भागांत कापूस पिकत नाहीं, पण तो दक्षिण भागांतून आणितां येतो.

न्यू इंग्लंडच्या किनाऱ्याला शेंकडों बंदरें आहेत. मेन नांवाच्या संस्थानाचा किनारा तर करवतीसारखा असून त्या संस्थानास "शंभर बंदराचें" संस्थान म्हणतात. या सर्व बंदरांतून अमेरिकेच्या अफाट व सुपीक प्रदेशांतील धान्य व खाणींतील धातु युरोपांत रवाना होतात व युरोपांतील माल हींच बंदरें अमेरिकेला वाटून देतात.

२ पूर्व किनाऱ्यावरील मध्यभागसुद्धां न्यू इंग्लडप्रमाणें कारखान्यांनीं गजबजलेला आहे. प्रसिद्ध न्यूयॉर्क शहर या भागांतच आहे. नुसत्या या शहरांतच वीस हजार कारखाने चालतात. फिलाडेल्फिया शहरांत कापडाचे, जहाजे व आगगाड्या बनविण्याचे, बंदुका तोफा तयार करण्याचे हजारों कारखाने आहेत. मध्यभाग डोंगराळ नसल्यानें तेथें कारखाने विजेच्या शक्तीनें चालत नाहींत, कोळशावर चालतात.

युरोपखंडाच्या वीसपट कोळसा अमेरिकेंतील खाणींतून निघतो असें म्हणतात. यापैकीं अर्धा या पूर्व किनाऱ्यावरील मध्य भागांतीन पेनसिल्व्हेनिया या एकट्या संस्थानांतून निघतो. या संस्थानांत विल्कसबरी गांवाजवळ एक मोठी कोळशाची खाण आहे. तिच्यांतून निघणाऱ्या कोळशाची किंमत अमेरिकेंतील सर्व खाणींतून निघणाऱ्या सोन्यापेक्षां अधिक असते. दरवर्षी या खाणींतून सात कोटी टन कोळसा निघतो. विल्कसबरी खाणीचा शोध अकस्मात लागला. ॲलन नांवाचा एक मनुष्य शिकार करीत असतां हल्लीं खाण आहे त्या जागीं रात्रीं झोपला. थंडी वाजूं नये म्हणून त्यानें जवळ शेकोटी पेटवून ठेवली होती. मध्यरात्रीं जीव गुदमरल्यामुळें तो दचकून उठला. पाहतो तों ज्या दगडावर त्यानें शेक केला होता त्यानेंच पेट घेतला होता. हा दगड दगडी कोळसा होता. यापूर्वी दगडी कोळशाचा उपयोग अमेरिकम लोकांना माहीत नव्हता.

या दगडी कोळशाच्या मुलखांत इतका कोळसा निघतो कीं, त्याची वाहतूक करण्यास एका रेल्वे कंपनीला नऊशें इंजनें व पन्नास हजार डबे लागतात व दुसरीस सत्तर हजार डबे लागतात. यांशिवाय अनेक नद्यांतून जहाजें हा कोळसा घेऊन जात असतातच.

दगडी कोळशाप्रमाणेंच पेन्सिल्व्हॅनिआला दुसरा एक महत्त्वाचा पदार्थ असाच अकस्मात सांपडला. तो पेट्रोलियम म्हणजे खनिज तेल होय. या संस्थानांत ठिकठिकाणीं या तेलाचीं डबकीं सांचलेलीं होतीं; पण कोणी त्यांकडे ढुंकून पाहत नसे. एका शेतकऱ्याच्या शेतांत जमिनींतून हें तेल वर आलें म्हणून थोड्या किमतीस शेत विकून तो दुसरीकडे गेला. पुढें शेताच्या नव्या मालकानें त्याच शेतांतून लाखों रुपयांचें तेल काढलें. इ. स. १८५८ मध्यें टायटस्विल येथें पेट्रोलियमची पहिली विहीर खणली गेली. ती



"तेल काढण्याचा कारखाना"

सत्तर फूट खोल होती. पुढें लवकरच लोकांना आढळून आलें कीं,

खाणींतील तेलाचा खरा उगम फार खोल असतो. म्हणून ते दोन दोन हजार फूट खोल खणूं लागले. इतक्या खोल खणणें सोपें नाहीं. त्यासाठीं अमेरिकन लोकांनीं यंत्रसामर्थ्य लावलें. ते आधीं जमिनी-वर एक उंच मजबूत सांगाडा उभारतात, व त्याला खडकाला भोंक पाडण्याचें यन्त्र लावितात. नंतर जवळच वाफेचें इंजन सुरू करि-तात. त्याच्या योगानें भोंक पाडणारें यंत्र जोरानें खडकावर खालीं आपटतें व त्याला भोंक पाडीत खालीं जातें.

कांहीं विहिरींत खोदतांना तेल लागल्याबरोबर तें उसळून वर येतें व आकाशांत उंच उडतें. आधीं तेलाचें महत्त्व लोकांना माहीत नव्हतें तेव्हां ते आकाशांत तेलाचे फवारे उडवून ती गंमत पाहण्या-करितां तेलाच्या विहिरी खणीत. प्रथम असें लाखों रुपयांचें तेल वाया गेलें असेल. तेलाच्या खाणींचा शोध लागल्यावर त्या भागांत चोहोंकडून हजारों लोक जमा झाले व ओसाड जंगलाच्या ठिकाणीं शहरें थाटलीं गेलीं. तेलाच्या खाणींतून तेलाचे नळ शेकडों मैल न्यूयॉर्क, फिलाडेल्फिया वगैरे अनेक शहरांत आणून सोडले. हे नळ इतके आहेत व ते इतक्या लांबवर नेलेले आहेत कीं, ते एकास एक जोडले तर पृथ्वीस एक कमरपट्टा होईल. पेट्रोलियम शुद्ध करून त्याचें जाळण्याचें तेल (घासलेट) बनवितात, व राहिलेल्या चोथ्याचें केसाला लाविण्याचें व्हॅसलिन होतें. पेट्रोलियमच्या जवळ जवळ दोनशें वस्तु होतात असें म्हणतात.

तेलाच्या खाणीच्या प्रदेशांतच जमिनीच्या पोटांत खनिज वायु सांपडतो. त्या भागांत जमिनींत खोल भोंक पाडलें म्हणजे हा वायु भोंकावाटे बाहेर पडतो व त्याच्या जोरानें दगड व पाणी त्याच्या-बरोबर बाहेर येतें. वायु वर येऊं लागतांच भोंकांत नळ लावितात म्हणजे दगड व पाणी येण्याचें बंद होऊन वायुच नळावाटें वर येतो. याचा इतका जोर असतो कीं, मोठा हातोडा जोरानें वायु

निघत असलेल्या भोंकावर मारला तर तो तसाच पाठीमागें उलटतो. या खनिज ग्यासचा उपयोग कारखाने चालविण्याकडे व घरांना उजेड व उष्णता पुरविण्याकडे करितात व याचेही नळ सर्वत्र नेले आहेत.

३ अमेरिकेच्या दक्षिण भागांतील हवा साधारणपणें उष्ण आहे. तेथें हिवाळ्यांत थंडी कडक नसते व बर्फ पडत नाहीं. न्यू इंग्लंडांत थंडीनें झाडावरचीं एकून एक पानें गळून पडलेलीं व जमिनीवर बर्फ पसरलेलें अशी स्थिति असते त्या वेळीं या दक्षिण भागांतील फळझाडांना फळें येतात व बगिच्यांत फुलें फुलतात. उत्तरेकडील थंडी टाळण्यासाठीं पुष्कळ लोक व विशेषतः आजारी माणसें हिवाळ्यांत दक्षिण भागांत येतात. या भागांतील अगदीं दक्षिणेकडे असलेलें फ्लॉरिडा नांवाचें संस्थान तर हवेसाठीं व फळफळावळासाठीं फार प्रसिद्ध आहे. फ्लॉरिडा या शब्दाचा अर्थच फुलांचा प्रदेश असा आहे. उत्तरेकडे जीं फुलझाडें काचेच्या घरांत प्रयासानें वाढवावीं लागतात तीं फ्लॉरिडांत हिवाळ्यांत उघड्यावर वाढतात. या संस्थानांत दरवर्षीं लाखों खरबुजें, टरबुजें, टमॅटो व रताळीं होतात. त्याचप्रमाणें केळीं, लिंबें, द्राक्षें, प्लम यांचेंही दांडगें पीक येतें. तथापि फ्लॉरिडांतील विशेष प्रसिद्ध फळें म्हणजे नारिंगें व पपनस. तेथें नारिंगांचीं कित्येक झाडें अशीं आहेत कीं त्यांवर पांच हजारांवर फळें येतात. फ्लॉरिडांत नारळीचींही झाडें पुष्कळ आहेत.

या फळझाडांच्या प्रदेशांतून आपण आतां तंबाखूच्या प्रदेशांत जाऊं. दक्षिणेंतील व्हर्जिनिया संस्थानांत तंबाखूची लागवड मोठ्या प्रमाणांत होते. तेथें एके काळीं तंबाखूचें महत्व इतकें होतें कीं, तिचा नाण्यासारखा उपयोग करीत. अमेरिकेचें तंबाखूचें उत्पन्न कधीं कधीं तीस कोटी रुपयांपर्यंत असतें. व्हर्जिनियांत सिगारेट तयार करण्याचे मोठमोठे कारखाने आहेत.

तंबाखूचा प्रदेश सोडून खालीं गेलें म्हणजे कपाशीचा प्रदेश लागतो. अमेरिकेचें कपाशीचें उत्पन्न फार दांडगें आहे. जगांत पिकणाऱ्या एकंदर कपाशीच्या दोन तृतीयांश कपास अमेरिकेंत पिकते. एक जणानें असा हिशेब केला आहे कीं, जगांतील सर्व खाणींतील एक वर्षांत निघलेलें सोनें एका पारड्यांत ठेविलें व अमेरिकेच्या एका वर्षाच्या कपाशीच्या पिकाचें उत्पन्न दुसऱ्या पारड्यांत ठेविलें तर दुसरें पारडें खालीं जाईल. अमेरिकेंतील कपाशीची जात फार चांगली आहे. या कापसाचा फार बारीक धागा निघूं शकतो. हिंदुस्थानांत पुष्कळ कापूस पिकतो, पण चांगलें कापड काढावयाचें असल्यास आपल्या कापसांत अमेरिकन कापूस मिसळावा लागतो.

या कापसाच्या प्रदेशांत वसाहत करण्यास आलेले इंग्रज लोक उत्तरभागांतील लोकासारखें धर्मछळामुळें आले नव्हते. ते लोक शिलेदार, दरखदार असून धाडसी व साहसप्रिय होते. त्यांच्यांतील बरेच लोक ऑस्ट्रेलियन वसाहतवाल्यांप्रमाणें सोन्याच्या आशेनें या दक्षिणभागांत आले होते; परंतु तेथील सुपीक जमीन पाहून ते कपाशीची लागवड करून तेथेंच स्थाईक झाले. न्यूइंग्लंडप्रमाणें त्यांच्या वसाहती डोंगराळ किंवा पर्वताच्या रांगांनीं मर्यादित केलेल्या अशा नव्हत्या. शिवाय त्यांना कारखान्यांत काम करावयाचें नव्हतें. यामुळें ते उत्तरेकडील वसाहतवाल्यांप्रमाणें दाटी करून राहिले नाहींत. प्रत्येकाच्या वाट्याला मुबलक जमीन आली. तिच्यांत त्यांनीं छानदार वाडे बांधले व त्यांत ते ऐषआरामांत राहूं लागले. उष्ण हवेंत कपाशीच्या शेतांत काम करणें फार दगदगीचें. तें या इंग्लंडांतील थंड हवेंतून आलेल्या शिलेदार मंडळींना कसें साधणार व साधलें तरी कसें आवडणार? त्यांनीं आफ्रिकेंतून व्यापाऱ्यांनीं धरून आणिलेले निग्रो स्त्री-पुरुष गुलाम म्हणून विकत घेतले व त्यांच्याकडून शेतांतील व घरांतील सर्व कामें तें घेऊं लागले. हे निग्रो

गुलाम धन्याच्या वाड्याभोंवतीं झोपड्यांत राहत. एक एका वसाहतवाल्यापाशीं शेकडों निग्रो गुलाम असत. कांहीं धनी गुलामांना चांगलें वागवीत. परंतु पुष्कळजण त्यांचा छळ करीत, त्यांना चाबकानें मारीत व उपाशी ठेवीत. आपण बाजारांत जशीं गुरें विकतो किंवा विकत घेतो त्याप्रमाणें या अभागी गुलामांची खरेदी विक्री होत असे. गुलामांच्या शरिरावर धन्यांची पूर्ण सत्ता असल्यानें हजारों वसाहतवाल्यांना स्त्रीगुलामांपासून मुलें झालीं. यांचा रंग कांहींसा उजळ असे. हेही अर्थात गुलामच असत. या उजळ निग्रोंची आपसांत लग्नें झाल्यावर संतति होई ती आईबापांहून अधिक उजळ असे व नाकाडोळ्यानेंही नीटनेटकी असे.

उत्तरेकडील कडव्या धर्मशील लोकांच्या वंशजांना ही दक्षिणेंतील गुलामगिरी आवडली नाहीं. कांहीं वर्षे दोन्ही पक्षांत धुसपुस चालून शेवटीं युद्ध झालें व दक्षिणेचा पराभव होऊन निग्रोंची गुलामगिरींतून मुक्तता झाली. ते स्वतंत्र नागरिक बनले. त्यांच्यासाठीं शिक्षणसंस्था निघाल्या. बुकर टी. वाशिंग्टन या निग्रो पुढाऱ्यानें निग्रोंसाठीं टस्केजी येथें काढलेली शाळा प्रसिद्ध आहे. निग्रोंची बहुतेक वसति दक्षिण भागांतच आहे. तेथें ते गिरण्यांत व कारखान्यांत किंवा कपाशीच्या शेतांत मजुरी करितात. त्यांच्यांत शिक्षणप्रगति पुष्कळ झाली असून अनेक विद्वान गृहस्थ निपजले आहेत. ते स्वतंत्र झाले किंवा सुशिक्षित झाले तरी अमेरिकन लोक त्यांना बरोबरीच्या नात्यानें वागविण्यास तयार नाहींत. गोरे लोकांच्या हॉटेलांत त्यांना मज्जाव असतो, ट्रॅमगाड्यांत त्यांना वेगळें बसावें लागतें व गांवांत वेगळें राहावें लागतें. त्यांच्या हातून गोऱ्या लोकांचा बारिकसारीक अपराध घडला तर ते न्यायकचेरीची वाट न पाहतां अपराध्यांचा भयंकर छळ करितात. आज अमेरिकेंत सुमारें एक कोटी निग्रो आहेत व त्यांची संघशक्ति व कर्तृत्वशक्ति दांडगी आहे. या

काळ्यागोऱ्यांच्या झगड्याचें पुढें काय होतें तें पाहिलें पाहिजे.

पूर्वीं दक्षिणभागांत पिकलेला कापूस जहाजांतून व आगगाडींतून उत्तरेकडील गिरण्यांकडे रवाना होत असे. अलीकडे दक्षिणच्या लोकांनीं आपल्या शेतांतच कापसाच्या मोठमोठ्या गिरण्या सुरू केल्या आहेत. तथापि कपाशीचें उत्पन्नच इतकें मोठें आहे कीं, दक्षिण व उत्तरेच्या गिरण्यांना पुरून इंग्लंड, जपान वगैरे परदेशांना पाठविण्यास हवा तितका कापूस असतो.

१६९४ त आफ्रिकेच्या पूर्वेस असलेल्या मादागास्कर बेटांतून निघालेलें एक जहाज अमेरिकेच्या दक्षिण भागांतील कॅरोलिना संस्थानच्या चार्ल्सटन या बंदरीं आलें. जहाजाच्या कप्तानापाशीं एक पोतेंभर भात होतें. तें त्यानें जाण्यापूर्वीं एका अमेरिकन गृहस्थास दिलें. त्याला किंवा कोणाही अमेरिकनाला त्या वेळीं तांदूळ माहित नव्हते. त्या गृहस्थानें आपल्या बागेंत तें पेरलें. भाताचें छान पीक आलें. इतरांनीं त्याच्यापासून तें नवें धान्य घेतलें. दक्षिण भागांतील रूखल उष्ण प्रदेशांत पुष्कळच भात पिकूं लागलें. १९-१३ सालीं अमेरिकेस भाताचें दोन कोटी बुशेल उत्पन्न झालें.

आपण घरांना रंग देतों किंवा खुर्च्या-टेबलांना व्हार्निश करितों तेव्हां टरपेनटाइनचा उपयोग करितों. हें आपल्याला अमेरिकेच्या दक्षिण संस्थानांत दाट उगवणाऱ्या देवदारांपासून मिळतें. टरपेनटाइन तयार करण्याच्या धंद्याला 'टरपेनटाइनची शेती' असें म्हणतात. प्रत्येक 'शेतां' त म्हणजे रानांत देवदारांचीं हजारों उंच उंच झाडें असतात व प्रत्येक 'शेतकऱ्या' च्या हाताखालीं हजारों निग्रो मजूर राबत असतात. हे मजूर कुऱ्हाडीनें झाडाच्या खालच्या बाजूची एक मोठी खपली काढतात व तिच्याखालीं एक भांडें बांधितात. या भोंकावाटें चीक बाहेर पडून तो भांड्यांत सांचतो. दुसऱ्या वर्षीं या भोंकाच्यावर दोन तीन फूट अंतरावर

दुसरें भोंक पाडतात. याप्रमाणें वर वर भोंकें पाडीत जातात. दर खेपेस चीक कमी होत जातो व त्याचा रंग काळसर बनत जातो. सहा सात वर्षांनीं चीक इतका काळा बनतो कीं तो निरुपयोगी होतो व झाड मरतें.

भांड्यांत सांचलेला चीक एका मोठ्या पिपांत ओततात व हीं पिपें टरपेनटाइन करण्याच्या कारखान्यांत नेतात. तेथें चिकांत पाणी मिसळून तो कढयांत ओततात व खालीं भट्टी पेटवितात. चांगली आंच बसूं लागली म्हणजे चीक वितळतो व त्याची वाफ होते आणि ती कढयांस जोडलेल्या नळ्यांत शिरते. या नळया थंड पाण्याच्या प्रवाहांतून नेल्या असल्यानें आंतील वाफ घट्ट होऊन तिचा रस बनतो व तो नळीच्या दुसऱ्या तोंडावाटें मोठमोठ्या पिंपांत पडतो. हेंच टरपेनटाइन होय. कढयांत जो चोथा शिल्लक राहतो तें रोझिन होय. याचा साबू तयार करण्यास व व्हारनिश देण्यास उपयोग होतो. जॉर्जिया संस्थानांतील सॅव्हान्ना बंदरांतून हजारों पिपें टरपेनटाइन व रोझिन परदेशांत व अमेरिकेंतील इतर संस्थानांत रवाना होतात.

आतां आपण मिसिसिपी नदीवरील जहाजांत बसून उत्तरेस जाऊं व जातां जातां तिच्या खोऱ्याचें निरीक्षण करूं. या नदीची लांबी जगांतील सर्व नद्यांपेक्षां जास्त आहे. हिला अनेक नद्या येऊन मिळतात व त्यांच्यापैकीं बहुतेकींत जहाजें चालूं शकतात. नकाशामध्यें पाहिलें असतां या सर्व नद्यांचें जाळें एखाद्या अनेक फांद्या असलेल्या झाडाप्रमाणें भासतें. अमेरिकेचा शेंकडों मैल लांबीचा मध्यभाग म्हणजे या नद्यांचें खोरें होय. इतकें मोठें व सुपीक खोरें जगांत कोठें नाहीं.

आपण आपल्या सफरीला मिसिसिपीच्या मुखाजवळील न्यू ऑर्लिन्स बंदरापासून सुरवात करूं. या बंदराचा धक्का पंचवीस मैल

लांबीचा आहे. पहा धक्क्यावरील वखारींत साखरेच्या गोणी, गव्हाचीं पोतीं, कापसाचे गठ्ठे वगैरे माल कसा खचून भरला आहे. न्यू ऑर्लिन्सभोंवतालच्या प्रदेशांत बराच पाऊस पडत असल्यानें उसाची पुष्कळ लागवड करितात. आपण नदीमधून अमेरिकेचें सुपीक मध्यभागाचें खोरें पाहूं. त्यांत होणारा माल नदींतून न्यू ऑर्लिन्सला येतो व तेथून परदेशीं जातो.

ही गंमत पहा. नदीच्या दोन्ही कांठचा प्रदेश नदीपेक्षां कसा खोल आहे पहा. ते पहा हॉलंडसारखे बंधारे. यांची लांबी अठराशें मैल आहे. तरी पण मिसिसिपीला पूर आला म्हणजे कधीं कधीं ती या बंधाऱ्यांना लाथाडून लांबवर जाते व अनेक गांवांना जलसमाधि देते. आपल्यासमोर उत्तरेस पहा. नदी कशी बारीक बारीक वळणें घेत घेत वाहत आहे. पुढील वळणांत असलेलीं जहाजें किती जवळ दिसतात, पण वळणें घेऊन तेथपर्यंत जाण्यास आपल्या जहाजाला कितीतरी वेळ लागेल. मिसिसिपी नुसती अशीं वळणेंच घेत नाहीं. ती आपलें पात्रही वरचेवर बदलतें व नवीन बेटें व तलाव निर्माण करिते.

काय ही दांडगी वाहतूक! एकामागून एक जहाजें सारखीं दक्षिणेकडे चाललीं आहेत. दर बंदरांत निग्रो मजूर धान्याचीं पोतीं आपल्या जहाजावर चढवितात. तीं जहाजें पहा. तीं थेट पेनसिल्व्हॅनियाच्या खाणींतला कोळसा घेऊन न्यू ऑर्लिन्सला चाललीं आहेत. काय ही वाहतुकीची सोय.

आतां आपलें जहाज मकेच्या मुलुखांत शिरलें. आपल्या दोन्ही बाजूस शेंकडों मैलपर्यंत मकेचीं शेतें पसरलीं आहेत. आपण जर येथें जहाजांतून उतरलों व पूर्वेकडे किंवा पश्चिमेकडे आगगाडींत बसून जाऊं लागलों तर तासन्‌तास आपल्याला मकेच्या शेतांखेरीज कांहीं दिसणार नाहीं. उघडच आहे, अमेरिकेचें सर्वांत मोठें

पीक म्हणजे मकाच. अमेरिकेंतील बहुतेक संस्थानांत मका पिकते. परंतु मिसिसिपीच्या पूर्वेकडील इलिनॉय, इंडियाना व ओहायो या संस्थानांत आणि पश्चिमेकडील मिसुरी, कंसास, आयोवा व नेब्रास्का या संस्थानांत ती फार पिकते. अमेरिकेंत दरसाल तीस कोटी बुशेल मका पिकते असें म्हणतात. जर मकेचीं सर्व कणसें बैलगाड्यांत खचून भरलीं व या गाड्या एकामागें एक उभ्या केल्या तर सबंध पृथ्वीभोंवतीं त्यांच्या बारा रांगा होतील! काय हें उत्पन्न!

बहुतेक मका अमेरिकेंतच खपते. तिचें पीठ गव्हाच्या पिठांत मिसळून रोट्या बनवितात व पुष्कळ लोक तर नुसत्या मकेच्या पिठाच्याच रोट्या करितात. याशिवाय गाईंना व डुकरांना मका घालतात. अमेरिकेंत गवळ्यांचीं मकेचीं शेतें असतात व ते मका कापून कोठारांत साठवून हिवाळ्यांत ती गुरांना खाऊं घालतात. तेव्हां जेथें मका आहे तेथें गाई व डुकरें हीं असावयाचींच. या मकेच्या प्रदेशांत एकंदर सहा कोटी डुकरें आहेत. या डुकरांना व गाईंना जर वरील कणसांच्या बैलगाड्यांशेजारीं एकामागें एक असें उभें केलें तर पृथ्वीभोंवतीं त्यांच्याही दोन रांगा होतील.

चला आतां मकेच्या मुलखांतून मिसिसिपीच्या उत्तर खोऱ्यांतलि गव्हाच्या मुलखांत जाऊं. गव्हाचें पीक मकेच्या खालोखाल आहे. डाकोटा व मिनिसोटा या संस्थानांत गव्हाची लागवड फार मोठ्या प्रमाणांत करितात. तेथें कांहीं शेतें इतकीं मोठीं आहेत व त्यांच्यांत इतका गहूं निघतो कीं, एका शेतांत शेकडों मजूर काम करीत असतात, त्यांच्यावर अनेक मुकादम देखरेख ठेवितात, व हिशेब ठेवण्यास पुष्कळ कारकून लागतात. एका शेतावर अडीचशें घोडे व खेचरें, दोनशें नांगर, एकशें पंधरा कापणी करण्याचीं आउतें, वीस वाफेनें चालणारीं काढणी करण्याची (threshing) आउतें आहेत व त्या शेतांत कापणीला चारशें व काढणीला सहाशें मजूर लाग-

तात. वाफेच्या औतांनीं पुष्कळ काम कमी वेळांत होतें तरी या गव्हाच्या शेतांत इतकीं औतें लागतात.

या भागांत एक एक शेत सहज पांचशें एकरांचें असतें. या शेतांत जुन्या औतांनीं काम भागणें शक्य नाहीं व नुसत्या माणसांच्या व जनावरांच्या बळावरही शेती होणें अशक्य. यासाठीं बुद्धिमान अमेरिकन लोकांनीं वाफेनें चालणारे नांगर, कुळव, पाभर, व काढणी-मळणीचीं औतें तयार केलीं. त्यांचें काढणीचें यंत्र तर फार मजेदार आहे. त्याला वाफेचें इंजन लावलेलें असतें व खालीं धार असलेले अनेक विळे बसविलेले असतात. यंत्र चालू झालें म्हणजे ते विळे भराभर गव्हाचीं ताटें कापीत जातात. हीं कापलेलीं ताटें एका फिरत्या पट्टयावरून वर जाऊन यंत्रांत पडतात. येथें अशी योजना केली आहे कीं ताटे वर आल्याबरोबर त्यांच्या पेंढया बांधल्या जातात व पेंढया बांधून झाल्याबरोबर यंत्रच त्याच्या भोंवतीं तार किंवा दोरी गुंडाळते व पेंढयांना बाहेर फेकून देते. मळणीचें यंत्रही असेंच गुंतागुंतीचें आहे. फक्त दोन माणसें या कामाला लागतात. एकजण यंत्रांत पेंढया टाकितो. यंत्राच्या आंत दाते असलेलीं चाकें गरगर फिरत असतात. तीं पेंढयांतील गव्हाचे दाणे व इतर भाग वेगळा करितात. गहूं एका नळींतून गळून खालीं पडतो व चिपाड बाहेर फेकलें जातें. तेथें दुसरा मनुष्य पोत्याचें तोंड उघडें करून उभा असतो. एक पोतें भरलें कीं तो दुसरें घेतो. कांहीं ठिकाणीं तर काढणी व मळणीचें मिळून एकच भलें मोठें यंत्र असतें व त्याची रचना गुंतागुंतीची असते. हीं अजस्र यंत्रें वाफेनें चालवितात. किंवा कधीं कधीं त्यांना पंचवीस तीस घोडे लावितात. अमेरिकेंत बैलाचा उपयोग शेतींत करीत नाहींत.

गव्हाचीं पोतीं आगगाडीच्या स्टेशनवर किंवा आगबोटीच्या धक्यावर नेल्यावर तेथें तीं साठविण्यासाठीं खूप उंचच उंच वखारी

असतात त्यांना एलिव्हेटर म्हणतात. एका फिरत्या पट्टयाला जोड-लेल्या पुष्कळ बकेटांतून पोतीं वर जातात. तेथें तीं मोजतात व यंत्राच्या साहाय्यानें खालीं नेऊन रचतात. एका एका एलिव्हेटर



"एलिव्हेटर" (गव्हाचें कोठार).

मध्यें लाखों बुशेल गहूं सांठविलेला असतो. गहूं घेऊन जाणाऱ्या माल-गाड्या किंवा जहाजें एलिव्हेटरपाशीं उभीं करतात व एलिव्हेटरमधून मोठमोठ्या नळकांड्यांतून गहूं डब्यांत किंवा जहाजांत भरला जातो.

या खोऱ्यांत मिनिआपॉलिस ही गव्हाची प्रसिद्ध पेठ आहे. या गांवीं पिठाच्या अनेक गिरण्या असून त्या विजेनें चालतात. त्या रात्रंदिवस चालू असतात व एका गिरणींतून रोज पंधरा सोळा हजार पिपें पीठ निघतें.

आतां आपण मिसिसिपी नदीवरील सफर संपवून मिशिगान सरोवराजवळच्या शिकागो शहरीं जाऊं. याची लोकसंख्या मुंबईच्या अडीच पट आहे. परंतु १८३० पूर्वीं या जागीं केवळ दलदल होती व कांहीं थोडे लोक झोपड्या बांधून तेथें राहत होते. तथापि वसाहत करण्यास हें ठिकाण फार उत्तम आहे असें लोकांना आढ-

ळून आलें. भोंवतालीं गव्हाचा व मक्याचा आणि गाईडुकरांचा अफाट मुलूख होता. हा माल मिशिगान सरोवराच्या मार्गानें पूर्व किनाऱ्यावर व तेथून युरोपांत रवाना करण्यास मिशिगानच्या कांठीं वखारींचें शहर पाहिजे होतें. शिवाय या दलदलीपासून जवळच कोळशाच्या व लोखंडाच्या खाणी होत्या व इमारतीच्या लाकडाचीं जंगलेंही शेजारीं होतीं. कारखाने व वखारी काढण्यास ही दलदल किती तरी सोइस्कर होती. हां हां म्हणतां तेथें वसती वाढूं लागली.

दलदलीवर घरें बांधावयाचीं म्हणजे भक्कम पाया पाहिजे. हालंडच्या लोकांची हीच अडचण होती. ती त्यांनीं जमिनींत झाडें रोवून दूर



"अमेरिकेंतील एक गगनचुंबी इमारत"

केली. शिकागोच्या लोकांनीं जवळच्या लोखंडाच्या खाणींतून लोखंड आणून त्याचे आगगाडीचे रूळ बनवून ते जमिनींत जवळ जवळ उभे रोवले व त्यांच्यामध्यें कांक्रिट ओतलें. अशा भक्कम पायावर त्यांनीं पोलादी घरें बांधलीं. जागा थोडी व माणसें आणि कारखाने पुष्कळ अशी स्थिति असल्यानें त्यांना पंचवीस तीस चाळीस मजल्यांचीं घरें बांधावीं लागलीं. आधीं ते सबंध घराचा पोलादी सांगाडा उभा करितात व मग मधल्या मजल्यापासून सुरवात करून खालीं व वर पोलादी खांबांच्या चौकटींत दगडाच्या भिंती बांधीत जातात. या गगनचुंबी घरांना 'स्काय-स्क्रेपर' म्हणतात. न्यूयॉर्क व शिकागो शहरांत अशीं पुष्कळ घरें आहेत. इतर शहरांतही जागेची अडचण नाहीं तरी जागेच्या जबरदस्त किंमतीमुळें व फॅशनसाठीं असे स्काय-स्क्रेपर बांधण्याची चाल आहे.

शिकागोंत पुष्कळच कारखाने आहेत; पण गुरें मारून त्यांचें मांस विकण्याच्या धंद्यासाठीं जगांत शिकागोची फार प्रसिद्धि आहे. अनेक वाटांनीं आगगाड्या मध्यभागाच्या खोऱ्यांतील गाई व डुकरें घेऊन रात्रंदिवस शिकागोकडे धांवत येत असतात व शिकागोमधून गुरांचे मांस घेऊन जहाजें व आगगाड्या सर्वत्र जात असतात. शिकागोपासून शेंकडों मैल लांब असलेल्या अमेरिकन शहरांना शिकागो रोज मांस पुरवितें. इतकेंच नव्हे तर लंडन, पॅरिस, बर्लिन या शहरांतही या मांसाचा खप होतो.

शहराच्या मध्यभागीं बाहेरून आणिलेल्या गुरांसाठीं कोंडवाडे आहेत. त्यांचा इतका मोठा विस्तार आहे कीं, तें एक मोठें शहरच आहे असें म्हटलें तरी चालेल. या जनावरांच्या शहरांत एकेवेळीं तीन चार लाख जनावरें असतात. तेथें आजचीं जनावरें उद्यां बहुधा आढळावयाचीं नाहींत. आगगाड्या थेट कोंडवाड्याच्या दाराशीं जनावरें आणून सोडतात. शिवाय कोंडवाड्यापर्यंत सरोवरां-

सून कालवा काढिलेला असून त्यांतून जहाजें गुरें घेऊन येतात व मांस घेऊन जातात. कोंडवाड्याचे दोनशें जनावरांना एक असे वेगळे भाग, शिवाय गाई, बैल, मेंढरें, डुकरें यांचे वेगळे भाग आहेत.

कोंडवाड्याला लागूनच एक्सचेंज हॉल नांवाची मोठी इमारत आहे. इच्यांत गुरांची देवघेव करितात. गुरें मारण्याचे व त्यांच्या शरिरांतील निरनिराळ्या भागांच्या अनेक वस्तु तयार करण्याचे प्रचंड कारखाने कोंडवाड्याच्या भोंवतीं आहेत. या कारखान्यांतील सर्व कामें यंत्रांच्या योगानें होतात. हीं यंत्रें तयार करण्यांत अमेरिकन लोकांची बुद्धिमत्ता दिसून येते. असें म्हणतात कीं, यंत्राच्या एका बाजूनें जिवंत डुकर आंत शिरतें, आंत तें मारलें जाऊन चामडें, हाडें, मांस व रक्त वेगळीं होतात. मांस यंत्रांतच खारवलें व सुकविलें जातें व त्याच्या कांहीं भागांचा खिमा होऊन निरनिराळ्या वाटांनीं हीं सर्व यंत्राच्या बाहेर पडतात. जनावरांचीं हाडें बटनांच्या व ब्रशांच्या रूपानें यंत्राबाहेर येतात. चामड्याचे बूट, बॅग्ज् व मोजे होतात. डुकरांच्या केसांचे ब्रश व हाडांच्या स्त्रियांच्या केसांत खोचण्याच्या टाचण्या, कंगवे व बटनें होतात. गाईच्या कांहीं भागांपासून औषधें तयार करितात व कांहींचा साबू, मेणबत्त्या वगैरे वस्तु तयार करण्याकडे उपयोग होतो. एकजणानें थट्टेनें असें म्हटलें आहे कीं, गाईचा हंबरडा व डुकरांचें केंकावणें याखेरीज त्यांचा कोणताच भाग शिकागोच्या कारखान्यांत वायां जात नाहीं.

शिकागोच्या आसपासच्या प्रदेशांत देवदार, ओक व बीच या झाडांचीं दाट जंगलें आहेत. पूर्वीं तर पूर्व किनाऱ्यापासून मिसिसिपीपर्यंत अफाट जंगल पसरलेलें होतें. लागवड करतांना व शहरें बांधतांना जरी वसाहतवाल्यांनीं बरेंच जंगल कापलें तरी अद्यापि अमेरिकेच्या एक तृतीयांश प्रदेशावर जंगलें आहेत व त्यांच्यांतील झाडें तोडण्याबद्दल सरकारचे कडक नियम आहेत. पश्चिम भागांत

तर वीस कोटी एकराचें जंगल सरकारनें राखून ठेविलें आहे. दर-वर्षी अर्थात हजारों झाडें तोडलीं जातात. त्यांच्या ऐवजीं लोकांनीं अधिक अधिक नवीन झाडें लावावींत असे सरकारचे प्रयत्न चालू आहेत. शाळांमधून झाडांचें महत्त्व मुलांना समजावून देतात व वर्षांतून झाडें लावण्याचा एक दिवस समारंभानें साजरा करितात. या दिवशीं शाळेंतील प्रत्येक मुलगा झाडाचें एक रोप लावितो व पुढें त्याची निगा ठेवितो.

रानांतील झाडें कापून तीं वाहून नेण्याचा धंदा उत्तर भागांतील सरोवरांच्या काठीं जोरांत चालू आहे. या धंद्यांत लाखों माणसें गुंतलीं असून दरसालची त्यांची मजुरी तीस कोट रुपयांपर्यंत जाते. हा धंदा फक्त हिवाळ्यांत करितात. यावेळीं बर्फ पडून जमीन गुळगुळीत झाली असते. लाकुडतोडे जंगलांत जाऊन लाकडाच्या ओंड्यांचें घर करून राहतात व त्यांत झोळयांत निजतात. त्यांच्याबरोबर चार महिन्यांची अन्नाची बेगमी असते. सर्व काम पद्धतशीर रितीनें होतें. आधीं एक तज्ज्ञ जंगलांत फिरतो व कोणतीं झाडें कोणत्या जागे-पासून तोडावयाचीं तें पाहून त्या त्या ठिकाणीं खुणा करीत जातो. नंतर मागून करवती घेऊन कांहीं माणसें येतात व करवतीनें कांहींसें कापून पुढें जातात. त्यांच्यामागून कुऱ्हाडी घेऊन दुसरी टोळी येते व ती झाडें तोडून खालीं पाडते.

नंतर बिनचाकांच्या गाडींत वीस पंचवीस ओंडें घालतात व तिला दोन चार घोडे जुंपतात. बर्फानें जमीन गुळगुळीत झाली असल्यानें घोड्यांना इतकें मोठें ओझें सहज ओढतां येते. गाड्या नदीपाशीं नेऊन ओंड नदींत टाकतात. नदीचें पाणी अर्थात थंडीनें गोठलेलें असतें. हिवाळा संपला म्हणजे बर्फ वितळतो आणि ओंड पाण्याच्या प्रवाहाबरोबर वाहूं लागतात. त्यांच्यावर कांहीं माणसें बसून जातात. त्यांच्या पायांत बारीक खिळे मारलेले बूट

असतात; व हातांत स्वित्झरलंडच्या वाटाड्याप्रमाणें टोकदार काठी असते. हे लोक एका ओंडयावरून दुसऱ्यावर भराभर जातात व नदींत त्यांना इकडे तिकडे जाऊं देत नाहींत. कांहीं ठिकाणीं हे ओंडे ओढून नेण्यास जहाजें लावितात. मिशिगान सरोवराच्या कांठीं लाकडें कापण्याचे अनेक कारखाने आहेत. त्यांच्यांत एकाच यंत्राला अनेक करवती लाविलेल्या असतात व त्यांच्या योगानें सबंध लाकडाच्या एकाच वेळीं अनेक फळ्या होतात.

मध्यभागांतील मिसिसिपीचें खोरें सोडून जसजसें आपण पश्चिमेकडे जाऊं लागतों तसतसें पावसाचें प्रमाण कमी पडत जातें व दाट उंच झाडांचा मुलुख जाऊन गवताच्या कुरणांचा प्रदेश सुरू होतो. या भागांतील मुख्य धंदा अर्थात मेंढरें व गाई राखण्याचा आहे. या दुर्जल भागाची वसाहत होण्यास पुष्कळ दिवस लागले. आरंभीं गुराखी व धनगर थोडेच होते व ते घोड्यावर बसून गाई व मेंढरें घेऊन पाण्याच्या व गवताच्या सोईनें सारखे भटकत असत. एका गुराख्याला दुसऱ्या गुराख्याचें घर आढळलें तर तो त्यांत जाऊन कोणी नसलें तरी खुशाल असेल तें खाऊन पिऊन परत घोड्यावर बसून आपल्या मार्गाला लागे.

पुढें वसती वाढली. पूर्वकिनाऱ्यावरील दाट वस्तींच्या शहरांना पुष्कळ मांस लागूं लागलें. त्यामुळें गाई, मेंढरांचें कळपही वाढले. प्रत्येक धनगराचें व गुराख्याचें कुरण त्याला आंखून दिलें गेलें. या कुरणांना रँच म्हणतात. आतां रँचवाले बंगले बांधून राहतात. बंगल्यांशेजारीं त्यांचें गोठे व कोंडवाडे असतात. पाटाच्या पाण्यानें तें अल्फाल्फा नांवाचें गवत काढतात. त्यांच्यापाशीं जाण्यायेण्यास मोटारी व गवत कापण्याची आणि पेंढया बांधण्याचीं यंत्रें आहेत. हिवाळ्यांत गाई व मेंढरें मालकाच्या घराशेजारीं साठविलेलें गवत खातात व उन्हाळ्यांत राखलेल्या कुरणांत चरतात. गुराख्यांना तेथें

cow boys म्हणतात. ते चपळ घोडयांवर बसतात व हातांत लांब दोरी घेऊन दौडत दौडत गाई वळतात.



"अमेरिकन गुराखी"

कुरणांचें मैदान सोडून पश्चिमेकडे गेले म्हणजे दक्षिणोत्तर आडवा असा उंच रॉकी पर्वत लागतो. याचीं शिखरें बर्फानें आच्छादित असतात. यावरील सृष्टिशोभा रमणीय आहे. या प्रदेशांत प्रचंड धबधबे आहेत, रूक्ष व भयाण वाळवंटें आहेत आणि गगनचुंबी वृक्षांचीं विस्तीर्ण अरण्यें आहेत.

रॉकी पर्वतालगतचीं दोन स्थळें पाहण्यासारखीं आहेत. यलो स्टोन पार्क व सॉल्ट लेक. यलोस्टोन पार्क हा लहान कृत्रिम बगिचा नसून सरकारनें राखून ठेविलेला विस्तीर्ण डोंगराळ प्रदेश आहे. यांत दोन दोन मैल उंचीचीं पर्वत शिखरें, मैल मैल खोल अशा भयंकर दऱ्या, सरोवरें, धबधबे वगैरे अनेक सृष्टिचमत्कार आहेत. परंतु यलोस्टोन पार्कचें वैशिष्टय त्याच्यांतील ऊन पाण्याच्या पांचशें झऱ्यांत आहे. या झऱ्यांच्या पाण्यांत अनेक धातु मिसळल्या असल्यामुळें त्यांचे अनेक रंग आहेत. कांहीं झऱ्यांतून ऊन पाण्याचे फवारे मधून मधून उडतात. कांहींचे फवारे वर्षांतून एकदा किंवा

दोनदां तर कांहींचे कांहीं मिनिटांच्या अवकाशानें नियमितपणें उड-तात. 'ओल्ड फेथफूल' हा फवारा बरोबर तासातासानें वर उडतो. 'ग्रँड गायसर' हा फवारा तीनशें फूट उंच उडतो.

दुसरें पाहण्यासारखें स्थल म्हणजे सॉल्ट लेक. हें नांवाप्रमाणेंच खाऱ्या पाण्याचे शंभर मैल लांबीचें सरोवर असून याचें पाणी समुद्राच्या पाण्यापेक्षां सहापट खारें आहे. या सरोवरांतून हजारों खंडी मीठ मिळतें. मिठामुळें सरोवराचें पाणी इतकें जड झालें आहे कीं, उंचावरून या सरोवरांत उडी घेतली तरी खांद्यापर्यंतचा शरिराचा भाग पाण्यांत जातो व डोकें बुचाप्रमाणें पाण्यावर तरंगत राहतें.

रॉकी पर्वत व त्याच्या पश्चिमेकडील पठार हा पूर्वीं निर्जन असा प्रदेश होता. परंतु १८४८ मध्यें मार्शल नांवाच्या गृहस्थास इकडील नदीच्या वाळूंत सोन्याचे कण सापडले. ही बातमी पसरतांच हजारों माणसें या ओसाड भागांत सोन्याच्या लोभानें धांवत आलीं व त्यांनीं सर्व नद्यांची वाळू चाळून त्यांतून लाखों रुपयांचें सोनें मिळविलें. नंतर त्यांचा मोर्चा खुद्द रॉकीकडे वळला. रॉकींत त्यांनीं ठिकठिकाणीं मैल मैल खोल खणलें व कल्पनातीत सोनें व रुपें बाहेर काढिलें. अजूनही हातांत कुदळ व फावडें घेऊन आणि पाठीशीं फराळाची पडशी बांधून रॉकीच्या आडनीड कोन्या कोपऱ्यांत सोन्याचा शोध करीत फिरत असलेले धाडशी लोक दृष्टीस पडतात. या सोन्याच्या प्रदेशांत खाणीवाल्यांनीं स्वतःला राहण्यासाठीं व सोनें रुपें शुद्ध करण्याचे कारखाने थाटण्यासाठीं शहरें उभारलीं व अल्पावधींत डेन्व्हर, सॅन् फ्रॅन्सिस्को वगैरे नव्या शहरांत लक्षावधि लोकसंख्या झाली.

अमेरिकेचा पसीफिक महासागरालगतचा पश्चिम किनारा म्हणजे नंदनवन आहे. विशेषतः कॉलिफोर्निया संस्थानची सृष्टिशोभा व हवामान अवर्णनीय आहेत. येथें उन्हाळा नाहीं व हिवा-

काही नाहीं. वर्षभर वसंत ऋतुच नांदतो. झाडें वर्षभर हिरवीगार असतात. वर्षभर फुलझाडांना व फळझाडांना सुंदर फुलें व फळें येतात. डिसेंबर महिन्यांत सुद्धां उघडयावर गुलाब फुलतो. पासाडेना या गांवीं गुलाबाचें एक झुडुप आहे त्याला हजारों फुलें येतात.

कॅलिफोर्नियोच्या मळ्यांत हवीं तितकीं अक्रोडाचीं व बदामाचीं झाडें आपल्या दृष्टीस पडतात. नारिंगांचीं व लिंबांचीं झाडें तर हजारांनीं मोजावीं लागतील. कॅलिफोर्नियोच्या कांहीं भागांत आपण फिरावयास निघालों तर अनेक मैलपर्यंत द्राक्षांच्या वेलींखेरीज आपल्याला कांहीं दिसणार नाहीं. कांहीं भागांत बेदाण्याचीं हजारों झाडें आहेत. अंजिरांच्या झाडांची येथें उत्तम पैदास होते. एका एका झाडावर पांचशें शेर वजन होईल इतकीं अंजिरें निघतात. कांहीं भागांत दहा बारा वर्षांच्या मुलाच्या वजनाइतकें एक एक बीट निघतें व कांहींत तुम्हाला वाटेल तितकीं टरबुजें खाण्यास मिळतील.

कॅलिफोर्नियांत फळांचे लहान लहान मळे असून ते पाटाच्या पाण्यावर चालतात. आठ दहा एकराच्या मळ्यांत तेथें एका कुटुंबाचें चांगलें भागतें. कांहीं सुपीक भागांत तर एका एकराच्या मळ्यावर नवराबायको थाटानें संसार करितात. तथापि येथें कांहीं मोठेही मळे आहेत. व्हिना रँच नांवाच्या मळ्यानें एकूण साठ हजार एकर जागा व्यापिली आहे. या मळ्यांतून जे पाट वाहतात त्यांची लांबी शंभर मैल भरेल. व्हिना रँचमधील द्राक्षाच्या बागेइतका जगांत दुसरा मोठा बाग नाहीं. या बागेंत इतकीं द्राक्षें निघतात कीं, तीं सर्व अमेरिकेभर वाटलीं तर प्रत्येक अमेरिकन स्त्रीपुरुष व मूल यांच्या वाट्याला पावशेर द्राक्षें येतील. व्हिना रँचच्या कुरणांत तीस हजार मेंढरें चरतात व सर्व मळ्यांत मिळून पंधराशें माणसें काम करितात. या विस्तीर्ण मळयाबद्दलची सर्वांत आश्चर्यकारक

गोष्ट ती ही कीं, हा मळा लीलॅन्ड स्टॅन्फर्ड या गृहस्थांच्या मालकीचा होता व त्यांनीं तो एका युनिव्हर्सिटीला बक्षिस दिला! ही लीलँड स्टॅन्फर्ड युनिव्हर्सिटी या मळ्याच्या उत्पन्नावर चालते.

कॅलिफोर्नियांतल्यासारखीं मोठीं झाडें जगांत कोठें नाहींत. कांहीं झाडांचीं खोडें इतकीं मोठीं आहेत कीं, तीं पोकळ केल्यास त्यांच्यांत साठ मुलांची शाळा मावेल. कांहीं झाडें तीनशें फुटांपेक्षां उंच आहेत. "स्टार किंग" नांवाचें झाड तीनशें सहासष्ट फूट व 'जंगलाची आई' हें झाड तीनशें पंधरा फूट उंच आहे. एका झाडाच्या खोडाला भोंक पाडलें आहे त्यांतून टांगा जाऊं शकतो. हीं झाडें हजारों वर्षांची असून तितकीं जुनीं झाडें जगांत कोठें नाहींत. यांचें लाकूड इमारतीच्या कामाला फार चांगलें असल्यानें कॅलिफोर्निया, वाशिंग्टन व ऑरेगॉन या तीन संस्थानांतील जंगलांत लाकडें तोडण्याचा धंदा जोरांत चालू आहे.


"कॅलिफोर्नियांतील एक प्रचंड वृक्ष"

आपण अमेरिकेंत पुष्कळ दिवस घालविले. या अफाट व समृद्ध देशाच्या निरनिराळ्या भागांत अमेरिकन लोक आपल्या बुद्धिमत्तेच्या व यंत्रांच्या बळावर निरनिराळे उद्योगधंदे किती मोठ्या प्रमाणावर करितात तें आपण पाहिलें. अमेरिकेचें हें एक वैशिष्टय आहे. जें कांहीं पैदा करावयाचें तें ते इतकें पैदा करितात कीं त्या मालाच्या बाबतींत जगांतील बाजार त्यांच्या कबजांत जातात. एकाच वेळीं कोण-

त्याही वस्तूची पुष्कळ पैदास केली म्हणजे ती स्वस्त विकण्यास पर-वडतें. पुष्कळ वर्षेंपर्यंत इंग्लंडसारख्या उद्योगधंद्याच्या देशांत इंग्लंडच्या मोटारीपेक्षां अमेरिकन मोटारींचाच खप जास्त होता. सध्यां इंग्लंड, फ्रान्स आणि जर्मनींत सिनेमाचे जे चित्रपट दाखवितात ते बहुतेक अमेरिकेंतले असतात.

थोड्या वेळांत पुष्कळ माल पैदा करणें यंत्रसामर्थ्यानेंच शक्य होते. आज अमेरिकेंत यंत्रांचें राज्य चालूं आहें. अमेरिकेच्या कार-खान्यांत व शेतांत सर्व कामें यंत्रें कशीं करितात हें आतां आपण पाहिलेंच आहे. परंतु शहरांतील घरांत व खेडेगांवांतील घरांतसुद्धां यंत्रांचें राज्य आहे. विजेच्या चुलीवर स्वयंपाक होतो. वीजच झाडून काढते, कपडे धुते, दिवे लावते. घरधनीण टेलिफोनमधून वाण्याला किती मांस, ब्रेड, भाज्या, अंडीं वगैरे पदार्थ पाहिजेत तें कळवितें व त्याचा पोरगा ढकलगाडींतून त्या वस्तु आणून तळमजल्यावरील खालीं वर जाणाऱ्या पाळण्यांत ठेवितो व विजेचें बटन दाबतो. खोलींतील घंटा वाजली कीं, घरधनीण विजेचें बटन दाबून पाळणा वर आणिते व त्यांतील वस्तु घेते. घरोंघर बिनतारांचे रेडियो यंत्र असतें व त्यामधून घरीं बसल्या बसल्या अनेक मैलांवर चाललेलें गाणें किंवा व्याख्यान ऐकूं येतें आणि बाजारभाव व ताज्या बातम्या कळतात. शहरापासून दूर शेतावर राहणारा शेतकरीसुद्धां संध्या-काळीं आरामखुर्चीवर बसून न्यूयॉर्क, शिकागो, लॉस अँजिलिस वगैरे शहरीं चाललेलें गाणें ऐकतो.

यंत्र म्हटलें म्हणजे तें एकाच प्रकारचें काम न बदलतां करीत राहणार व अगदीं त्याच प्रकारचा पदार्थ बनविणार. मनुष्य हातानें काम करूं लागला म्हणजे एकाच प्रकारची वस्तु आपल्या इच्छे-प्रमाणें बदलून फरक करून बनवूं शकतो व त्याला त्याचें हस्त-कौशल्य व अभिरुचि व्यक्त करितां येते. दोन माणसांनीं बनवि-

लेल्या दोन वस्तु वेगळ्या होणार व त्यांत त्यांचें वैशिष्ट्य दिसून येणार हें उघड आहे. यंत्रांच्या सार्वत्रिक प्रसारामुळें अमेरिकेंत एक प्रकारचा सारखेपणा सर्वत्र दिसून येतो. एक अमेरिकन गृहस्थ लिहितो : " अमेरिकेंतील नऊदशांश शहरें एकमेकांसारखीं आहेत. कोठेंही जा, त्याच प्रकारचें रेल्वे स्टेशन, स्टेशनजवळ त्याच प्रकारचा मोटारचा तबेला, त्याच्यापुढें त्याच प्रकारचा लोण्याचा कारखाना, दोन मजली दुकानें व पेटीच्या आकाराचीं राहतीं घरें आढळतात. दुकानांत त्याच जाहिराती व तोच माल दिसावयाचा; इतकेंच नव्हें तर, हजामत करणारा न्हावी व कॉलेजांत शिकणारा विद्यार्थी यांच्या तोंडीं त्याच प्रकारच्या भाषेच्या लकबा असतात."

या यांत्रिक सारखेपणाबरोबरच त्याच्याशीं थोडा विसंगत दिसणारा एक गुण अमेरिकेंत आढळतो. तो म्हणजे नव्याची हौस. तेथें नव्याचा खप फार व कांहीं तरी नवें शोधून काढावयाची व प्रचारांत आणावयाची धडपड फार. शाळांचेंच उदाहरण घ्या. काय शिकवावयाचें, कसें शिकवावयाचें, मास्तरनीं शिकवावें का मुलांनींच शिकावें वगैरे अनेक प्रश्नांचा अमेरिकन लोक नित्य विचार करीत असतात, आपल्याला हवी ती नवी पद्धत प्रचारांत आणितात, तिला छानदार नवें नांव देतात, तिच्यावर पुस्तकें लिहितात व तिचा प्रसार करितात. मुलांची बुद्धिमत्ता कशी आहे तें मोजण्यांच्या कसोट्यांचें तर इतकें बंड आहे कीं, जो उठतो तो स्वतःच्या कसोट्या (Tests) तयार करितो व बाजारांत विकतो. असा सामाजिक कोणता प्रश्न नसेल कीं, ज्याविषयीं अमेरिकन लोकांनीं नवीन प्रकारचा विचार व प्रयोग केला नाहीं. या सवयीमुळें पुष्कळ वेळां त्यांच्या विचारांत व आचारांत अतिरेक होतो व समाजस्वास्थ्यास जो एक धीमेपणा लागतो त्याची तेथें परक्यांना तरी उणीव भासते. पण अमेरिका हें परवांचें मूल आहे; तें हिंदुस्थानसारखा बुढ्ढा आजोबा नाहीं किंवा

इंग्लंडसारखा मध्यम वयाचा स्थितिशील ( Static ) गृहस्थ नाहीं.

आपण युरोपच्या राजकारणाच्या भानगडींत पडावयाचें नाहीं; व युरोपला दक्षिण अमेरिका किंवा स्वदेश यांच्या भानगडींत पडूं द्यावयाचें नाहीं हें अमेरिकन लोकांचें आवडतें राजकीय धोरण आहे. परंतु व्यापाराच्या बाबतींत अमेरिकेची युरोपीय राष्ट्रांशीं चुरस होणें अपरिहार्य आहे व या चुरशीचें पर्यवसान एखादे वेळीं युद्धांत होण्याचा संभव आहे असें अमेरिकेला व युरोपलाही वाटतें. यामुळें अमेरिकेनें अलीकडे इंग्लंडच्या बरोबरीनें आपलें आरमार वाढविलें आहे. वाढत्या आरमारामुळें इंग्लंड, फ्रान्स, जपान व इटलींत रयतेवर करांचें ओझें मनस्वी लादलें गेलें. अमेरिकेवरतीं हें करांचें ओझें पुष्कळ आहे व तें सारखें वाढत आहे. पण अमेरिकेपाशीं पैकाही मुबलक आहे. एकमेकांच्या हेतूंविषयीं संशय वाटणें, गैरसमजुती व स्पर्धा वाढणें हें सर्वप्रकारें अनिष्ट, अशानें परत भयंकर युद्ध उद्भवेल व जगाचा संहार होईल असें जाणून अलीकडे सर्व राष्ट्रांतील समंजस पुढारी माणसें आरमार व युद्धसाहित्य कमी करण्याच्या मार्गाला लागलीं आहेत व हें शेवटचें पान लंडन येथें लिहिलें जात असतां त्या शहरीं या प्रश्नाचा खल करण्यासाठीं पांचीं आरमारी राष्ट्रांचे पुढारी जमले आहेत. परवांच प्रमुख राष्ट्रांनीं आपसांत भांडण जुंपलें तर युद्ध न करितां सामोपचारानें तें मिटवावयाचें अशा आणाभाका घेतल्या आहेत.

ही सदिच्छा आचारांत उतरली, आरमारें, युद्धसाहित्य कमी झालें—नाहींसें झालें, मानवसमाजांतून युद्ध हाकललें गेलें तर जगांत बंधुभाव वाढेल, आधुनिक यंत्रकलेच्या साहाय्यानें राष्ट्र एकमेकांच्या अधिकाधिक जवळ येतील, विज्ञान, वाङ्मय, ललितकला यांची परस्परांत देवघेव होईल व प्रत्येक राष्ट्रास आपल्यापरीनें वाढण्यास व आपलें भवितव्य गांठण्यास सर्व जग मदत करील.

---